

# मंत्रशास्त्र

लेखक
मंत्रमहार्णव-मंत्रमर्मभास्कर
मंत्रनिष्णात
श्री १०८ जगद्गुरु श्रीशंकराचार्य श्रीयोगेश्वरानंदतीर्थ
मठ–जगन्नाथपुरी

संग्राहक
गो. प्र. भावे

संवत् २०२६ शके १८९२ सन १९७०

मूल्य २५ रुपये



मन्त्रशास्त्रकार जगन्नाथ पुरीचे प्र० भू० शंकराचार्य



# मंत्रशास्त्र

लेखक
मन्त्रमहार्णव-मंत्रमर्मभास्कर
मन्त्रनिष्णात
श्री १०८ जगद्गुरु श्रीशंकराचार्य श्रीयोगेश्वरानंदतीर्थ
मठ—जगन्नाथपुरी

संग्राहक
गो. प्र. भावे

संवत् २०२६ शके १८९२ सन १९७०

मूल्य २५ रुपये

प्रकाशन ५ वें

आवृत्ति ४ थी (नवसुधारित)
गुरुपौर्णिमा
शके १८९२ जुलै इ. स. १९७०



प्रकाशक
सौ. लता केशव जोशी
कार्यवाह-नवज्योती प्रकाशन
कॉलेज रोड, दादर-मुंबई २८

मुद्रक
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४

प्रथमावृत्ति १९३६
द्वितीयावृत्ति १९४२
तृतीयावृत्ति १९५७
चतुर्थावृत्ति १९७०

# प्रकाशकांचें हृद्गत

ब्रह्मीभूत पूज्य श्रीशंकराचार्य योगेश्वरानन्दतीर्थ ह्यांचा दुर्मिळ व प्राचीन भारतीय संस्कृतीचा अमोल ठेवा ज्यांत आहे असा 'मंत्रशास्त्र' हा ग्रंथ आमच्या हातून उच्चस्तरीय विचारी जनतेसमोर ठेविला येईल ह्याची आम्हाला कल्पनाही नव्हती. परमेश्वरी सूत्रें हालत असतात; पण ती जाणीव आमच्यासारख्या ल्हान जीवांना सुगम व सुसहज नसते. 'मंत्रशास्त्रा'सारखी दिव्य ज्योत नवज्योतीमध्यें मिसळून त्यांत तेवत व तळपत रहावी ही त्या जगचालकाची इच्छा योगेश्वरानंदतीर्थ ह्यांच्या कृपाशीर्वादामुळेंच फलीभूत झाली असें म्हणावें लागतें.

आमची आर्थिक ताकद कमी, उलट सदरहू ग्रंथ मोठा. तशात, त्यांतील अनेक आकृती प्रथमपासून तयार करण्याची मोठ्या खर्चाची योजना आणि मग भारतीय सांस्कृतिक अर्थानें आधुनिक लोंण्या 'विज्ञानाच्या मागें लागलेल्या हीनश्रद्ध वा गतश्रद्ध आमच्या वाचकवर्गापुढें हा ग्रंथ ठेवणें ह्या सर्व कठीण समस्यांचा पर्वत आमच्यासमोर उभा राहिला. यापेक्षांही कठिणतम काम म्हणजे 'मंत्रशास्त्रा' तील विचारधारा नवदृष्टीच्या इतप्रज्ञ समाजाच्या गळीं उतरविणें हा आमच्या पुढें एक यक्ष प्रश्न होता व आहेही. पण अधिक विचार केल्यानंतर पुढील गोष्टी ध्यानांत येतात व आल्या. (१) नवविज्ञान किंवा आधुनिक विज्ञान ह्या नांवानें ओळखलें जाणारें 'ज्ञान' हें केवळ भौतिकी आहे (२) त्या ज्ञानाप्रमाणें जगणारा मानव सुखी व समाधानी नसून मनःशांतीच्या अभावीं दुःखीच आहे (३) त्यामुळें मानवाची मानवता उत्तरोत्तर कमी होत आहे. (४) 'सुख' म्हणजे काय? तें कोठें, कसें मिळेल ह्या तळमळीनें तो व्याकुळ होत आहे (५) यामुळें जागतिक मानवी मनांत मोठी पोकळी निर्माण झाली आहे आणि नेमकी हीच पोकळी भरून काढण्याचें काम आज करावयास हवें असें वाटतें. त्याचा प्रयत्न म्हणून आम्ही 'मंत्रशास्त्र' या दुर्मिळ ग्रंथावरील विचारधारेची नवसुधारित आवृत्ति श्री. गो. प्र. भावे (योगेश्वरानंदांचे अनुग्रहीत व वरील विचारधारेची

चिकित्सा, करून ती पंडित सातवळेकर व सिद्ध योगी रंगावधूत महाराज या उभयतांच्या दीर्घ सहवासात राहून त्यांच्या मार्गदर्शनाखाली तयार झालेल्या आवृत्तीचे चालक) यांच्या मेहेरबानीनें आम्ही वाचकांना सादर करीत आहों. या आवृत्तींत सप्तश्लोकी सप्तशति; श्री रंगावधूत महाराजांचा प्रसाद म्हणून कांहीं मंत्र, श्री सूक्ताची विशेष पाठपद्धति व कांहीं नवीन यंत्रेंहीं दिलेलीं आहेत. या आवृत्तीचीं विशेष वैशिष्ट्यें श्री. भावे ह्यानीं सादर केलेलींच आहेत. अशा ह्या अद्वितीय मराठी ग्रंथाला सक्रिय सहकार वाचक देतीलच या अपेक्षेनें आम्ही आगाऊ मूल्य न मागता हें आर्थिक धाडस केलें आहे. याचा विचार सहृदय ग्राहक करतीलच अशी आशा आहे.

शंकराचार्यांचे एक चहाते नागपूरचे दानशूर श्री बाबुराव धनवटे यांनीं कागदाची जी थोडीफार निरपेक्ष मदत केली, त्यामुळें आम्हाला उत्साह वाटला. या दृष्टीनें आम्ही त्यांचे आभारी आहों. तसेंच दादर येथील इंजीनियर श्री मो. श्री. फडके गणेशधाम, माटुंगा-मुंबई यांनींही ह्या प्रकाशनाला मदत म्हणून रु. ५०० दिले. याबद्दल आम्ही त्यांना धन्यवाद देतों.

—प्रकाशक

# सेवासमर्पण—

ब्रह्मीभूत पूज्यपाद श्री योगेश्वरानंदतीर्थ—शंकराचार्य पुरीमठ यांच्या 'मंत्रशास्त्र' या ग्रंथाची तिसरी आवृत्ती ते छापवीत असताना (इ. स. १९५७) या ग्रंथाची प्रुफं तपासण्याचें काम ते मुंबईस असत तेव्हां मजकडे देत—त्यावेळीं मी पुढील दोन गोष्टी त्यांच्या निदर्शनास आणून देत असें; त्या अशा : (१) "महत्त्वाचा ग्रंथ म्हणून सदरहू ग्रंथात द्विरुक्ति, पूर्वापर संबंधाच्या मजकुराचा जोडविजोड, मंत्रस्वरोच्चारातील छपाईचे दोष, गारुडादि मंत्रसंकल्नादिकातील मापादोष इत्यादि आणि (२) आधुनिक केवळ बुद्धिवादी वा अश्रद्ध लोकांना प्राचीन मंत्रयंत्र तंत्रादिकामागील 'विज्ञान' त्यांना पटेल अशा नवविज्ञानी मार्फत विशद करून सांगाल तर जास्त उपयोग होईल. यातील पहिल्या मुद्द्याबद्दल शक्य तो प्रयत्न करीन असें ते म्हणत. पण त्यांचा अस्थायी मुक्काम व सकलनें मिळविण्याची आवड ह्यामुळें अनेक उणीवा तशाच राहिल्याचें त्यांनाही आढळलें. दुसऱ्या मुद्द्याबाबत सखोल चर्चा व विनिमय होऊन त्याबाबत एकमत होई. व ते तशीं टाचणें करण्याबाबत मला सांगत. तीं मी त्यांसमोर ठेवीत असें. पण तशी मांडणी करणें त्या आवृत्तींत शक्य झालें नाहीं. म्हणून तशी मांडणी व जुळवा-जुळव करून तशी नवीन आवृत्ति काढा असें सांगून तशा प्रकारचें जरूर तें कार्य करावें या हेतूनें त्यांनीं त्यांचे लिखित, व अर्धे लिखित सर्व ग्रंथ माझी तशी इच्छा व तयारी नसतांनाच माझ्याकडे पाठवून त्या सर्व वाङ्मयाची सर्व प्रकारची जबाबदारी मजवर टाकिली आणि तिसऱ्या आवृत्तीची छापील प्रत पुढील व्यवस्थे-करितां माझ्या स्वाधीन केली।

परन्तु 'अनुक्तच दुरुक्त च योद्दव्य तच पडितै.। नहि एकस्य धमप्रज्ञा मत्रशास्त्र विनिर्णये' ही माझी वस्तुस्थिति आणि 'कोऽहम् मदमतिर्मूढ.। क्व चाल्पविषया मति.' अशी माझी २ री वस्तुस्थिति असल्यामुळें या ग्रंथाचें जरूर तें काम, ते हयात असे तों (इ. स. १९६१) मी करू शकलों नाहीं याबद्दल मला सारखी रुखरुख वाटत आहे. पण या गुरुपौर्णिमेला ती पूर्ण करून घेतली ही 'गुरुकृपाहि केवलम्'.

माझा त्याच्याशीं 'अनुगृहीत' या नात्यानें संबंध आहे. यामुळें त्यांच्या आज्ञा पाळून कर्तव्यातून मुक्त व्हावें ह्या हेतूनें मी ब्रह्मर्षि **पंडित सातवळेकर** (पारडी) आणि **सिद्धयोगी रंगावधूत महाराज** (नारेश्वर)—आज हे उभयताही ब्रह्मलीनच आहेत—ह्यांच्या सहवासात सुमारें पाच वर्षे घालविलीं. त्यांशीं विचार विनिमय करून उभयतांचे अनुभव समजावून घेतले. व मगच सदरहू ग्रंथासंबधाचे माझे विचार पुढें ठेविले. तेव्हा उभयतांनीं ग्रंथाची तशीच मांडणी करण्यास आनंदानें व उत्सुकतेनें प्रोत्साहन दिलें. त्याप्रमाणें मी महत्त्वाचे लिखाण वेद-मंत्राची शुद्धाशुद्धता, आणि बहुतेक नवविज्ञानी मांडणी उभयतांच्या दृष्टिखालून घालविली. ग्रंथाची अद्ययतनता ठेवण्याचे प्रयत्न, श्रीसूक्त, व सप्तशती ह्यांबद्दलचे अनुभव, नवग्रहोपासनेचें शास्त्रीय स्वरूप आणि त्याचबरोबर आमच्या मंत्रतंत्र विधीमागील 'विज्ञान' आम्हां प्राचीन भारतीयाचें ब्रह्मांड ज्ञान व आधुनिक नवविज्ञान 'ह्याची तुलना इत्यादि गोष्टी पाहून उभतांनीं उत्साहानें आशीर्वाद दिले. पूज्य योगेश्वरानंदांचे बंधु श्रेष्ठ व निष्ठावंत राजकारणी श्री. ना. मा. खरे ह्यांनींही उचंबळून अतःकरणपूर्वक "अशाच विचाराचे अनेक भारतीय आज हवे आहेत. आपल्या गुरुजींची खरोखरच सार्थ सेवा करीत आहां. त्वरा करा" असा आशीर्वाद दिला! परंतु दुःखाची गोष्ट ही कीं, आशीर्वादानंतर पाचच दिवसांनीं ते आम्हास सोडून गेले!

आतां या नवसुधारित आवृत्तीची रूपरेषा वाचक, उपासक, साधक व अनुग्रहीत ह्यांच्यापुढें थोडक्यात ठेवीत आहें ती अशी :—

(१) पूर्वीचे उराईंचे दोष नाहींसे करून जरूर तेथच्य भाषेची सुगमता केली. पण मांडणी मात्र पूर्णतया त्यांचीच ठेविली. कारण तसा प्रकारचा विषयाधिकार माझा नाहीं; तथापि मुद्रणदोष राहिलेच. (२) ग्रंथाच्या **पूर्वार्धात** त्यांचे सर्व विचार सुसंबद्धित रीतीनें एकत्रित केले. (३) **उत्तरार्धात** अनुभूत व अनुभाव्य मंत्राचे त्याचप्रमाणें (४) देवदेवतांची उपासनापद्धति, (५) श्रीसप्तशती व श्रीसूक्त याची उपासना पद्धति, (६) नवग्रहोपासना आणि गारुडविभाग या सर्वांच एकत्रीकरण केलें. (पूर्वीच्या आवृत्तींत ह्या सर्व गोष्टी इतस्ततः विखुरलेल्या होत्या.) (७) उत्तरार्धातील प्रत्येक प्रकरणाच्या प्रारंभीं वाचकांसाठीं त्या

विषयाचा परिचयात्मक भाग लिहिला. (८) पूर्वार्धामध्यें प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं 'अमृतमंजिरी' नावाचीं अति उद्बोधक सुवचनें प्राचीन भारतीय अस्मितेची जाणीव रहावी म्हणून दिलीं आहेत. (९) इस्लामी, याहुदी व खिस्ती या धर्मीयामधील मंत्र व यंत्रप्रतीकें ह्यासंबंधीं उद्बोधक माहिती दिली आहे. ही माहिती पूर्वावृत्तींत नव्हती. **असामान्य विशेषता :** (१०) प्रत्येक विषय वा प्रकरणातील मूळची माहिती जागोजाग भरपूर टीपा देऊन शक्य-तितकी अद्यतन ठेविली आहे. (११) पाश्चिमात्यांचे बहुतेक अद्यतन नवविज्ञान एकदेशीय व प्राचीन भारतीय ज्ञानाच्या मानानें किती थिटें आहे हें तुलना करून साधार दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. (१२) साधक, उपासक, व मनानें पाश्चात्यीभूत झालेले वाचक ह्यांचे डोळे उघडावे म्हणून भारतीय आचारविधींमागील विज्ञानाचें थोडें अंजन घालण्याचाही प्रयत्न केला असून (१३) सर्वांना उपयोगी अशा विचारप्रवर्तक मार्गदर्शनपर सूचना दिल्या आहेत. 'यद्रोचते तद्ग्राह्यम्' ही विनंति.

साराश, अशा रीतीनें गुरुजींनी सोंपविलेली त्यांच्या एका ग्रंथाची कामगिरी त्यांच्याच चरणीं "गुरुणा कृपया कुर्वे अल्पमतिः प्रबोधनम्" या वृत्तीनें सादर केली आहे. ती ते गोड करून घेतील ही खात्री आहे. रामं.

**संदर्भ ऋणनिर्देश**—(१) ज्या ज्या ग्रंथातून, व मासिकातून माहिती उद्धृत केली त्या सर्वांचा मी ऋणी आहे (२) श्रीयंत्र व श्री सूक्तयंत्र म्हणून मिळालेल्या छापी आकृति, या ग्रंथाच्या उपयोगासाठीं दिल्याबद्दल विद्याविनोद नाराणयशास्त्री जोशी (आजर्ले) ह्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. (४) प्रस्तुत ग्रंथाची टंक प्रत करून देणारे त्याचेच अनुग्रहीत पा. के. दातार (ठाणें) आणि अशा क्लिष्ट ग्रंथाची काळजीपूर्वक छपाई करून देणारे श्री वि. पु. भागवत व छापखान्यातील सर्व ठसे जुळारी ह्या सर्वांच्या मदतीबद्दल मी ऋणी आहें.

गो. प्र. भावे

## वाचकांसाठीं

**१) वाचकांस विनंति :** १) शुद्धिपत्राप्रमाणें दुरुस्ती करून मगच ग्रंथ वाचा. २) ग्रंथ हे मार्गदर्शक गुरू-पण त्या त्या मंत्रांत वा शब्दोच्चारात तज्ज्ञ उपासकाच्या वाणींतून ऐकिल्यावरच जिवंतपणा येतो, म्हणूनच गुरुमुखा शिवाय घेतलेला मंत्र फलदायी होत नाहीं ३) पाठादिक ग्रंथवाचनानें व पारायणें करण्यानें क्रमाक्रमानेंच मन व बुद्धि ह्यांमध्यें जागृति होते, जाणीव होते मगच आचार प्रचोदना होते. ४) त्यासाठींही **कृतितज्ज्ञ गुरु हवाच.** केवळ ग्रंथ वाचनानें ज्ञान मिळतें पण अनुभव मिळत नाहीं. ५) मंत्रानुभव आल्यास तो जरूर कळवा ही विनंति.

**२) वाचकांसाठीं विचारधारा :** १) सारें विश्व गणिताच्या नियमांवर चाललेलें आहे २) वैदिक मंत्र जागृत ठेवणाऱ्यांची जरुरी आहे ३) देशाच्या गुलामगिरीपेक्षां मानसिक गुलामगिरीच घातक व नुकसानकारक असते ४) शीलसंवर्धन करणारें तेंच सुशिक्षण होय ५) ब्रह्म हें अ-ज आहे ६) आकाश-अवकाश-पोकळी हें विश्वव्यापक तत्त्व आहे. पण तें ब्रह्म नव्हे ७) तत्त्वज्ञान हें मानवी जीवनाचें उत्तर आहे ८) 'सहनाववतु सहनौभुनक्तु व तेजस्वीनावधीतमस्तु । मा विद्विषावहै सर्वे सुखिनः संतु' हें आर्य ऋषींचें जीवन होतें. ह्यात नाहीं असा कोणता जीवन विज्ञानवाद आहे ? ९) 'त्यक्तेन भुंजीथाः (प्रथम द्या व मगच घ्या) ह्यात विश्वशांतीचीं बीजें आहेत. कोणता समाजवाद इतका व्यापक आहे १०) वर्णशुद्धि, जातिशुद्धि, कुलशुद्धि ह्या गोष्टी स्त्रियांच्याच स्वाधीन आहेत. ११) स्त्रियांची स्थिति (शारीरिक व मानसिक) हा समाजस्थितीचा निकषग्रावा आहे. १२) मेधा व प्रज्ञा ह्या स्त्रियात उपजतच असतात. १३) गुलाब पुष्पाचें गुलाबत्व रक्षण करण्यासाठींच जसे त्याच्या भोंवतीं काटे असतात, तसेच स्त्रियांवरील निर्बंध हें त्यांच्या 'स्त्रीत्वा'चें रक्षण करण्याकरिताच असतात. ते त्यांना गुलामगिरींत ठेवण्यासाठीं नसतात. १४) स्त्रियांतील गुप्त व सुप्त दैवी तेज प्रगट होण्यासाठीं 'लग्न'-हा उत्तम उपाय

आहे. १५) स्त्री-पत्नी-यांचेंच नाव 'गृह-घर'. पण हें ज्या समाजात नाहीं त्या मार्गे नेहमीच घर-घर। १६) स्त्री-पत्नी-ही कामविकार जिंकण्यासाठींच असून मुलें हीं क्रोध, लोभादि विकार जिंकण्यासाठीं आहेत. १७) मुलाना केवळ विद्यावान् करण्यापेक्षा गुणवान् करणें हें ध्येय असावें १८) 'गृहिणी सचिवः सखी मिथः। प्रियशिष्या ललिता कलानिधौ' ही भारतीय स्त्रीत्वाची मांडणी १९) आपल्या वंशात सुप्रजा निर्माण व्हावी हाच विवाहबद्ध होण्याचा मुख्य हेतु २०) 'पातिव्रत्य' रक्षण हेंच भारतीयत्वाचें मुकुटमणि वैशिष्टय आहे. २१) 'पवित्रता न स्यात् केवल योनि रक्षणात्' २२) स्वयपाकगृह, स्नानगृह व बागबगीच्या ह्यातील कामाइतका स्त्रीच्या आरोग्यासाठीं दुसरा श्रेष्ठ व्यायाम व उपाय नाहीं. (२३) यज्ञोपवीत धारण हें भारतीय राष्ट्रीय एकात्मतेचें प्रतीक आहे. (२४) सध्याविधीनें कुळपरपरा टिकविता येते. (२५) थोडा वेळ तरी स्वस्थ बसण्याचा रोज अभ्यास करा. व चमत्कार पहा.

**पूजोपचारासंबंधीं कृति खुलासा :** पत्रपुष्पें कोणतीं कशीं वहावीं धूपदीप कसे ओवाळावे, नैवद्यपदार्थ कसे अर्पावे इत्यादि बाबतींत प्राचीन ऋषीमुनींनीं दूरदृष्टीचे व्यवहार व आरोग्य ह्याचा सबध लक्षात घेऊन त्याचा उपयोग सांगितला. ती माहिती उपासक व साधक याना उपयोगी पडावी ह्या हेतूनेच येथ दिलेली आहे.

(१) **पुष्पार्पण :** मध्यमा तर्जनी व अंगुली ह्यानीं उचलून फुलाचा देठ भाग करून तें वहावें. पत्र : दुर्वे या उताणें देवतेकडे देठ करून वहावें. तुळस बेल, दूर्वा उचान व आपल्याकडे टोकें करून वहावीं. अनुचान (उताणें नव्हे) वहावें असे काहींचें मत आहे. देवदेवतेला वस्त्र पुष्पादिकानीं सजविल्यानंतर ती देवदेवता ध्यानयोग्य व शोभिवत दिसावी हा हेतु. फल : फळाचें मुख देवाकडे करावें. धूप : उत्तम गुग्गुळाचा वा दशांगधूप (कृष्णागरु-चंदन, कापूर इत्यादि) सुवासिक व उत्तम पदार्थांचा असावा. आरती देवाच्या नाभीपासून दृष्टीपर्यंत तीनदां वा पांचदा ओवाळणें व तीहि सांप्रदायाप्रमाणें. **पंचारती** मात्र देवतेच्या पायापासून मस्तकापर्यंत तीन पाच किंवा नऊ वेळा ओवाळावी. **नैवेद्य :—** अर्पित पदार्थावर तुळशीपत्र ठेऊन धेनु मुद्रेनें दृष्टि बंद करून देवतेचें स्वरूप ध्यानात आणून डाव्या हाताचा आंगठा वर उभा केलेली मूठ हृदयाला टेकून अर्पावा. ताम्बूल घस्यतो त्रयोदश गुणी, (शिराळादीलेला पान, सुपारी-

सळी, चुना, खैर कात, केशर, कस्तूरी वा खोबरें बदाम, कंकोळ, जायपत्री, लवंग, वेल्ची, वर्ख, जायफळे,) **नमस्कार**–दंडवत, पचाग (हात, पाय, मस्तक, वाणी, बुद्धि) वा अष्टाग (वरील पाच अगें व छाती, दृष्टि व गुडघे टेकून करावा.) **प्रदक्षिणा** सावकाश, पाऊल न वाजता वाणीनें अर्थलक्षी नामोच्चार करीत. गणपतीला १ वा ३, शकराला साडेतीन-सोमसूत्री; विष्णूला चार, सूर्याला दोन वा सात, अबेला एक. अश्वत्थ सात. प्रदक्षिणेचा प्रारम देवाच्या उजवीकडून. (जास्त माहिती तृचाकल्प, ज्ञानार्णव वा मन्त्रमहोदधि इत्यादि ग्रंथातून पहावी.)
या प्रत्येक विधीमार्गें, तसेच देवदेवताना वहावयाचीं पत्र पुष्पें व नैवेद्याचे योग्यायोग्य पदार्थ ह्या विधीमार्ग देह, आरोग्य व अतर्मन ह्यासबधें फार मोठें विज्ञान भरलेले आहे.

ह्या सर्वांचा विचार येथें करणें अप्रस्तुत. परतु भारतीयाचें सर्व कर्मकाड विज्ञानातून ब्रह्मज्ञानाकडे नेणारें असून अखेरीस ते ब्रह्माडात विलीन होऊन जातें. तथापि तें केव्हाही जागृत होऊ शकतें. **तेथें नष्ट न होतां विलीन होतें म्हणजे ब्रह्मार्शी एकरूप होऊन जातें, हा अर्थ—**

**मंत्रशास्त्रांतील कांही संप्रदाय :** सप्तशतीचे पाठ करिताना पोथीचीं पानें उलटतांना (१) तीं एकामागून एक वाचकानें आपल्या आगावर, उलटून वाचीत जाणें ह्या पद्धतीला 'गौडपादीय संप्रदाय' असे म्हणतात व (२) याच्या उलट पोथीचीं पानें वाचकान आपल्या समोर उलटून मत्राचा पाठ करावयाचा ही दुसरी सामान्य पद्धत आहे. अशाच रीतीनें मंत्रशास्त्राचेही भारतात तीन मुख्य सप्रदाय आहेत. ते असे—केरळीय सप्रदाय, काश्मीरी, व गौड सप्रदाय. वैदिक धर्मावलंबी मानिक केरळीय ग्रथचे आहेत. केरळीय सप्रदाय हा मिश्रमार्गी संप्रदाय आहे, म्हणजे यात मुख्यत. दक्षिणमार्गी अर्थात् सव्य सात्विक मार्गीय मत्रोपासना असून वाममार्गीय मत्रोपासनाही आहे. पण ती वाममार्गीय मत्रोपासना उघडपणें नव्हे, तर छुप्या वा गुप्त मार्गानें थोडी चालते. या मार्गातील साधक महालक्ष्मीसारख्या देवतांचे उपासक असून क्वचित् तामसी मत्रोपासना पण करितात, म्हणून हा सप्रदाय मिश्रवादी सप्रदाय म्हटला जातो. कारण वाममार्गीयांचे पचमकार जरी उपयोगिले जात नाहीत, तथापि त्याचे प्रातिनिधिक पदार्थ उपयोगिले जातात.

काश्मीर सम्प्रदायी मंत्रोपासक सरस्वतीसारख्या सात्त्विक देवताची उपासना करितात. गौड सम्प्रदायी भैरव, तारा, काली इत्यादि तामस प्रकृतीच्या वा त्या देवतांची उपासना करितात.

तसेच मंत्रशास्त्रामध्ये वेदागम, बौद्धागम, जैनागम असेही तीन भेद आहेत. जैनागम प्रणाली दक्षिण सव्यमार्गी असून काश्मीर सम्प्रदाय-प्रधान आहे. बौद्धागमी मंत्रप्रणाली, मुख्यतः वाममार्गी असून गौड-सम्प्रदाय-प्रधान आहे. आणि वेदागम मंत्रप्रणाली, केरळ सम्प्रदायप्रधान आहे. या सर्व संप्रदायांत गुरुदीक्षा हें मुख्य अंग आहे. (गोपाल प्रसादजी वद्री—उपासनांक १९६८)

**मंत्रशास्त्रांतील कांहीं आधारभूत ग्रंथांचा खुलासा :** आधारभूत ग्रंथांच्या नावापैकीं कांहीं नावावरून त्यांतील विषयासंबंधानें पूर्ण कल्पना येत नाहीं. म्हणून त्यांपैकीं कांहींचा जरूर तेवढा खुलासा येथे करणें योग्य व जरूर आहे. तो असा—

**(१) कल्प-ग्रंथ :** ज्या ग्रंथामध्यें, मंत्र-विधान, यंत्रविधान, मंत्र-यंत्रोद्धार, बलिदान, दीपदान, आवाहन, पूजन, विसर्जन व साधना इत्यादि विषयाचें वर्णन दिलेलें असत, त्या ग्रंथाना 'कल्प-ग्रंथ' असें म्हणतात.

**(२) तंत्र-ग्रंथ :** ज्या ग्रंथामध्यें गुरु-शिष्य-संवाद-रूपानें अथवा शिव-पार्वती यांच्या संवादरूपानें मंत्र, यंत्र, तंत्र व औषधिवल्ली वा वनस्पति व त्यांचे गुण यांचे वर्णन आहे. त्या ग्रंथाना 'तंत्र-ग्रंथ' म्हणतात; तंत्र म्हणजे कृति करण्याची पद्धति.

**(३) बीज-कोश :** मंत्राचे पारिभाषिक शब्द, त्यांचे अर्थ व खुलासा व्याख्या इत्यादि गोष्टी ज्या ग्रंथांत दिलेल्या असतात त्यांना 'बीज-कोश' किंवा 'मंत्र-कोश' असें म्हणतात.

**(४) पटल-ग्रंथ :** आराध्य देवदेवतासंबधानें मंत्र, यंत्र, साधनें व साधना-विधि, तसेंच, मंत्रभूमिकेचें वर्णन किंवा काम्य-कर्मांत निष्णात कसें व्हावें इत्यादि माहिती देणाऱ्या ग्रंथाना 'पटल-ग्रंथ' असें म्हणतात.

**(५) पद्धति-ग्रंथ :** ज्यांमध्ये देवदेवतांच्या साधनेसंबंधानें वर्णन केलेलें असतें, त्यांना 'पद्धति-ग्रंथ' असें म्हणतात.

# प्रस्तावना

## (तृतीयावृत्तेः)

श्रीगुरुगणेशाय नमः

अखण्डं ब्रह्माण्डं सृजसि विनिहंसि क्षणलवात्
अतो गायन्ति त्वां कतिचन चिदानन्दलहरीम्
अथ त्वं मां मुक्त्वा चरणशरणोऽहं तव शिवे
ददासि प्रेम्णा मां जननि तव सायुज्यपदवीम्

अखिल–ब्रह्माण्डोदर–जगद्धलामभूत–श्रीमहा–भट्टारिका–श्रीमहा–त्रिपुर सुंदरी–कृपापीयूषलहरीलवप्रतापात् अस्य मंत्रशास्त्रग्रंथस्य पंचदशवर्षानंतर तृतीयसंस्करणं भक्तानां वाचक–वृन्दानां च पुरतः महाराष्ट्रभाषायां प्रकटी क्रियते। अन्यथा तस्य ग्रंथस्य प्रकटीकरणं अशक्यमेव संजातमासीत्।

## मंत्रशास्त्र

औपपत्यनुभवाविवरणात्मकमंत्रशास्त्रग्रंथ प्रस्तुतमंत्रशास्त्रसमानं कुत्रापि न दृश्यते। पूर्वस्मिन् काले श्री ११०८ विद्यारण्यस्वामिभिर्मंत्रशास्त्रग्रंथो निर्मित इति श्रूयते, परं स न दृष्टिपथं याति, तथैव श्री त्रिपुरसुंदरीप्रसादात्-कृते श्रीमद्भास्कररायमहाशयैरधुना शतवर्षात्प्राक् "सौभाग्य चंद्रोदय" इति मंत्रशास्त्रग्रंथ निर्मितः, परं स ग्रंथोऽपि न प्राप्यते। अस्माभिरतत्प्राप्तये बहुविधाः प्रयत्नाः कृताः। प्राप्तो भवेत् चेत्तस्य प्रकटनार्थमचिरादभिलाषा वर्तते।

## मंत्र–महिमा

श्रीभगवता नारायणेन श्रीकृष्णरूपं धृत्वा स्वकथितायां भगवद्गीतायां आर्ता जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानीति च चत्वारः सुकृतिनो भक्ताः कथिताः। तत्र अचला श्रद्धा कस्य कुत्र भवतीति विषयमधिकृत्य—

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तां एव विदधाम्यहं ॥**

इत्युक्तवान् स्वयं भगवान्। अस्मिन् कराले कलिकाले दैनंदिनीया जीविका संपादयितुमपि बहवो जना असमर्था सञ्जाताः। धर्मशास्त्रादि-ग्रंथेषु ऐहिकामुष्मिक–सौख्य–प्राप्त्यर्थं, धर्मार्थकाममोक्षादिपुरुषार्थानां साधनं कर्तव्यं इति आदिष्टम्। परंतु धर्ममोक्षविषयकं साधनं अर्थं कामं च विहाय कैश्चिदपि कर्तुं नेष्यते इदानीम्। अर्थकामपुरुषार्थेषु एव सर्वेषां जनानां प्रवृत्तिः। तत्प्रवृत्तिपुष्ट्यर्थं कैश्चित् "यया कया च विधया बहुद्रव्यं प्राप्नुयात्" इति वाक्यं पुरस्क्रियते। परं च तद्वाक्यस्य पूर्वे सदर्भे उपरिनिर्दिष्टबहुद्रव्यप्राप्तिस्तु नीतिधर्मविहितकर्माचारान् अनुलङ्घ्य कर्तव्या इति विवेचनं वर्तते।

अर्थनामकस्य पुरुषार्थस्य साधनं प्रथमं कर्तव्यं इति मनीषा चेत् शरीर-मनोबलप्राप्तये भगवद्गीतायां 'बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितं' इत्युक्तं। अतो बलप्राप्तये अर्थप्राप्तये च भगवदुपासना अवश्यं कर्तव्या। सा तु मन्त्रानुष्ठानेन सुसाध्या भवति। मन्त्रोच्चारणसमये मन्त्रस्थितवर्णानां यथार्थानुपूर्व्यात्मकेनोच्चारणेन मन्त्रशक्तिरुत्पद्यते। सा शक्तिस्तु द्विविधा। इष्टफलप्रापिका प्रारब्धकर्मविहितानिष्टफलविनाशिका च मन्त्रोच्चारण–समये साधकस्य चतुर्षु दिक्षु अनुकूलकिरणशलाकानां कवचं समुत्पद्यते। यथार्थमन्त्रोच्चारणात् मन्त्रप्रकाशलहरीणां तेजोवलयं च समुद्भवति। तस्य तेजोवलयात् बाणसदृशाः किरणशलाका उत्पद्यन्ते तथा खेटाकृतयश्च। बाणाकृतिशलाकाभिर्मन्त्रोच्चारणकर्तुं चतुर्षु दिक्षु पंजरं समुद्भवति, तथा च अनिष्टग्रहोत्पन्नकिरणशलाकानां निर्मूलनं खेटकरक्षणाकृतिभिः संपद्यन्ते। एतत्सर्वं मन्त्रजपकर्तुं कवचरूपं भवति।

मानवेन प्रपंचशकटं वोढुं स्वसामर्थ्येन धर्मानुकूलाचारेण अर्थसंपादनं कर्तव्यमिति पूर्वं कथितम्। धनसंपादनं विना अस्मिन् समये सर्वेषां जनानां मनसि द्वौ प्रश्नौ समुपस्थितौ भवतः। मनःस्वास्थ्यं कथं लभेदर्थसाधनं च कथं स्यादिति। अर्थसाधनेन विना मनःस्वास्थ्यं न लभ्यते। अर्थसाधनावाप्तये

एतद्ग्रंथस्य पूर्वमुद्रितायां द्वितीयावृत्तौ द्रव्यप्राप्तिसाधनानि न प्रदर्शितानि। पर च अस्मिन् दशवर्षीये काले सकलजनाना मनसि धन कथ प्राप्येतेति महान् कोलाहल समुद्भूत इति दृश्यते। अतोऽस्य ग्रंथस्य अस्मिन् तृतीये संस्करणे धनसपादनार्थं बहवो मत्रा, अनेकानि यत्राणि, स्तोत्राणि, मत्रसिद्धिसाधनानि, पुरश्चरणानि, पुरश्चरणविषयश्च अनेका प्रपचिता। कामपुरुषार्थ–सिद्धये यथाभिमतवरप्राप्त्यर्थं अभिमतकामिनीप्राप्त्यर्थं तथा च पतिपत्न्योर्मध्ये सहायपिशाचिकया सजातस्य दौर्मनस्यस्य निराकरणार्थं, पितापुत्रयोर्मध्ये सजातकलुषभावनाशनार्थं उभयोर्मध्ये सौहार्दप्राप्तये मत्राणा प्रकटीकरण कृतम्। दवतोपासनया देवताप्रसादप्राप्त्यर्थं तथा देवतादर्शनात्मकसगुणसाक्षात्कार-प्राप्त्यर्थं आत्मानात्मसाक्षात्कारदर्शनार्थमपि मत्रपुरश्चरणानि अत्र सगृहितानि।

मत्रसिद्धिप्राप्त्यर्थं बहवो निबधा सन्ति। निर्बंध विना देवतासामीप्य कथ सिद्ध्यतीति प्रश्नकर्तारो बहव आसन् सति च, पर बधन विना न किंचिदाप्यते इति सत्यमेवास्ति। व्यवहारेऽपि बहूनि बन्धनानि सन्ति। तान-विगणय्य व्यवहारस्य सिद्धिरपि न भवति। अस्य उदाहरण द्रष्टव्यम्। मोह मय्या दुग्धप्राप्तये पडवादनपूर्वमेव गतव्यम्। अन्यथा शुद्धदुग्धप्राप्तिर्न भवति। नियमोल्लघनस्य फल एकमेव भवति। इष्टफलप्राप्तये मत्रजपविषये नानाप्रकारका नियमा वर्तन्ते। बन्धनाना नियमाना पालन च यदि न स्यात् तर्हि मत्रफलप्राप्तिरपि नैव भवत्। कानि बधनानि के च नियमा इति ये पृच्छन्ति तेषा समाधानार्थं अधोलिखित अत्र वक्तुमिच्छाम। आधुनिका भारतवर्षीया वैदिकधर्मिणा कुलजा जना अपि तिलक–यज्ञोपवीत–शिखाविहीना चित्रपटदर्शनव्यसनिन सजाता। एतानि विरुद्धाचरणानि त्यक्त्वा यदि तै वर्णाश्रमधर्मानुकूलानि आचरणानि श्रद्धापूर्वक अनुष्ठीयन्ते, मत्रानुष्ठान वा क्रियते, तदा तत्रामैहिकामुष्मिकोन्नति असशय भविष्यति। सामान्याचरणविधिना यदि मत्रसिद्धिर्न भवति तर्हि किं कर्तव्यमिति सदेहेऽस्मिन् ग्रथे कानिचित्साधनानि विशेषरूपेण निदर्शितानि। तथापि अन्यानि साधनान्यपि यानि अन्येषु ग्रथेषु सन्ति तान्यपि सगृह्यन्तेऽधोलिखित-व्याकावल्यां।

"द्रावणं बोधनं वश्यं पीडनं शोषपोषणम्।
दहनान्तं क्रमं कुर्वंस्ततः सिद्धो भवेद् ध्रुवम् ॥
द्रावणं वारुणे बीजे ग्रंथनं क्रमयोगतः
सन्मात्राद्यन्तमालिख्य शिलाकर्पूरकुंकुमैः ॥
उशीररोचनाभ्यां च मंत्रं संग्रथितं लभेत्।
क्षीराज्यतोयमधुभिर्मध्ये तं लिखितं क्षिपेत् ॥
पूजनाज्जपनाद्धोमाद् द्रावितः सिद्धिदो भवेत्।
द्रावितोऽपि न सिद्धश्चेद् बोधनं तस्य कारयेत् ॥
सारस्वतेन बीजेन सम्पुटीकृत्य संभवेत्।
एवं बुद्ध्या जपेत् सिद्धो नो चेत् तन्तु वशीकुरु ॥
आरक्तचंदनं काष्ठं हरिद्रा मदनं शिला।
एतैस्तु मंत्रमालिख्य भूर्जपत्रे सुशोभने ॥
धार्यं कंठे भवेत् सिद्धो वशमेतत् प्रकीर्तितम्।
वशीकृतो न सिद्धयश्चेद् पीडनं तस्य कारयेत् ॥
अधरोत्तरयोगेन यदा तु परिजप्यते।
ध्यायीत देवतां तद्वदधरोत्तरपूरिणीम् ॥
विद्यां महिपिदुग्धेन लिखित्वाऽऽक्रम्य चांघ्रिणा।
तथा भूतेन मंत्रेण होमः कार्यो दिने दिने ॥
पीडितो लज्जयाविष्टः सिद्धः स्याद्वाथ पोषयेत्।
नित्याय त्रैपुरं बीजमाद्यन्ते तस्य योजयेत् ॥
गोक्षीरैर्मधुनालिख्य विद्यां पाणौ विधारयेत्।
पोषितोऽयं भवेत सिद्धो नोचेद् कुर्यात्तु शोषणम् ॥
द्वाभ्यां द्वाभ्याञ्च बीजाभ्यां मंत्रैः कुर्याद् विदर्भणम्।
एषा विद्या गले धार्या लिखित्वा वटभस्मना ॥
शोषितोऽपि न सिद्धश्चेद्दहनीयोऽग्निबीजतः।
आग्नेयेन च बीजेन मंत्रस्यैकैकमक्षरम् ॥
आद्यन्तमध्य उर्ध्वं तु योजयेद्दाहकर्मणि।
ब्रह्मवृक्षस्य तैलेन मंत्रमालिख्य धारयेत् ॥

कंठदेशे ततो मंत्रसिद्धिः स्याच्छंकरोदितम्।
इत्येवं सर्वमंत्राणामुपायः शम्भुनोदितः॥

मन्त्रोच्चारणे यथा देवताया मूर्तय उत्पद्यन्ते तथैव तत्तद्देवतायन्त्राण्यपि समुद्भवति। यन्त्रोत्पत्तिस्तु प्रथमोत्पत्तिः। गृहारामाणा निर्माणसमये प्रथमतो व्यवहारे भाविगृहारामस्य रेखाकितचित्र निर्मीयते, तदनन्तर गृहारामाणा निर्माणं तथैव प्रथमत' तत्तद्देवताना रेखाकितं चित्र समुद्भवति तदन्तर देवताना सर्वावयवात्मिका मूर्तिरापातत प्रकटीभवति। पूर्वैर्ऋषिभिरुपासनासमये यानि यन्त्राणि तेषा दृष्टिपथे आगतानि तथैव तैर्नानाप्रकारकाणि यन्त्राणि शिष्येभ्यो दत्तानि गुरुशिष्यपरपरया प्राप्तानि यन्त्राणि वर्तन्ते। तान्येवास्मिन् सस्करणे समुल्लिखितानि।

अस्त्रविद्या। अस्त्रविद्यात्मको मन्त्रराशिस्तु कथितोऽस्मन्मन्त्रशास्त्रग्रन्थे। पाश्चात्याना अणुध्वनिप्रयोगे कर्ताणुध्वनिक्रियां परिवर्तयितु न शक्नोति पर चास्त्रविद्याकर्मणि यद्यकदाचिदस्त्रोपसहार. प्रशस्त. स्यात्तदास्त्रोपसहरण कृत्वास्त्रपरिणाम निवर्तयितु शक्नोति। ब्रह्मास्त्रप्रयोग कृत्वा यदि प्रयोगात्मकसहारमपनेतुमिच्छति। अस्त्रोपसहरण कृत्वा ब्रह्मास्त्रसहारमपनेतुमचिरात् संहारप्रतिबंधो भविष्यति। अग्न्यस्त्रप्रतिशमार्थं वारुणास्त्रप्रयोग उपदिष्टः। एषा तु पौर्वकालिकी वार्ता। अधुना एते प्रयोगाः खपुष्पवत् इति कचन वदेयु.। वदन्तु, नास्माक तेन काचिदपि हानि.। उत्कटप्रयत्नात्साध्यन्तिऽसाध्यानि कार्माणि। तत्र न कोऽपि सदेह.। सभास्तभन वाक्स्तभन सभागतानां जनानां तत्र स्थाने स्तभन भवितु शक्यते प्रयोगान्तेरण। धूम्रोत्पत्तिकारका धूमावतीप्रयोगा वर्तते। शतवर्षात्पूर्वं ग्वाल्यिरनगरे तत्रस्थिताथर्वणवेदीयमान्त्रिकेण धूमावतीप्रयोग कृत येन समागता सैनिका धूमेनाधीकृता तेषां पुरोगमन स्थगित कृत। उपरिनिर्दिष्टप्रकरणे व्यावहारिकी मत्रसामर्थ्यदायिनी क्रिया प्रकटिता मत्रोपासनया; केषाचित् श्रीभगवतीपूजाप्रसगे सुगधितपुष्पाणा धूपाना च सुगधप्राप्ति भवति। कर्पूरसुगधधूपसुगंधादिद्रव्याणामभावेऽपि तत्तद्वस्तुसुगधप्राप्ति सपादिता भवति। श्री भगवती-श्रीगणेश-श्रीशंकर-श्रीबटुक-भैरवादिदेवतानां प्रत्यक्षदर्शनानि सजातानि।

कथा भाविकाना नानासकटात् निर्मुक्ति. सजाता। "मत्रसिद्धिस्तु केरल इति" प्रवाद सत्यमेव मद्रासप्रान्ते सेलमनगरे अस्ति। अस्मत् समीपे कश्चिन्महान्पदस्थो मुमुक्षु सप्राप्त स तस्य भायामोहनमपनेतु प्रार्थयामास श्री हनुमत्प्रसादात्तस्य मोहन निर्वीर्यं जातम्। तस्य भार्या प्रतिमास भर्तुवचनात् चतु शतरुप्यक स्वभगिन्यै प्रेषितवती।

मत्राणा पुरश्चरणात्प्राक् श्रीगायत्रीमत्रस्यायुतजप कथितस्तथैव यत्राणा लेखन सहस्रवार कर्तव्य। बृहद्यत्राणा लेखन शतवारमेवोच्यते। अस्मिन् ग्रथे सप्तशतीमत्राणा कतिचनमत्रा शारदापीठस्थाऽस्मत्परमेष्ठिगुरु कै वा श्री १०८ त्रिविक्रमतीर्थाना मत्रसग्रहात् सप्राप्ता। कै वा रत्नलामस्य लालजीमहाराजाना अक्षसग्रहात् अक्षमत्र समुद्धृत। ब्रह्मास्त्रादि–अस्त्रमत्राणामुपसहारमत्रा श्री कै वा विष्णुतीर्थाना भ्रातृणा श्री अखडानदतीर्थाना सग्रहात् सगृहीता। श्री सूक्तातर्गतमत्राणा यत्राणि बेळगावस्य श्री रामचद्रबळवतकुलकर्णीना सग्रहात् प्राप्तानि। द्रावण बोधनादिश्लोकसमूह गोडरसशालया मुद्रितरसमालास्थितमत्रखडात् सगृहीत। तत्तुगाडलस्थभुवनेश्वरीपीठस्थ आचार्य श्री १०८ श्रीचरणतीर्थाना सकाशात् प्राप्त। ज्योतिषाचार्य हिमतराम महाशकर जानि (कणावतिनगरस्थ) तथा परमहस परिव्राजकाचार्य श्री १०८ श्री नारायणानद यतिस्वामी तथा श्रीमत राजश्री नारायणशकर गुप्ते तथा श्रीमत राजश्री नरहर खडेराव क्षीरसागर एतेषा सर्वेषा सज्जनाना कृपयैते मत्रयत्रादि सग्रहा सप्राप्ता। वयमेतेषा महाभागाना महत उपकारान् प्रकटीकुर्म। एतद्ग्रथस्य अस्मच्छिष्यैर्लिखितानि मत्रपत्राणि बहुशोऽशुद्धानि लिखितान्यासन्। पर च तेषा मुद्रणसमये महामहोपाध्यायपण्डितसातवळे करमहाशयैर्मत्रशुद्ध्यर्थं अतीवपरिश्रम कृत तेषामपि परिश्रमसहाय वर्णितु न शक्यते। प्रस्तुत–ग्रथे स्थिताना मत्राणा विवरणात्मकानि शताधिकचित्राणि सचित्रितानि। तत्कार्यार्थं बहव प्रयत्ना कृता द्रव्यव्ययश्च बहुतर जात। एतद्ग्रथनिर्माणकालेऽस्म च्छरीरोपरि बहुविधरोगानामाक्रमण जातम्। बहुविधास्त्रुटय अस्मिन् ग्रथे वर्तन्ते, तदर्थ वाचकवृदाना पुरस्तात् क्षमा याच्यतेऽस्माभि। अततोऽस्मद्गुरुश्रीभारती कृष्णतीर्थमहाशयानाऽस्मत्पीठदेवता

श्रीराधाकृष्णस्वामिना तथा श्रीमद्द्वारिकामहात्रिपुरसुदर्या श्रीकोल्हापूरस्थश्री-महालक्ष्मी प्रसादेनैव मत्रगाास्त्रग्रंथ. समाप्ति गत इति। तान् सर्वान् नमस्कृत्य दण्डप्रणिपत्य विरमामि।

योगेश्वरानंद तीर्थः
श्रीमत् जगद्गुरुश्रीशंकराचार्यः
प्रथम श्रीशारदापीठाधीश्वरः अनंतरं
श्री गोवर्धनपीठाधीश्वरः (पुरी मठ)



# मराठी प्रस्तावना
(तृतीयावृत्तींतील)

उषादेवी या साऽवनयति जनानां गद्चयाम्
उषःकाले मुंचन् कुमुदपिहितं भ्रामरकुलम्
क्षुणद् विप्रौघानां निखिलदुरितान् वेदविदुषाम्
चिरं वः सौहार्दं वितरतु परब्रह्ममहिषी॥ (स्वकृत)

ह्या अखिल ब्रह्माण्डात महाकालकीडेनें प्रत्येक वस्तुजात अवस्थात्रयीच्या बंधनात निगडीत झालेलें आहे. अर्थात् आब्रह्मस्तंबपर्यंत प्रत्येक पदार्थाला उद्यकाल, मध्यकाल व अस्तकाल असे तीन काल लागू आहेत. आज आपल्यापुढें जें जगत् दृग्गोचर होत आहे त्याची परिस्थिति "नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण" या न्यायानें उच्चावचत्व स्थितीला प्राप्त असते, असें आपल्या अवलोकनात येत असतें. जेथें महान् उदधि असतो, तेथें पर्वतराजी उत्पन्न होते; जेथें अधित्यका असेल तेथे उपत्यका झालेली दिसून येतें. जेथें महान् अरण्य असेल तेथें सरोवर उत्पन्न होतें. जें राष्ट्र सुधारणेच्या उत्तुंग शिखरावर पोहोंचलेलें असेल, तें खाल्डियन, अटलांटियन किंवा मोहेनजोडारो येथील राष्ट्राप्रमाणें नामशेष होऊन जातें. आणि ज्या जाती वन्यपशुप्रमाणें राहत होत्या त्या आज उच्च कोटीला पोहोंचलेल्या आहेत असें दिसतें. असा हा कालाचा महिमा आहे.

२. ह्या कालाचें मूर्तस्वरूप कोणतें असा विचार केला तर सूर्यदेवता हेंच तें मूर्तस्वरूप होय. सप्तस्वर्ग व सप्तपाताल ह्यांतील भूर्लोकाशीं तदंगभूत पातालादि लोकाशीं सूर्यदेवतेचा संबंध उत्पन्न होतो; त्यावरून उदयास्तकालाची परिमिति ठरविण्यात आली आहे. स्वर्लोकादि लोकासंबंधीं कालगणना व त्याचें उदयास्तकाल ठरविणें ही गोष्ट मानवी बुद्धीच्या आवाक्याच्या पलीकडे असल्यानें केवळ आप्तप्रमाणावरूनच तिची अस्पष्ट कल्पना करितां येते. ह्या भूर्लोकात राहून "रमणीय चरणा रमणीयां योनिमापद्यन्ते, तथाच कपूयचरणा कपूयां योनिमा

पद्यन्ते, देवयोनिं चाण्डालयोनिं सूकरयोनिं वा। "उपनिषद्" त्रैविद्या मां सोमपाः पूतपापाः। यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते। ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्, दिवि देवभोगान्। ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं। क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति। (भगवद्गीता अध्याय ९, २०।२१). प्राप्य पुण्यकृतान् लोकान् उषित्वा शाश्वतीः समाः।" (भगवद्गीता अध्याय ६ श्लोक ४१). अशा प्रकारच्या औपनिषदिक विचारपरंपरेनें व पौराणिक विचारपरंपरेनें पाहता यज्ञयागादिक कर्में करणारे स्वर्गलोकाला जातात व पुण्यकर्मभोगाचा काळ संपल्यावर पुन्हा भोगायतन अन्नमय शरीर धारण करून भूलोकात जन्माला येतात, असे आधार सांपडतात. परंतु स्वर्गलोकात वास करण्याची कालगणना किती असते, याचा अद्यापि विचार स्पष्ट माझ्यात आलेला नाहीं.

३. अलीकडे अस्तित्वांत आलेल्या परलोकविद्या शास्त्राप्रमाणें (Spiritualism) प्रयोग झाले आहेत व होतही आहेत. त्यावरून असे दिसून येतें कीं, रोमन व ग्रीक साम्राज्याच्या वेळीं मृत्युलोकात पाञ्चभौतिक देहानें वावरत असलेले जीवात्मे, तत्कालीन देशस्थिति, लोकांच्या चालीरिती, पोशाख, पेहराव, वाहनें, राज्यव्यवस्था, मोठमोठ्या लढायातून उपयोगात आणलेलीं शस्त्रास्त्रें, कवित्व आणि वाङ्मय, सृष्टिकर्त्यांबद्दल व सृष्ट्युत्पत्तीबद्दलचे सिद्धान्त या संबंधीं जे संदेश देतात, त्या संदेशांवील माहिती हल्लीं अस्तित्वात असलेल्या ग्रंथात जी जी तत्कालीन माहिती संकलित केलेली आहे त्या माहितीशीं तंतोतंत जुळते. म्हणजे ते जीवात्मे स्वर्गात अजूनपर्यंत वास्तव्य करीत आहेत व त्यांची माहिती दोन हजार वर्षापूर्वीची आहे. अर्थातच ते जीवात्मे दोनहजार वर्षापूर्वीचे आहेत. ही दोनहजार वर्षांची गणना त्यांच्या स्वर्गादि लोकांत कशी करतात या प्रश्नाचें समर्पक उत्तर त्या जीवात्म्याकडून मिळूं शकलें नाहीं. यामुळे स्वर्गलोकांत किती अवधीपर्यंत राहता येतें याचा मागमूस लागत नाहीं. अशा कालगणनेचा सूक्ष्म व सूक्ष्मतम विचार केला व ऋग्वेदीय नासदीय सूक्ताच्या अर्थावरून पाहता काल हा अनन्त आहे. तसी वेदांची अवस्था नाहीं.

४. वेद हे त्रिकालाबाधित आहेत, अनन्त आहेत व अव्यय आहेत. तरी प्रस्तुत काळीं उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक संशोधनावरून असें दिसून येतें कीं,

वेदाभ्यास करणाऱ्याची व वैदिक ज्ञानाबद्दल अभिमान बाळगणाऱ्याची संख्या कालगतीनें कमी कमी होत चाललेली आहे व वेदाबद्दल आदरही कमी होत चालला आहे. ऋग्वेदाचा बराच भाग आज लुप्तप्राय झालेला आहे; कित्येक शाखाचे ब्राह्मण नाहींत व त्या शाखाचे ग्रंथही नाहींत शंखासुरानें वेद पाताळात नेले व श्रीविष्णूनीं मत्स्यावतार धारण करून ते परत आणले असा जो पौराणिक इतिहास उपलब्ध आहे, ती इतिहासाची पुनरावृत्ति केव्हा तरी होणार आहे, असे वाटत. कारण आजही अगस्त्यसंहिता, मयसंहिता इत्यादि ग्रंथ जर्मनांतील ग्रंथालयात सांपडतात. परंतु हिंदुस्थानांतील ग्रंथसंग्रहात मिळत नाहींत. म्हणून वेद हे त्रिकालाबाधित असूनही उदयास्ताच्या भोवऱ्यात सांपडलेले आहेत असा भास होतो. "यावज्जीव अग्निहोत्रं जुहुयात्" या वैदिक संदेशाप्रमाणें आपले पूर्वज ऋषि सांव-सरिक, द्वादशवार्षिक व शतवार्षिक यज्ञ करीत असत, व त्या यज्ञाच्या प्रारंभींची व प्रारंभापासून समाप्तिकाळापर्यंतची कालगणना ते इष्टिकाच्या व वालुकायन्त्राच्या साह्यानें करीत असत. अशा कालगणनेंत घटिका, प्रहर, दिवस, मास आणि वर्ष यांचे काल स्पष्ट समजून येत असत व या प्रमाणेंच कृत, त्रेता, द्वापार व कलियुग अशा प्रकारची युगपरिमितीही त्यांनीं करून ठेविली आहे. या युगपरिमितीत असें दिसून येतें कीं, कृतयुगात सर्वच समाज वेदज्ञानात उच्च दर्जाला पोहोंचलेला असावा असे नाहीं. त्र दर्शीं समाजातील मोठा भाग वेदज्ञाननिपुण असेल व काहीं थोडा भाग अज्ञानावस्थत ही असेल. कारण सृष्ट्युत्पत्तीबद्दल "धाता यथापूर्वमकल्पयत" असे वाक्य दिसून येतें. यावरून कृतयुगात वेदविद्येचा प्रचार उच्चतम भूमिकेचा होता व तो जसजसा कमी कमी होत जाईल तसतशी युगाची योजना त्रेता, द्वापार व कली अशी केली असली पाहिजे. कृतयुगात जसे त्रेता, द्वापार व कली या युगाना शोभतील असे काहीं पुरुष होते, त्याप्रमाणेंच हल्ली कलियुगातही कृत, त्रेता, द्वापर या युगातील स्वभावाचे मनुष्य थोडे तरी आहेत. यावरून हल्लीचा कलियुगाचा काळ म्हणजे मानवी संस्कृतीच्या दृष्टीनें वेदज्ञानरूपी सूर्याच्या अस्ताचा काळ असावा असें वाटत अशा हा अस्ताचा काळ जाऊन उदयाचा काल यावयाचा आहे. उदयकालाच्या आधींचा काळ प्रस्तुतचा असावा असे अनुमान करण्यास काहीं प्रत्यवाय नाहीं.

५. वेदांच्या उप कालाच्या पूर्वीचा काल हल्लीं आहे, म्हणजे थोडक्यात सांगावयाच तर आपण सध्या अध कारातच आहांत, असे म्हणण्यास हरकत नाहीं, हल्लीं मुद्रणकला अस्तित्वात आल्यानें वेद व वेदागें मुखोद्गत ठेवण्याची जरुरी भासत नाहींशी झाली आहे कारण उदरनिर्वाहाच्या साधनाची इतकी दुर्मिळता झाली आहे, व जीवनकलह इतका दुर्दम्य झाला आहे कीं, वेदविद्या मुखोद्गत ठेवण्याइतका अवधीच शिल्लक राहात नाहीं. पाश्चिमात्य शिक्षणानें दिशाभूल झालेल्या लोकाच्या मतानें वेद म्हणजे सृष्टयारमींच कवित्व होय. या खेरीज त्यास जास्त महत्त्व नाहीं. आर्यावर्तातील ब्राह्मणवर्गात वेदज्ञानाबद्दल जितकी उदासीनता व अनास्था आहे तितकीच किंबहुना अधिक आस्था व प्रेम शार्मण्य मात्र (German) देशीय पडितामध्ये आहे, व ती दिवसेंदिवस वृद्धिंगत होत आहे. अशा प्रकारची वेदाबद्दल अनास्था होण्याचें कारण त्याचा दैनदिन व्यवहारास काहींच उपयोग होत नाहीं असें अलीकडे दिसत असल्यान वेदाच पठनपाठन त्याज्य वाटू लागलें आहे. परतु हा अध काराचा काल आतां सपत आला आहे व अलीकडे वेदमत्र, तत्रमत्र, पौराणिक मत्र, यात काहीं तरी शक्ति असावी, परतु ती अनुभवास आणणारे कोणी दिसत नाहींत, असे अनुभवी सज्जन कोणी असतील तर पाहावें अशा प्रकारच्या विचाराचा ओघ सुरू झाला आहे. यावरून वेदवेदागाचें पुनरुज्जीवन होण्याचा उप काल समीप आला असावा अशी अस्पष्ट कल्पना उद्भूत झाल्यावरून लेखकानें मत्रशास्त्र व मत्रशक्तियोग या विषयावर लिहिण्याचा उपक्रम केला आहे. असें जरी आहे तरी "प्रयोजनमनुद्दिश्य न मदोऽपि प्रवर्तते" या वाक्याप्रमाणे वर नमूद केलेलें प्रयोजन पुरेसें व दृढबलिष्ठ नाहीं नुसत्या प्रयोजनानें एखाद्या ग्रथाची निर्मिति प्रभावशाली होईल असं नाहीं, तर प्रयोजनाशिवाय विषय, संबध व अधिकारी ह्या तीन अनुबधनाचीही एखाद्या ग्रथनिर्मितीला आवश्यकता असते; व अशा चार अनुबधाना ग्रथाच अनुबधचतुष्टय असं म्हणतात.

६. प्रयोजन—इदूर येथील प्रख्यात राजयोगी कै. वा. योगाभ्यानंद श्रीमाधवनाथ महाराज याचा व लेखकाचा गुरुशिष्यसंबध दहावर्षापासून झालेला होता. व त्यानतर चार वर्षांनीं श्रीमहाराजानीं सुचविलें कीं, योगमार्गाबद्दल काहीं

वाङ्मय प्रसिद्ध करावें. त्याप्रमाणे "श्रीसमर्थ आणि त्याचा योग" असा योगपर एक लेख लिहिला, व धुळें येथील वाग्देवतामंदिरामार्फत प्रसिद्ध झालेल्या पहिल्या वाक्कुसुमनमुक्ताहारात तो प्रसिद्ध झाला. नतर असा विचार मनांत आला कीं, आपल्या आयुर्दायाचा अभुक्त काल थोडाच राहिला आहे. म्हणून आपल्याला प्राप्त झालेलें ज्ञान श्रीसमर्थ रामदास स्वामींच्या शिकवणीप्रमाणे "जं जं आपणास ठावें। तें तें इतरास शिकवावें।" म्हणजे तं लेखरूपानें प्रसिद्ध करावें आणि जनतेपुढें तें मांडावें; कोणास तें पसंत पडो वा न पडो. "उत्पत्स्यते हि मम कोऽपि समानधर्मा कालो ह्यय निरवधिर्विपुला च पृथ्वी।" कोणीतरी आज नाहीं तर आपली कांहीं कालानें आपण जे लिहितों त्याचा चाहता निघेल या भावनेनें योग आणि तदनुषंगिक चार लेख लिहिण्याचें ठरविलें. ते असे:—कुंडलिनी शक्तियोग, प्राणशक्तियोग अथवा मंत्रशास्त्र व मनःशक्तियोग. या लेखांपैकीं पहिला लेख इंदूर येथील 'आत्मबोध' मासिकांत छापून निघाला व नंतर तोच लेख हिंदी भाषेतील प्रख्यात 'कल्याण' मासिकाच्या विशिष्ट अंकात छापून निघाला. नंतर प्राणशक्तियोग लिहून काढला व तोही आत्मबोधांत छापून निघाला व कल्याण मासिकाच्या १९४० च्या साधनांकात प्रसिद्ध झाला. वरील चार लेखांपैकीं प्रस्तुतचा लेख तिसऱ्या क्रमांकाचा आहे.

७. हा मंत्रशास्त्राचा ग्रंथ इतक्या लवकर तयार होईल अशा प्रकारची लेखमात्र आशा नव्हती. कारण त्याच्या निर्वाहाचा व्यवसाय निराळ्या स्वरूपाचा व निराळ्या विषयाचा आहे व प्रस्तुतसारखा ग्रंथ लिहिण्यास पुरेसा अवधि प्राप्त होईल व तोही लवकरच प्राप्त होईल अशी त्यास अपेक्षा नव्हती. तथापि ईश्वरी इच्छाशक्ति असल्यास प्रयासानेंही घडून न येणारें कार्य सहजासहजीं घडून येतें व अशी इच्छा होण्यास कांहीं कारणें घडून यावीं लागतात. अशीं दोन कारणें घडून आलीं. पुण्यपत्तनस्थ वेदशास्त्रोत्तेजक सभेनें आपल्या हीरक महोत्सवाच्या स्मारकाप्रीत्यर्थ एक धार्मिक स्वरूपाचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याची योजना आखली, व या ग्रंथात अनेक धर्मिक विषयांपैकीं मंत्रशास्त्र या विषयावर एक लेख असावा असें ठरवून त्या विषयावर लेख लिहिण्याची इच्छा असणाऱ्यांची माहिती वर्तमानपत्रद्वारें घोषणा करून मागविली, व त्या घोषणेंत असें सुचविलें कीं,

सभेनें नेमलेल्या समितीनें तो लेख पसंत केल्यास त्या लेखकास लेखाच्या योग्य-तेनुरूप पारितोषिक देण्यात येईल, पाच सहा महिने गेले; कोणीही लेखक तयार झाला नाहीं. सभेचे चिटणीस श्रीमंत रा. रा. बाबासाहेब जोगळेकर, बी. ए. एल्. एल्. बी. वेलबागवाले हे अशा विचारात होते कीं मंत्रशास्त्राच्या लेखाच्या अभावीं सभेच्या धार्मिक प्रभाव न्यूनता न यावी व कोणी लेखक मिळाल्यास पाहावा म्हणून ते पुणें येथील मंत्रविद्याविशारद कै. वा. रा. सीतारामपंत भट गुरुजी यांचेकडे गेले होते. त्याच वेळीं जनतेच्या आपन्निवारणार्थ ऋग्वेदातील मन्युसूक्ताचे पाठ करावे अशाबद्दल लेखकास श्रीमाधवनाथ महाराजांचा स्वप्न-संदेश झाला होता. त्या मन्युसूक्ताचें विधान समजून घेण्याकरिता लेखक कै. वा. श्री. रा. रा. सीतारामपंत भटगुरुजींकडे गेला होता तेंव्हा तेथें त्यांची व श्री. रा. रा. बाबासाहेब जोगळेकर यांची गाठ पडली. त्यावेळीं मंत्रशास्त्रावर कोणी लेखक मिळाला नाहीं असे त्यांनीं लेखकास सांगितलें. कोणी लिहिण्यास तयार होत नाहीं आणि आपणास अशा प्रकारचा लेख लिहिणेंच आहे तर आपणच ते काम अंगावर घ्यावें असें लेखकास वाटलें. व कै. वा. श्री. सीतारामपंत भट-गुरुजींनीही असें सांगितलें कीं लेखकास पुण्यास आणवून ठेवून त्यांचेकडून लेख लिहून घ्यावा व त्यांचेकडूनच हें कार्य होणार आहे. कै. वा. श्री. रा. रा. भटगुरुजींची आग्रहाची वाणी ऐकून लेखकास हा लेख लिहिण्याचें कार्य हातीं घेणें अपरिहार्य होऊन बसलें. हा लेख दहापंधरा पानांचा व्हावा अशी सभेच्या चिटणिसांची अपेक्षा होती. परंतु लेख लिहिण्यास हातीं घेतल्यावर तो लेख दोन अडीचशें पानांचा ग्रंथ होऊन बसला. वर लिहिलेल्या प्रस्तुत ग्रंथनिर्मितीला उत्तेजक होतील अशा दोन कारणांपैकी वर नमूद केलेलें एक कारण होय.

८. शके १८५७ सालीं केडगाव येथील श्री. दत्तमंदिर संस्थानचे उपासक श्री १०८ नारायण महाराज यांनीं एक मोठा धार्मिक समारंभ केला. त्यावेळीं लेखक त्या समारंभास उपस्थित होता. त्याप्रसंगीं चारी वेदांचें, अठरा पुराणांचे व भारताचें भगवत्पूज्यपाद श्रीमदाद्यशंकराचार्यांची प्रस्थानत्रयी व महाराष्ट्र भाषेतील आद्यग्रंथ ज्ञानेश्वरी इत्यादिकांचे रोज पाठ होत असत. वेदचतुष्टयातील मंत्रशास्त्राला आधारभूत असा जो आथर्वणवेद तोही श्रवण करण्याचा लाभ लेखकाला मिळाला.

त्याच वेळीं असें आढळून आलें कीं आथर्वणवेद आर्यावर्तांत लुप्तप्राय झालेला आहे. म्हणजे आथर्वणवेदी ब्राह्मण तर अनामिकेला सार्थवती करण्याइतकेच राहिले आहेत व आथर्वण वेदाचें प्रायोगिक ज्ञान तर अगदींच लुप्तप्राय झालेलें आहे. अशा परिस्थितींत ब्राह्मण्याचा अभिमान असणाऱ्याचें इतिकर्तव्य कांहीं असेल तर आथर्वण वेदाची महति ब्राह्मण वर्गापुढें मांडून त्या वेदाच्या अभ्यासाला अग्रस्थान मिळेल असें करणें हेंच होय. या हेतूनें आपल्याकडून होण्यासारखी जर कोणती गोष्ट असेल तर ती आथर्वणवेदप्रमुख मंत्रशास्त्रावर व मंत्रशक्तियोगावर चार ओळी लिहाव्या हीच होय. प्रस्तुत ग्रंथनिर्मितीला उत्तेजक होणाऱ्या अशा दोन कारणांपैकीं प्रस्तुत कारण हें दुसरें कारण होय. याकरितां मंत्रशास्त्रावर लिहिण्याचा निश्चय केला व त्या निश्चयाचें फळ म्हणून हा इतक्या पुष्कळ पृष्ठांचा ग्रंथ वाचकांपुढें येत आहे.

९. **हा ग्रंथ स्वतंत्र स्वरूपाचा नाहीं.** एखादा मालाकार ज्याप्रमाणें उद्यानांतील निवडक निवडक सुमनांचा हार तयार करितो त्याप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथांतून वेंचे काढून ते या ग्रंथांत एकत्र केले आहेत. हा ग्रंथ लिहितांना "नामूलं लिख्यते किंचित्" हें वाक्य आधारास सर्रास घेतलें आहे. संकलनचातुर्य या ग्रंथात किती प्रमाणानें साधण्यात आलें आहे हे लेखकाला अजमावतां येणार नाहीं. तें ठरविण्याचें कार्य वाचकवृंदाकडे आहे. थोडक्यांत लिहावयाचें तर हा लेखक प्रथितयश ग्रंथकार या पदवीला पोंचलेला नाहीं व ती तशी त्याची आकांक्षाही नाहीं. याकरितां भाषाशास्त्रांत प्राविण्य संपादन केलेल्या लेखकाच्या कृतींत दृग्गोचर होणारें भाषासौष्ठव, अर्थगांभीर्य, विषयपरिपोषकता, एवंविशिष्ट गुणसमुच्चय या लेखांत दिसून येणार नाहींत.

१०. हा ग्रंथ लिहिण्यासंबंधीं वर निर्दिष्ट केलेलीं कारणें असलीं तरी तीं बाह्य कारणें होत. कित्येक ग्रंथांची निर्मिती, वित्तेषणा अथवा लोकेषणा याकरितां होत असते. द्रव्यसंपादन अथवा ग्रंथकार म्हणून कीर्तिसंपादन हा हेतु धरून हा ग्रंथ लिहिण्यांत आला नाहीं. कांहीं विशिष्ट ग्रंथ एक प्रकारच्या अंतःस्फूर्तीने होत असतात. कांहीं ग्रंथकारांची स्फूर्ति भारतीय समाज सबल व वीर्यशाली व्हावा अशी असते. नीति कोणती अनीति कोणती व अवनति कोणती ? व नवनीतीच्या

आधारें प्रस्तुत समाजरचना मोडून नवीन समाजरचना करण्याच्या उद्देशानें प्रचलित आचारविचारात क्रान्ति घडविण्याकरिता व प्रचलित धर्मबंधनें झुगारून देऊन नवनीतीचा व नवमतवादाचा प्रचार करण्याकरिता कांहीं ग्रंथकाराची स्फूर्ति उदित होते; व कांहींची स्फूर्ति मन्वादि ऋषींनीं प्राचीन धर्मबंधनें कोणत्या हेतूनें घातलेलीं आहेत, याचा साधकबाधक विचार करून धर्मबंधनास परिपोषक होतील असे लेख लिहिण्याकडे वळलेली असते. प्रस्तुत लेखकाची भूमिका व स्फूर्ति तिसऱ्या प्रकारापैकीं आहे. प्रस्तुत लेखकाच्या ठायीं वेदांबद्दल अत्यादर आहे. भूतपिशाचापासून अगर विषयुक्त जीवाच्या दंशापासून लोकांना जे कष्ट होतात, त्याचें परिमार्जन आपल्याकडून व्हावें व तें वेदमंत्राच्या साहाय्यानें व्हावें अशी प्रबल इच्छा असल्या वैदिक ब्राह्मणाच्या सहवासात असतांना असे वेदमंत्र मिळावे म्हणून त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. अशा प्रकारचे मंत्र यावनी मार्गांत आहेत, त्यांच्याकडे लेखकानें लक्ष दिलें नाहीं. हा लेख लिहिण्याचें हातीं घेण्याच्या पूर्वी वेदमंत्राच्या अस्तित्वाबद्दल त्याची जिज्ञासा तृप्त झाली नाहीं. अर्थात् हा ग्रंथ लिहून तयार करण्याच्या वेळीं अशा प्रकारचे मंत्र त्याला उपलब्ध झाले, व त्याच्या आयुष्यातील एक प्रखर जिज्ञासा तृप्त झाली.

११. विषय—बहुतेक वाचकाचा असा प्रघात असतो कीं प्रथम प्रस्तावना वाचून मग ग्रंथातील विषय मनोवेधक असल्यास किंवा त्यांत कांहीं नाविन्य असल्यास तो ग्रंथ संपूर्ण वाचून काढावयाचा. तसें नसल्यास ग्रंथाच्या प्रस्तावनेच्या वाचनानेंच समग्र ग्रंथाचें वाचन संपवून टाकावयाचें. अशा व इतर वाचकांची जिज्ञासा तृप्त करण्याकरिता व ग्रंथाच्या अनुबंधचतुष्टयापैकीं विषय या अनुबंधाची पूर्तता करण्याकरिता या ग्रंथातील विषयाचें थोडक्यात विवरण करणें जरूर आहे. वस्तुतः पुढें या विषयप्रवेश या शीर्षकाखालीं ग्रंथातील विषयांचें स्पष्टीकरण केलेलेंच आहे. ते विषय खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

१२. मंत्र शब्दाची व्याख्या, मंत्रजपाचा परिणाम, वेदांचें अपौरुषेयत्व, वेदाच्या शाखा, चार वेद व त्यांच्या शाखा म्हणणाऱ्या ब्राह्मणांची पूर्वकालीन वसतिस्थानें, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यातील मंत्र व त्याचे विनियोग व त्या मंत्रांपैकीं कांहीं मंत्राचे अनुभव घेतलेल्या सज्जनांचे नामनिर्देश व त्यांचीं

चक्षतिस्थाने, सामवेदातील मंत्र व सूक्तें, पारशी लोकांची गाथा व त्यातील मंत्र व त्यांचे विनियोग, जैन सांप्रदायातील मंत्र, बौद्ध सांप्रदायातील मंत्र, तंत्रें व आगम यांच्या व्याख्या, यंत्रें व त्यांची नित्यता, मूर्तिपूजेचें पुराणत्व, गायत्री मंत्राचें महत्त्व व गायत्री यंत्र, चाक्षुषीविद्या, गारुड मंत्र, मानवाचे संस्कार मंत्र जागृतीचें विधान, मंत्र सिद्ध झाल्याचीं लक्षणें, मंत्रसिद्धि नष्ट झाल्यानें ब्राह्मण वर्णीयाचा व तदनुषगानें इतर आर्यधर्मीयाचा झालेला व होत असलेला अधःपात व उपसंहार.

१३. ग्रंथात वर्णिलेली गायत्री मंत्राची महती हेंच या ग्रंथातील सारसर्वस्व होय. कारण कोणत्याही मंत्राची सिद्धि प्राप्त करून घेणें असल्यास व त्या सिद्धी-करिता अनुष्ठान करावयाचें असल्यास प्रथम गायत्री मंत्राचा जप करावा असें सांगितलें आहे. या गायत्री मंत्राच्या जपाबद्दल लिहितांना असें प्रतिपादन करण्यात येतें कीं श्रीगायत्री मंत्र पूर्ण म्हणावयाचा तर तो चतुष्पाद मंत्र आहे. अर्थात् त्या मंत्राचीं बत्तीस अक्षरें होतात. व असा चतुष्पाद मंत्र म्हटला तर त्या मंत्राच्या अंतीं प्रणवाचा उच्चार होतो. वस्तुतः संध्या करणाऱ्या सर्व त्रैवर्णिकांच्या पाठात त्रिपदा गायत्री आहे. तथापि ह्या त्रिपदा गायत्री मंत्राच्या अंतीं प्रणवाचा उच्चार करण्याचा प्रघात कोठेच पाहण्यात आला नाहीं. नारायणोपनिषदात व देवी भागवतात त्रिपदा गायत्रीचा उल्लेख प्रणवरहित आलेला आहे व तोच आधार प्रणव न लावण्याचे बाबतींत घेण्यात येतो. वस्तुत. उपनिषत् म्हणावयाचें असल्यास किंवा देवी भागवत वाचावयाचें असता गायत्री मंत्रानंतर प्रणव न लावला तरी चालेल. परंतु संध्यावंदनाचे आचरणात फलप्राप्ति सांगितलेली आहे व परमेश्वर प्रीति संपादन करणें अशा महत्कार्याची आशा व्यक्त केलेली आहे म्हणून गायत्री उपासनेच्या प्रांतात आपण गेल्यावर श्रीगायत्री देवता प्रसन्न व्हावी, तिनें आपलें ऐहिक व आमुष्मिक कल्याण करावें ही भावना असते. या करितां गायत्र्युपासनेंत त्रिपदा गायत्रीचे अंतीं प्रणव लावावा अशाबद्दल श्रीमद् भगवत्पूज्यपाद आद्यशंकराचार्यांनीं आपल्या गायत्री भाष्यांत आदेश दिला आहे व 'मैत्राणां पल्लवो (भूः भुवः सुवः) वाच; मंत्राणां प्रणवः शिरः॥ शिरः पल्लवसंयुक्तो, मंत्रः कामदुघो भवेत्॥' 'प्रणवाद्याः, सर्वविद्या', प्रणवान्ताश्च सन्त्विह। एवं विद्यासु सर्वासु शास्त्रेषु च

कलासु च। आदावन्ते च विज्ञेयः प्रणवार्थः परीक्षया। विद्यार्थिभिश्च सर्वैर्हि धर्मोऽयं हि सनातन । अथ भारत सूनेव योगव्यासेन कीर्तितः। यथा चेव हि गायत्री ह्यादावन्ते च धर्मत । प्रणवेनाभियुक्ता च सर्वेषा सिद्धिदा भवेत्।' असे मंत्रसिद्धी प्राप्त करून घेण्यासवर्धी एक वाक्य आहे त्याचप्रमाणे असें सुचवावेंसे वाटतें कीं गायत्र्युपदेश झालेल्या प्रत्येक द्विजानें त्रिपदा गायत्रीचे अर्ती प्रणवाचा उच्चार करावा तसेंच गायत्रीच्या पहिल्या पादात "तत्सवितुर्वरेण्यम्" असें पद आहे हीं सातच अक्षरें होतात व तसें म्हटलें तर चतुर्विंशत्यक्षरा गायत्री होत नाहीं म्हणून तत्सवितुर्वरेणियम्" असा त्या प्रथम पादाचा उच्चार करावा

१४. सारसर्वस्वाचा दुसरा मुद्दा मूर्तिपूजेसबधीं आहे. साधक यत्र अगर मूर्तीचे ठिकाणीं मूर्तीचें मनोमय ध्यान करुन आवाहन करितो. ध्यान मानसिक असतें. म्हणज ध्यानगत मूर्तीची मनोमय प्रतिमा ध्यानकर्ता साधक आपल्यापुढ आसनावर विराजमान झालेली आहे अशी भावना करीत असतो ध्यानवर्णित मूर्ति ध्यानश्लोक म्हटल्याबरोबर ध्यान शब्दोच्चाराच्या परिणामानें प्रत्यक्ष तयार झालेली असते. अशा प्रकारची भावना किंवा निश्चिती शकडा नव्याण्णव साधकाची नसते. परतु ही गोष्ट सत्य आह व त्यामुळ ध्यानकर्त्याची निष्ठा केवळ अंधश्रद्धेची राहू नये तर बुद्धिनिष्ठ राहावी असें लेखकाच आग्रहाचे सागण आहे. या बाबतींत अमेरिकत एक प्रयोग करण्यात आला, त्याची माहिती लेखकाला मिळाली ती खालीं देण्यात येत आहे

१५. फ्रान्स देशात एका गावीं मॅडम फेनलाग नावाची बाई ध्वनि, वेग व त्याचा परिणाम या बाबतींत शोध करीत असे व शोध करीत असताना प्रयोगाकरितां तिनें एक फळक तयार केला. त्या फळकावर ध्वनिवाहक ताराचे पुंज लावून त्या प्रत्येक पुंजाचे टोकटीं एक एक लहानशी वाळू टाकलेली असे. उच्चनीच अगर समान स्वराच्या उच्चाराप्रमाणें त्या रङ्कूच्या वाऱ्याच्या येकानीं फळकावर आकृती उटत असत. श्रीगोवर्धनपीठाचे कै. वा. शकराचार्य श्री १००८ श्रीभारतीकृष्णतीर्थ याचेकडे वरील अष्टकाच्या पठणान मुद्रित झालेल्या श्री भैरवाच्या मूर्तीची उत्पत्तिबद्दल माहिती विचारण्यात आली व ती सत्य आहे अशाबद्दल 'सायटिफिक

रिव्ह्यूमधील' उतारा त्यांना वाचून दाखविला व ही गोष्ट सन १९०८ सालीं घडलेली आहे असें त्यांनीं सांगितलें. अलीकडे विद्युल्लतेच्या साह्यानें दूरचीं गाणीं व भाषणें आपण ऐकतों; तशीं दूरच्या मनुष्याची चित्रेंही दाखविण्याचा प्रकार सुरू झाला आहे. तो सुद्धा ध्वनिलेखनाच्या साहाय्यानेंच होत असतो. आपलेकडे एखादा मृदंगवादक मृदंग वाजवीत असतांना त्या मृदंगावर वस्त्रगाळ वाळू ठेविली तर त्या वाळूवरती नानाप्रकारच्या आकृती उत्पन्न होतात असा अनुभव आहे. आपल्या पूर्वज गायनाचार्यांनीं राग व रागिणी यांच्या अधिष्ठात्री देवतांचीं चित्रें, राग व रागिणी गात असतां कशीं दिसतात तें लिहून ठेवलें आहे. पूर्व कथित गायनाचार्यांनीं राग रागिणींच्या अधिष्ठात्री देवतांचीं चित्रें लिहून ठेविलीं ही गोष्ट वरील प्रयोगानें सिद्ध झाली, त्याअर्थीं ध्यानश्लोक म्हणत असतांना ध्यानगत मूर्ति मूर्तिमंत दिसते हेंही सिद्ध झालें असो!

१६. या ग्रंथांत विशेष कांहीं असेल तर तें हें कीं मंत्राच्या फळाचा आजच्या काळांत अनुभव देत असलेल्या सज्जनांचा उल्लेख केला आहे. ही माहिती मिळविण्यास फार प्रयास पडले त्याचें वर्णन ग्रंथांत आलेलेंच आहे. आजच्या आर्यावर्ताच्या विपन्न स्थितीला व विशेषतः ब्राह्मण वर्गाच्या विपन्न स्थितीला अशा मंत्रसिद्ध पुरुषांचा लोप होणें हें एक दर कारण आहेच, तसेंच आजच्या आर्यावर्तांतील ब्राह्मणांची आचारभ्रष्टता हेंही एक मुख्य कारण आहे. अशा मंत्रसिद्ध पुरुषांना स्वप्रख्याती करण्याची इच्छा नसते. त्यामुळें करकंकण न्यायानें असे सज्जन जवळपास असूनही मंत्रशक्ति दाखविण्याचा किंवा पाहण्याचा प्रसंग आल्याखेरीज मंत्रसिद्ध पुरुष कोण आहेत हें समजून येणें दुरापास्त होऊन बसलें आहे. मंत्रशक्ति जागृत असलेल्या सज्जनांत साठीच्या जवळ असलेले अगर साठी उलटून गेलेले अशी मंडळी आहेत. लेखकाचा व त्यांचा लेभ जुळल्यापासून हा ग्रंथ प्रसिद्ध होईपर्यंत सोबतच्या ग्रंथांत नमूद केलेले कितीएक सज्जन स्वर्गवासी झालेले आहेत. या ग्रंथांत नमूद केलेल्या सज्जनांत कांहीं आंग्लविद्याविभूषित व प्राध्यापक पदवीवर विराजमान असणारेही सज्जन आहेत

१७. हा ग्रंथ अशा प्रकारानें लिहिला गेला आहे कीं कोणालाही केव्हांही मंत्रांतील मंत्रशक्तीचा स्वतंत्र रीतीनें स्वतः अनुभव घेतां येईल. म्हणजे त्रैवर्णिकांना

वैदिक व तांत्रिक मंत्राचा व त्रैवर्णिकाखेरीज इतरांना तांत्रिक मंत्राचा अनुभव घेतां येईल. कलियुगात ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ण शिल्लक राहिले आहेत असे वाक्य कांहीं ग्रंथात आहे. परंतु जयपूर जोधपूर व नेपाळ या राज्याचे मालक व इतर क्षत्रिय सरस्थानिक याचे संस्कार वैदिक मंत्रानीं आजही होत आहेत व मारवाडी समाजात वैश्यवर्ण आहे व त्याचे संस्कार आजही वैदिक विधीनें होत असतात; म्हणून त्रैवर्णिक हा शब्द योजला आहे. मंत्र हे गुरूच्या साहाय्याशिवाय साध्य होत नाहींत. म्हणजे गुरुमुखानें मंत्र मिळाल्याशिवाय केवळ ग्रंथांत मंत्र दिलेला आहे तो पाहून त्याचें अनुष्ठान अगर जप केला तर कार्यसिद्धि होणार नाहीं. तथापि द्रोणाचार्यांना गुरु मानून एकलव्यानें अर्जुनापेक्षाही श्रेष्ठ प्रकारची धनुर्विद्या साध्य केली. गुरूंच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि बसेल असे गुरु मिळत नाहींत; अशा वेळीं परलोकस्थ विभूतींना गुरु मानून मंत्र घेण्याचा विधी ग्रंथात दिलेला आहे. परंतु जिज्ञासूच्या ठिकाणीं उत्कट इच्छा असावी, तो सदाचारप्रवण, परोपकारनिरत, स्वार्थविन्मुख असा असल्यास त्यास हा ग्रंथ केव्हाही मार्गदर्शक होईल. परंतु अशी सिद्धि अपवादात्मकच होय. असे समजावें.

१८. **अधिकारी** : या शीर्षकांत हा ग्रंथ कोणाकरिता लिहिला गेला याबद्दल विवेचन करावयाचें आहे. लेखकानें आजपर्यंत पाश्चिमात्य शिक्षणविभूषित चार पिढ्यातील लोकांच्या विचारसरणीचा अनुभव घेतला आहे. पहिली पिढी मंत्रशास्त्राबद्दल अगदीच अनास्था दाखविणारी होती. लेखकाच्या बरोबरीची पिढी थोडी आस्था दाखविणारी होती; परंतु या दोन्ही पिढ्यातील मंडळी आतां निरर्थकच आहेत. तिसरी पिढी लेखकाचे विद्यार्थीवर्गाबरोबरीची, म्हणजे वयाच्या पन्नाशीला पोचलेली, व वयाच्या वीस ते तिशीच्या सुमाराची चवथी पिढी. तिसऱ्या पिढींतील मंडळी या ग्रंथातील मार्गाचा अनुभव घेऊं शकतील व चवथी पिढी म्हणजे वेदशास्त्र शाळातून अध्ययन करीत असलेली अगर अध्ययन करून संसारात पडलेली होय, अशाच्या करिता हा ग्रंथ लिहिलेला आहे. वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या पुरस्कारानें प्रसिद्ध होणाऱ्या धर्मग्रंथाचा हा लेख एक भाग म्हणून हा ग्रंथ तयार करण्यांत आला आहे. हा लेख फार वाढल्यामुळे

सभेच्या ग्रथात याचा समावेश करिता आला नाहीं. तेव्हा वेदशास्त्र शाळातून शिकत असलेल्या विद्यार्थ्यांस ह्या ग्रथाचा फार उपयोग होणार आहे व तेच ह्या ग्रथाचे अधिकारी आहेत. मत्रशास्त्रातील मत्राच्या उपयोगितेबद्दल विचार करून कालानुकूल्य व शक्त्यनुकूल्य असूनहि नास्तिक वादानें भारून गलेले व धर्म ही विषाची गोळी व धर्मबधनें हीं कारागृहें असे प्रतिपादन करणारे व मत्रात काही तथ्य नाहीं असे म्हणणारे अशा सर्व आचारविहीन तरुणाना ह्या ग्रथाच्या स्थान प्रेमाचे आवाहन आहे. त्याना ग्रथात दिलेल्या सज्जनाकडे जाऊन मन निंयचा अनुभव घेऊन पहावा. नतर आपलें मत बनवावें. दुसऱ्याच्या सागी सागीवरून फसून मत्ररूपी बहुमोल खजिना गमाऊन बसू नये. शिवाय मत्रशास्त्राच्या अस्ति त्वाबद्दल शोध करणारे याच्या करिताही या ग्रथाचा उपयोग होईल.

१९. सप्तशती मत्राचा व आथर्वणवेदातील मत्राचा प्रत्यक्ष अनुभव घेण्याकरिता वरील स्तभात वर्णन केलेल्या मडळीस असें विनविण्यात येत की त्याना कोल्हापूर येथे श्री. १०८ अच्युतानदतीर्थ स्वामी, महालक्ष्मीचे मदिराजवळ राहातात, त्यास भेटावें व आथर्वणवेदातील मत्राच्या अनुभवाकरिता रा. रा. गणपतराव जामोटकर, मोहन बिल्डिंग, गिरगाव मुबई, व नेपाळ थापा येथील स्वामी नयनानद तीर्थ व काशी येथील वेद महाविद्यालयाचे आथर्वण वेदाचे गुरुजी वे. शा. सपन्न वैद्य गुरू याश भेटावें. इतर शास्त्राप्रमाणें मत्रशास्त्र वादविवादाच शास्त्र नाहीं. या शास्त्रात प्रत्यक्ष अनुभवास पटणारे ज्ञान सागितलेल आहे. ज्योतिष व वैद्यशास्त्र हीं शास्त्र जशी पदोपदीं अनुभव देणारीं आहेत तसेच हे शास्त्रही पदोपदी अनुभव देणार आहे. म्हणून आधुनिक पिढीनें अनुभव घेण्याकरितां या शास्त्राचा स्वीकार करावा. प्रयत्नेऽकाल। खात्री आहे की त्याचे प्रयत्न निष्फळ होणार नाहींत.

२०. सबध—अनुबधचतुष्टयापैकी हें सबध पद आहे. प्रतिपाद्य विषया मागील स्तभातून स्पष्ट तन्हेनें माडला आहे. प्रतिपाद्य विषय व प्रतिपादक ग्रथ याचा सबध अधिकारी मनवार्थी येतो. त्या मानवाच्या अज्ञानध्वातचें निरसन करणें हा त्या सबधाचा हेतु होय. हा हेतु कितपत साध्य झाला आहे हें वाचकद्वारा अनुभव घेऊन ठरविलेल्या निर्णयावर अवलबून आहे.

मूळ ग्रंथात दिलेल्या मंत्राच्या अर्थेल्याचे मंत्र ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, व आथर्वणवेद या आनुपूर्वीनें दिलेले आहेत, बीजमंत्राच्या स्पष्टीकरणाचा बीजकोशांतील कांहीं भाग दिलेला आहे; फार प्रयासानें उपलब्ध झालेले गायत्री कवच व ब्रह्मविद्येचे कांहीं मंत्रही दिलेले आहेत.

२०. हा ग्रंथ तयार करितांना ज्या ज्या ग्रंथाचा उपयोग करण्यांत आला आहे त्या ग्रंथाचीं नावें खालीं देण्यांत येत आहेत:—

चार वेद, अग्निपुराण, वायुपुराण, ब्रह्मपुराण, लिंगपुराण, गृह्यपरिशिष्ट, कर्मविपाक, प्रज्ञापनारसिंहग्रंथ, देवीभागवत, स्कंदपुराण, कौशिकसूत्र, गोपथब्राह्मण, अवेस्तागाथा (पारशी लोकांचे वेद), कुलार्णवतंत्र, कालिकावृत्ति, वाराहीतंत्र, वामकेश्वरतंत्र, कामकलाविलास, कुल्लूक, सर्वज्ञनारायण, मेधातिथी, गोविंदराज, गायत्रीशांकरभाष्य, गौडपादकारिका, चिदक्षररहस्य, आनंदलहरी, परशुरामसूत्र, मेरुतंत्र, पिच्छिलातंत्र, कुलागम, रुद्रयामळ, गुरुतंत्र, निर्वाणतंत्र, भुवनेश्वरीतंत्र, शाक्ततरंगिणी, भीमार्चनचंद्रिका, कालिकल्प, मत्स्यसूक्त, योगिनीतंत्र, भैरवीतंत्र, बोधायन, प्रपंचसार, समदायमुरतरू, चरणव्यूह इ० इ०

२३. हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यापूर्वी कांहीं सज्जनांना दाखविण्यांत आला आहे. त्यानीं दाखविलेल्या शंकाच व दोषाच लेखकाच्या दृष्टीनें निराकरण करणें उचित आहे असें वाटल्यावरून कांहीं शंकाच स्पष्टीकरण करण्यांत येत आहे. पुढील ग्रंथात हिमकालानंतर वैदिक लोक मध्य एशिया मधील सप्त सिंधू नावाच्या प्रदेशात आले असें लिहिलें आहे, तेथून ते हिंदुस्थानात आले असें लिहिलें नाहीं. लेखकाची समजूत अशी आहे कीं त्या काळीं म्हणजे वैदिक काळीं सर्व पृथ्वीवर वैदिक लोक पसरलेले होते. कारण मंत्रपुष्पाचे मंत्रात "समुद्रपर्यंताया एकराट्" असें श्री. मरुत्त सार्वभौमाच्या अंकित असलेल्या पृथ्वीचें वर्णन आलेलें आहे.

शूद्रांकरितां गायत्री पूर्वी 'ह्रीं' हें बीज लावावें असें लिहिलें आहे तर ही वैदिक गायत्री नव्हे तर महानिर्वाणतंत्रात सांगितलेली ब्रह्मगायत्री होय असें समजावें.

आभार—हा ग्रंथ तयार करितांना कै. वा. श्री. सीतारामपंत भट गुरुजी व श्री. रा. रा. बाळासाहेब जोगळेकर बी. ए., एल्एल्. बी., वेलबागवाले,

श्री. भास्करराय सांप्रदायिक, श्री. १०८ रामशास्त्री गोडबोले मंत्रशास्त्रमयूख या सर्व मंडळींनीं जी वेळोवेळीं मदत केली त्याबद्दल त्याचे मनःपूर्वक आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं. शिवाय पुणें येथील वे. मू. रा. द्रविडशास्त्री सामवेदी यांनीं सामवेदांतील ऋचांचे सामगायन पद्धतीनें नकाशे तयार करून दिले याबद्दल त्याचेही आभार मानण्यांत येत आहेत.

पुणें येथील डेक्कन पेपर मिल्चे मॅनेजिंग डायरेक्टर श्री सरदार फरदुनजी शेट यांनीं *गाथा व अवेस्तामधील मंत्रांची माहिती दिली याबद्दल त्यांचेही* आभार मानण्यात येत आहेत.

हा ग्रंथ छापून तयार होत असतां आमचे परमस्नेही इंदूर येथील होळकर कॉलेजचे मराठीचे प्रोफेसर कै. वा. श्री. रा. रा. वामनराव ऊर्ध्वरेषे, एम्. ए. एम्., आर. ए. एस. काव्यतीर्थ यानीं वेळोवेळीं ग्रंथात ज्या सुधारणा सुचविल्या त्याबद्दल त्याचे आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं.

२६. **विनंति :** लेखक हा मंत्रशास्त्रप्रवीण नाहीं व मंत्रशास्त्रातील सर्व मंत्राचा अनुभव घेतलेला असा नाहीं. म्हणून वाचकांनीं मंत्रांबद्दल माहिती विचारावयाची ती ग्रंथात नमूद केलेल्या गृहस्थाकडे विचारावी व **गुरूपदिष्ट-मार्गाशिवाय मंत्रांचें अनुष्ठान करूं नये अशी पुन्हां एकदां विनंती आहे.**

शेवटीं हा ग्रंथ पूर्णतेस नेल्याबद्दलें श्रीराजराजेश्वरी ललिताबा महात्रिपुर-सुंदरीची प्रार्थना करून तिच्या प्रेमप्रसादाची याचना करितों.

*ग्रंथोऽपि पूर्णतामेव यातोऽयं त्वत्प्रसादतः*
*अतस्त्वां सच्चिदानंदे वन्दे सच्चित्स्वरूपिणी ।*
*देहि प्रेमप्रसादं मां जगदंब नमोऽस्तु ते ।*

त्र्यंबक भास्करशास्त्री खरे
ग्रंथकर्ता

## ब्रह्मीभूत योगेश्वरानंदतीर्थ – शंकराचार्य, पुरी – परिचय

### एक कर्तबगार महाराष्ट्रीय शंकराचार्य

(अ) संन्यासपूर्व जीवन—श्रीयोगेश्वरानंदतीर्थ यांचें पूर्वाश्रमीचें नाव त्र्यंबकशास्त्री भास्करशास्त्री खरे. त्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात गुहागर या गावीं दि. १८ मार्च १८६८ रोजी एका कोकणस्थ ब्राह्मण कुटुंबात झाला. जन्मतःच खरे घराण्यातील आचारवान् व चारित्र्यसंपन्न संस्काराचा वारसा त्यांना मिळाला होता. वयाच्या चौथ्या वर्षी माता दिवंगत झाली. आठव्या वर्षी मौंजीबंधन झालें. घराण्यातील ब्राह्मणी शिस्तीमुळे त्यांना गायत्रीजप, सूर्यनमस्कार या गोष्टी नित्य कराव्या लागत वयाच्या १४ व्या वर्षी त्यांचा विवाह झाला (इ. स. १८८२). त्यांच्या घराण्यात देवी व गणपती यांची उपासना असे. त्याचे धडे त्यांना वडिलांमार्फत मिळत. त्र्यंबकशास्त्रींचे वडील भिवंडी येथे वकिली करीत व राजकारणातही भाग घेत. त्यांचे बाळकडू मुलालाही प्यावयास मिळे. इ. स. १८८४ सालीं भिवंडी येथे शृंगेरीच्या आद्य मठाचे शंकराचार्य आले असतां त्यांची व्यवस्था करण्याचें काम त्र्यंबकशास्त्रींच्या वडिलांकडे होतें. हा मुलगा (त्र्यंबकशास्त्री) पुढें 'जगद् गुरु शंकराचार्य बनेल' असे सूचक उद्‌गार त्यांनीं त्यावेळींच काढले होते.

इ. स. १८८५ सालीं त्र्यंबकशास्त्रींचे वडील दिवंगत झाले. व कुटुंबाची जबाबदारी त्यांचे अंगावर येऊन पडली. इ. स. १८८७ सालीं इंग्रजी शिक्षण घेण्यासाठीं ते एकटे पुण्याला आले. माधुकरी मागून व लहानसहान घरगुती कामें करून त्यांनीं आपल्या शिक्षणाला पुण्याच्या भावेस्कूलमध्ये सुरवात केली. तेथे ते १८९१ मध्यें मॅट्रिक परीक्षा पास होईपर्यंत होते. विद्यार्थी–दशेत असतांना ते नित्य पहाटे स्नान करून संध्या, नमस्कार, गायत्री जप व पूजापाठ आटोपून मग शालेय अभ्यास करीत. शालेय अभ्यासात पंचतंत्र, हितोपदेश, अमरकोश, रघुवंश इत्यादि संस्कृत ग्रंथ त्यांनीं पूर्ण अवगत केले होते. मॅट्रिकच्या

वर्गात असताना त्यानीं एक निबंध संस्कृत मध्येच लिहिला होता. तेव्हापासून त्याचे गुरुजी त्यांना 'शास्त्री' म्हणून संबोधू लागले.

**विद्यार्थीदशेतील परमार्थ साधना :** मूळची धार्मिक प्रवृत्ति व घराण्याचा प्रभाव या संस्कारामुळे कोणीही सत्पुरुष वा साधुसंत आल्यास त्र्यंबकशास्त्री त्याजपाशीं जाऊन काहींतरी आत्मसात करण्याची तीव्र इच्छा व प्रयत्न करीत. इ. स. १८८८ सालीं पुण्यात आलेल्या बाळ महाराजाकडून गायत्रीजप व गुरुचरित्रपाठ करण्याचा आदेश त्यांना मिळाला. त्यानंतर काहीं दिवसांनी पुण्यात आलेल्या एका योगीमहाशयांनीं 'पञ्चकोशोपदेश' दिला. 'हंस' संप्रदाय हा नाथपंथी संप्रदाय खरा; परंतु त्याचा अंतर्भाव समर्थसंप्रदायात होतो. पुण्यात असताना हंसदास (माधवराव मराठे) यांच्या सहवासामुळें ते समर्थ रामदासांचे कट्टे भक्त बनले. दासबोधाचीं अनेक पारायणें त्यानीं केलीं.

**वैवाहिक जीवन :** एकंदर संसारिक बोजा लक्षात घेऊन त्यानीं इ. स. १८९२ मध्ये मुंबईस येऊन एका व्यापाराकडे तीन वर्षे नोकरी केली. १८९५ मध्ये त्यांना पहिलें पुनरत्न झालें. वडिलाप्रमाणेंच ते देशकार्य व समाजकार्य यात भाग घेत असत. १८८५ मध्यें मद्यपान निषेधाच्या सत्याग्रहात कै. शि. म. परांजपे यांचेबरोबर त्यानी भाग घेतला होता. त्यानंतर ६ महिन्यानीं वज्रेश्वरीस येऊन त्यानीं देवीच्या अनुष्ठानास सप्तशतीच्या पाठांनी सुरवात केली. पाठ सुरू असतानाच एक यतीसदृश वृद्ध गृहस्थ नेहमीं पाठाला बसे. एके दिवशीं पाठ संपताच तो वृद्ध गृहस्थ त्र्यंबकशास्त्री यांना हिमालयात जाण्याचा मनोदय जाणून "वैवाहिक ऋण फेडा व मगच हिमाल्यांत जाण्याचा येत करा" असा आदेश देऊन अदृश्य झाला. त्यामुळें चकित होऊन अनन्यगतीकत्वाने देवीला शरण जाताच तिनें दर्शन दिले व तोच आदेश दिला.

**सत्संग सहवास व आशीर्वाद :** पुढें त्र्यंबकशास्त्री पदरपूरला येऊन १८९७ सालीं एका शाळेचे 'सुपरिंटेंडेंट' बनले. पदरपूरच्या वास्तव्यात योगाभ्यास नाथवनाथमहाराज, गोंदवलेकर महाराज, धोंडे महाराज, सीताराम महाराज, लक्ष्मण महाराज पाखरीकर (यांची छाया पडत नसे) इत्यादि संत जनाच्या भेटी झाल्या. इ. स. १९०० सालीं सोलापूर येथ एका व्यापारी

शिक्षणाच्या शाळेचें चालकत्व त्यांनीं पतकरिलें व तेथे त्यांनीं त्यात वर्षेपर्यंत काम केले. या काळात त्यांनीं (१) व्यापारी शिक्षण (२) व्यापारी साम्राज्य व (३) औद्योगिक सुधारणा हे तीन ग्रंथ लिहून प्रकाशित केले. त्यांनी गोवधबंदी व स्वदेशी चळवळ याचा जोरांत प्रचार केला त्यामुळें त्याचे नाव सरकारच्या 'काळ्या' यादींत दाखल झालें होतें.

इ. स. १९१० मध्ये मुंबईस येऊन 'कॉमर्स कॉलेजच्या' सर्व परिक्षा दिल्या व त्याच वर्षी त्याना इंग्लंडमधील 'असोसिएटेड अकाउंटंट्स्' या संस्थेनें 'ऑडिटर' ही पदवी देऊन संस्थेचे समासद बनविलें. नंतर त्यांनीं मुबईला 'खरे आणि कंपनी' ऑडिटर्स अशी संस्था स्थापिली व स्वतंत्र धदा सुरू केला. संस्थेला निरनिराळ्या गिरण्यांचीं कामे मिळूं लागलीं. देवीच्या आदेशाप्रमाणें इ. स. १९१४ सालीं त्याना परदेशातील हिशेबनिसाचा धंदा करण्याचा परवाना मिळाला व १९१५ सालीं जबलपूर येथील 'परफेक्ट पॉटरी'चे हिशेब तपासण्यासाठीं सरकारी अधिकारी म्हणून मासिक १५०० रुपयांवर त्यांची नेमणूक झाली।

**पुनः सत्समागम व आशीर्वाद :** एकीकडे वाढता यशस्वी धदा व त्याचबरोबर त्याची अध्यात्म प्रगतीची पण चढती कमान होती. इ. स. १९१५—१९२० ह्या काळात, गुळवणी महाराज, काका पुराणिक, आपदेव महाराज इत्यादि साधुपुरुषांकडून योग, प्रकाशानुभव इत्यादि अनुभव मिळाले. लवकरच म्हणजे १९२२ सालीं त्यांची पत्नी निवर्तली. गृहस्थाश्रम सपला व सुरू असलेलें 'स्मार्त अग्निहोत्रही' सपलें. १९४० पर्यंत धंदा चालू असतानाच त्र्यंबकशास्त्रींचा ओढा उत्तरोत्तर परमार्थाकडेच वाढत होता. त्यांच्या या प्रगतीला इंदोरचे योगी श्री. माधवनाथ महाराज हेच कारण झाले. ते त्याचे योगगुरु तर झालेच पण मोक्षगुरुही झालें असें दिसतें. सन १९३० सालीं त्यांनीं दूरश्रवण व दूरदर्शन दीक्षा त्याचेकडून घेतली. १९४२ मध्यें श्री. माधवनाथांनीं त्र्यंबकशास्त्रींना बोलावून त्यांच्याकडून पंचदशी' मंत्राचा १ लक्ष जप करवून त्यांना 'तुला लवकरच शंकराचार्य बनावें लागेल' असा आशिर्वाद दिला.

## (आ) संन्यासोत्तर जीवन

**आचार्यपीठावर नियुक्ति**—इ. स. १९४३ साली द्वारका व गोवर्धन या दोन पीठांसाठीं शंकराचार्य म्हणून कोणत्यातरी लायक व्यक्तीची निवड करावयाचें कार्य ब्र. भू. भारतीकृष्ण तीर्थ करीत होते. अखेरीस त्र्यंबकशास्त्र्यांची द्वारका पीठाचे शंकराचार्य म्हणून निवड झाली. त्याना मूज येथे संन्यास देऊन लगेच त्याच वर्षी त्या पीठाचे शंकराचार्य म्हणून त्यांच्यावर अभिषेक झाला. अशा रीतीनें त्र्यंबकशास्त्री खरे हे त्यांच्या पत्रिकेंतील ग्रहयोगाप्रमाणें 'खरे सन्यासी शंकराचार्य' बनले! १९४३ मध्यें पीठाधिष्ठित होण्यापूर्वी ३ वर्षे म्हणजे १९४० *साली त्यानीं प्रस्तुत 'मंत्रशास्त्र' व 'परकायाप्रवेश' हे दोन महान ग्रंथ लिहिले* होते. हे ग्रंथ पाहून श्री भारतीकृष्णतीर्थ यानीं त्याना 'विद्वन्मणि' 'मन्त्रमहार्णव' 'मन्त्रनिष्णात' व 'मंत्र मर्मभास्कर' अशा बहुमानाच्या पदव्या देऊन 'मंत्रशास्त्र' ग्रंथाला गौरवाचा पुरस्काररूप आशीर्वादही दिला होता.

द्वारका पीठाचे काहीं व्यावहारिक गोष्टींचे दावे कोर्टात चालू होते व त्यामुळें पीठाधीशाला कोर्टासमोर येणें अपरिहार्य होतें. हें अपमानास्पद वाटून खरेशास्त्रींनीं द्वारका पीठाधीशत्वाचा त्याग केला. *तावडतोब त्या पीठावर दुसऱ्या इसमास* त्यांचेच हस्तें बसविण्यात येऊन खरेशास्त्रींना गोवर्धन-जगन्नाथ—पुरी पीठाधीश म्हणून अभिषेक करण्यांत आला. *व त्याना श्रीयोगेश्वरानंदतीर्थ* म्हणून संबोधण्यात आलें.

**धर्मकार्याचें उद्दिष्ट व पूर्ति**—जगद्‌गुरु शंकराचार्य या भूमिकेवरून *पीठस्थ व्यक्तीकडून होणाऱ्या कार्याचें मुख्य उद्दिष्ट 'धर्मरक्षण' हें होय.* हिंदु धर्म हा इतर धर्मांप्रमाणें आक्रमक ध्येयाचा नसून संरक्षक उद्दिष्टाचा प्रचोदक आहे. यामुळें स्वधर्मरक्षणासाठीं स्वधर्मज्ञानाचा प्रचार व त्यावरील श्रद्धा उत्पन्न करणे, श्रेयस् व निःश्रेयस, व्यवहार व परमार्थ, भौतिक व आध्यात्मिक अभ्युदय याचा उत्कृष्ट समन्वय स्वधर्मशास्त्रानें कसा होतो हें पटवून देणें, धर्मच्युतीमुळें व धार्मिक उदासीनतेमुळें धर्माधिष्ठानाला बसणारे हादरे व पडणारीं खिंडारें हीं प्रतिकारक व संरक्षक शक्तीनें भरून काढणें ह्या गोष्टी योगेश्वरानंदांनीं पीठाच्या छत्रं मर्यादा सांभाळून अत्यंत उत्कृष्ट रीतीनें केल्या.

**धर्मकार्य व प्रचार** : इ. स. १९४४ साली योगेश्वरानंदांनीं प. पू. करपात्रीजी महाराज यांचे निमंत्रणावरून दिल्ली येथें शतकोटी हवनात्मक गायत्री महायज्ञ केला. १९४५ सालीं दिल्ली येथें झालेल्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाला आशीर्वाद देण्यासाठी ते गेले होते. १९४६–४९ या तीन वर्षांत दक्षिण भारतात ते, सर्वत्र प्रचारार्थ फिरले. १९४६ मध्यें मद्रास येथें 'अखिल भारतीय धर्मपीठ असोसिएशन' या संस्थेचे ते अध्यक्ष म्हणून गेले होते. इ. स. १९४७ मध्ये मद्रासला बनारसप्रमाणे एक हिंदुविश्वविद्यालय स्थापण्याची योजना पूर्ण केली. नंतर ते तंजावरपासून ९ मैलावर असलेल्या 'तावम' या गावीं 'डिव्हाइन लाइफ' (दैवी जीवनप्रणाली) या संस्थेच्या वार्षिक अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून गेले होते. पुढे श्री रमणमहर्षींनीं स्थापिलेल्या श्रीमहात्रिपुरसुंदरी व मातृभूतेश्वर यांच्या प्रतिष्ठापनेकरिता त्यानाच बोलविलें होतें. आपल्या पीठाच्या स्थल मर्यादा सोडून त्यांनी महाराष्ट्र, गुजराथ, मद्रास, आंध्रप्रदेश वगैरे ठिकाणीं जाऊन वैदिक धर्मप्रचार व कृतिमय कार्य केलें. त्या प्रचाराचा व प्रत्यक्ष कृतीचा काळ १९४९ ते १९६१ हा होता. म्हणजे वयाच्या ८१ ते ९३ वर्षांपर्यंतचा काळ.

योगेश्वरानंदतीर्थ हे निरनिराळ्या ठिकाणीं चातुर्मासास मुक्कामास असत व नंतर प्रचारपर्यटन करीत. अशा वेळीं सर्व ठिकाणीं लिंगार्चन, देवीपाठ व हवनें, रुद्रस्वाहाकार व गणेशयाग हीं धर्मकृत्यें सतत चालू असत. स्त्रीपुरुषांसाठीं धर्मपर, धर्मजागृतीकारक व्याख्यानें देत. हें करीत असताना आर्त, अर्थार्थी, ज्ञानपिपासू व मोक्षार्थी स्त्रीपुरुषांना त्यांच्या लायकीप्रमाणें मंत्र, तंत्र, यंत्र यासह जपानुष्ठानादि मार्गांनीं त्यांनीं अनुग्रह दिले. साक्षात्कारहा अनुभवही दाखवून दिले. कांहीं ठिकाणीं स्पर्शदीक्षादि प्रकारांनीं अनुभव दिले व योगमार्गांतील कुंडलिनी जागृतीचेही अनुभव दिले. १९५४ सालीं त्यांनीं कोल्हापूरच्या देवीच्या वज्रलेपाचें अत्यंत कठीण कार्य पुरें करवून घेतलें.

**अखेरचा चतुर्मास व देहावसान** : इ. स. १९६१ साली म्हणजे वयाचे ९३ वर्षी निरनिराळ्या ठिकाणच्या अनुग्रहीतांना भेटी देत देत योगेश्वरानंद अमरावती येथील अंबाबाईचे मंदिरात चतुर्मास व्यतीत करण्याच्या इराद्यानें

दाखल झाले. नेहमींचा धार्मिक कार्यक्रम चालू असतानाच त्याचे मध्यांत विराड झाला. सकाळच्या पूजेची सर्व मांडणी झाली होती. तेव्हां त्याच आसना शेजारीच शय्येवर त्यांनी देह ठेविला ! अशा रीतीने गोवर्धन पीठाच्या शंकराचार्यांचे देहावसान नित्य कर्मे करीत असताना जगदंबेच्या मंदिरात तिच्या पायाशीं झाले. हा असामान्ययोग आचार्यपीठाच्या व पीठस्थाच्या इतिहासात विशेष आहे.

**गुरुपरंपरा :** योगेश्वरानंद हे योगी, मंत्रशास्त्रज्ञ व दीक्षाधिकारी गुरु असल्यानें त्यांची गुरुपरंपरा निरनिराळी होती. ते साम्राज्य दीक्षाधिकारीही होते.

**मंत्रसिद्धि व सिद्धमंत्र :** योगेश्वरानंद ज्ञानपिपासू असल्याने त्यांनी अनेक प्रकारचे, अनेक धर्मांतील अनेक मंत्र संग्रहित केले. वाममार्गी मंत्रांच्या सिद्धतेकडे त्यांना कधींही लक्ष दिले नाहीं. तथापि त्यांतील मंत्र यंत्र व तंत्र यात खोल बुडी मारून त्यांतील साधनेत खोल अवगाहन केलें हें खरें. त्यांनी अनेक मंत्रांच्या उपासना, यंत्र तंत्र मंत्रादि सिद्ध करून अनुभव घेतले व घडविले होते. त्यांच्या उपासनेचें व मंत्रतंत्राचें ध्येय आत्मसाक्षात्कार हेंच होत. हरिद्वार, पुरी, शृंगेरी व द्वारका ह्या चार पीठाधीशानाच 'जगद्गुरु' असे बिरुद आहे. इतर उपपीठाधीशाना (जसे संकेश्वरादि) शिष्य स्वामी शंकराचार्य असे संबोधितात.

'शास्त्रे परे च निष्णात' अशा या महान् योग्याच्या लेखणींतून उतरलेल्या 'मंत्रशास्त्र' ह्या अमोल ग्रंथाची ४ थी आवृत्ति आम्ही वाचकांस सादर करीत आहीं.'

प्रकाशक

१ टीप : याबाबत सविस्तर माहितीसाठीं "श्री योगेश्वरानंद तीर्थ यांचें चरित्र" नांवाचें एक स्वतंत्र पुस्तक श्री गो प्र भावे यांनीं १९५२ सालीं प्रकाशित केलें आहे (किंमत १ रुपया) तें पहावें

# अनुक्रमणिका

## उत्तरार्ध—अनुभूत व अनुभाव्य मंत्र-तंत्र यंत्र-प्रयोग-संग्रह

पृ. २१७–५४३

□ □

# मं त्र शा स्त्र

## पूर्वार्ध

तात्त्विक – ऐतिहासिक – व्यावहारिक
विवेचन

# अनुक्रम

ॐ

# पुरस्कार

## पू. गोळवलकर गुरुजी सरसंघचालक (रा. स्व. सं.)

जगातील सर्वांत प्राचीन वाङ्मय व ज्ञानभांडार म्हणून प्रसिद्ध असलेले व आपल्या हिंदु जीवनप्रणालीचे, तत्त्वज्ञानाचे, अध्यात्मशास्त्राचे मूलस्रोत म्हणून गौरविलेले वेद, हा श्रेष्ठतम मंत्रसमुच्चय आहे. त्या मंत्रांच्या उच्चाराचे नियम ठरलेले असल्यामुळें त्यांच्या गायनातून विशिष्ट ध्वनिलहरी उत्पन्न होऊन वातावरणांत भरून प्रसृत होतात व त्या लहरींच्या आघातामुळें निरनिराळे परिणाम घडून येतात असा जुन्या काळापासूनचा अनुभव आहे. या अनुभवातून पुढें भिन्न भिन्न अभीष्ट परिणाम घडवून आणणाऱ्या अनेक संस्कृत व प्राकृत मंत्रांचा आविष्कार क्रान्तदर्शी महापुरुषांनीं केला. त्या त्या महात्म्यांच्या तप सामर्थ्यानें प्रभावसंपन्न झालेले हे मंत्ररूप शब्दसमुच्चय, कित्येकदां अर्थशून्य भासतात, पण त्यांची शक्ति त्यांच्या अर्थांत नसून त्यापासून निर्माण होणाऱ्या ध्वनिलहरींत असल्याकारणानें ते शब्दसमुच्चय परिणामकारी असल्याचा अनुभव येतो म्हणून मानवी जीवनांतील दुःख निवृत्ति सुखप्राप्ति व आध्यात्मिक उन्नति साधण्याकरितां आपल्या पूर्वजांनीं मंत्रांचा प्रयोग करण्याची व्यवस्था दिली. मंत्रांना यंत्ररूपानें प्रत्यक्ष करून त्यांची उपासना करण्याचें सविस्तर व संपूर्ण तंत्रहि प्रकट केलें. त्याचें शास्त्र ही बनविलें.

सामान्य भौतिक विज्ञानाला अनाकलनीय असे हें शास्त्र आहे. स्वरोदयादि-शास्त्रेंहि अशाच प्रकारचीं आहेत. म्हणून आधुनिक विज्ञानाच्या चमत्कृतिपूर्ण अशा शोधामुळें तेंच सत्य, तद्विरहित तें असत्य, असे मानणाऱ्या व स्वतःला बुद्धिवादी म्हणून अश्रद्ध बनलेल्या व त्या शास्त्रावर विश्वास ठेवणाऱ्याना अंधश्रद्ध म्हणून हिणविणाऱ्या आजच्या विद्वानाची प्रवृत्ति त्याची हेटाळणी करण्याकडे असलेली दिसते. परतु आज जें अनाकलनीय वा असमाव्य वाटतें तें कालांतरानें सत्य म्हणून अनुभवाला येऊ शकतें हें विज्ञानाच्या वाटचालीनेंच सिद्ध झालेलें आहे. दूरभाषण, दूरदर्शन, अणुविभाजन, चंद्रादि ग्रहाची यात्रा इत्यादि थक्क करणारे शोध गेल्या शतकात केवळ काल्पनिक परीकथाच वाटल्या असत्या. पण आज त्या प्रत्यक्षात आलेल्या आहेत. शभर वर्षापूर्वी तशा विचाराची हेटाळणी जर कोणी केली असेल तर ती चूक होती हे स्पष्ट झालेलें आहे. प्रत्यक्ष प्रयोग करून पाहणे, तेहि पहिल्यादा फसले, तरी चिकाटीनें अधिकाधिक निर्दोषपणें प्रयोग करून सफलता प्राप्त होईतों प्रयत्न न सोडणें, ही खरी विज्ञानवादी दृष्टि आहे. **म्हणून आधुनिक विज्ञानच काय तें अंतिम सत्य, अशा अंधश्रद्धेच्या आहारीं न जातां आपल्या शास्त्रांचा प्रत्यक्ष प्रायोगिक अनुभव घेऊन त्याची सत्यता पारखुन पहावी हेंच योग्य.**

गेल्या कित्येक वर्षात मत्राची, उपासना शास्त्र या दृष्टीनें उपेक्षितशी झाल्यानें मत्र कोणचे, त्याचा विनियोग कशासाठीं, त्याची मंत्रतंत्रें कशी, त्याकरिता पूर्व सिद्धता कोणच्या प्रकारची, आदि सर्व ज्ञान इतस्ततः विखुरलेलें एकत्र आणून त्याची पद्धतशीर माडणी झाली नाहीं असे म्हणावें लागतें. त्यामुळें या शास्त्राकडे एक दुर्बोध, दुर्गम, अज्ञेय गौडबंगाल म्हणून पाहण्याची प्रवृत्ति बळावली. शास्त्राच्या पद्धतशीर माडणीच्या अभावीं खोटे, फसविणारे, भोळ्या लोकाच्या साधेपणाचा फायदा उठविणारे, लबाड, ढोंगी, मांत्रिक म्हणून उत्पन्न झाले व त्याच्या खोटेपणामुळे व स्वार्थीपणामुळे शास्त्राबद्दल अश्रद्धा मात्र बळावण्यास मदत झाली. ही अश्रद्धा दूर व्हावी व आपलें योगाचें मंत्रशास्त्र शुद्ध स्वरूपात सर्वांसमोर यावें व त्याचे प्रत्यक्ष प्रयोगानें सत्यत्व सिद्ध करण्याची व त्याद्वारा समाजकल्याण करण्याची सोय व्हावी म्हणून जगन्नाथपुरीच्या गोवर्धनपीठाचे

श्रीमज्जगद्गुरू शंकराचार्य, श्रीमत् स्वामी योगेश्वरानन्दतीर्थ यानीं, देशभर भ्रमण करून मंत्राचा संग्रह केला असंख्य ग्रंथाचे परिशीलन करून त्यासंबंधीच सांगोपांग ज्ञान संपादन केलं, स्वतः कांहीं मंत्राचा प्रयोग करून त्याच्या सत्यतेसंबंधीं स्वतःची खातरी पटवून घेतली व आपल्या परिपक्व ज्ञानाच्या व अनुभवाच्या आधारावर प्रस्तुतच्या "मंत्रशास्त्र" या ग्रंथाची निर्मिति केली. या ग्रंथात वेदापासून तो प्रचलित अशा गारुड, शाबर, डाबर व अन्यान्य महात्म्याच्या पुण्याईनें प्रभावसंपन्न झालेल्या अनेक मंत्राचा संग्रह त्याना केला आहे. भिन्नभिन्न संप्रदायातही मान्यता पावलेल्या अनुभूत मंत्राचा अल्प का होईना येथें संग्रह आहे. मंत्र सिद्ध करून अपेक्षित व ईप्सित फल प्राप्त्यर्थ करावयाच्या अनुष्ठाना दिकचा सविस्तर ऊहापोह करणें लाभदायी झालं असत; पण ग्रंथाच्या विस्ताराला मर्यादा घालणें अपरिहार्य असल्यानं ते शक्य झालें नसावें असे वाटतें. तसेच ध्वनिलहरींच्या परिणामाचे आधुनिक विज्ञानाच्या परिभाषेतून अधिक सविस्तर वर्णन व मंत्राची वैज्ञानिकता, मंत्राच्या मांडणीतील शास्त्रीयत्व याचे स्पष्टीकरणहि मोलाचें व अश्रद्धाना श्रद्धावान करणारें ठरलें असतें पण तेंहि स्थलसंकोचास्तव झालेलें नसावें. अशी या ग्रंथातही कांही न्यूनें राहून गेला आहत हे खरें.

त्याचा परिहार करण्याचा अल्पसा उद्योग 'मंत्रशास्त्रा'ची ही सुधारलेली आवृत्ति प्रसिद्ध करणारे श्रीयुत गो० प्र० भावे यानीं केला असून ग्रंथात मधून मधून व शेवटीं स्वतंत्र अध्यायातून त्यानीं मंत्रशास्त्राचें वैज्ञानिक श्रेष्ठत्व मांडण्याचा प्रयत्न केला आहे. तोहि अर्थातच त्रोटक स्वरूपाचा आहे. मंत्राचें शास्त्रत्व सांगोपांग सिद्ध करण्याचा व आधुनिक विज्ञानालाहि आश्चर्यचकित करील इतकी वैज्ञानिक क्रान्तदृष्टि मंत्रद्रष्ट्यात होती हें प्रमाण पटवून देण्याचा उपक्रम ग्रंथरूपानें प्रकट करण्याच्या उद्योगात ते आहेत, हें त्यानींच सांगितल आहे त्याच्या या ग्रंथाची आपणास काहींकाळ प्रतीक्षा करणें भाग आहे. पण तोंवर प्रस्तुतचा मंत्रशास्त्र हा ग्रंथ अभ्यासावा व आपल्याला रुचेल त्या मंत्राची सिद्धि करून अनुभव घ्यावा, हें उचित होईल.

श्रीमत् स्वामी योगेश्वरानंदतीर्थ महाराज व श्री० गो० प्र० भावे यानीं हे अज्ञानांधकारात दडून राहिलेलें शास्त्र ग्रंथरूपानें आपणा सर्वांना उपलब्ध करून

दिलें याबद्दल आपण त्याचे ऋणी राहिलें पाहिजे व या ग्रंथाचा योग्य उपयोग करून **स्वधर्म, संस्कृति, आपलें ज्ञान विज्ञान यांच्यासंबंधी सार्थ अभिमान जागृत करून त्यांच्या रक्षणार्थ. संवर्धनार्थ, प्रत्यक्ष कृति करण्याचा निश्चय जागवावा, अशा रीतीनें त्यांचे अंशतः उतराई व्हावें अशी माझी सर्व बंधूंना आग्रहाची विनंति आहे.** अनेकांनीं व स्वतःहि घेतलेल्या अनुभवाचे दाखले देऊन ह्या विनतीला बळकटी आणता आली असती, पण या पुरस्काराचा कंटाळवाणा विस्तार करू नये व स्वतःचा दंभ मिरवूं नये, म्हणून तसें केलेलें नाहीं, तरी सूज्ञ वाचक यावरून योग्य तो अर्थ ग्रहण करतीलच. सर्व ज्ञानाचा आगर, ज्याच्यामुळें शब्दांना, अक्षरांना मंत्रसामर्थ्य प्राप्त होतें त्या सृष्टिस्थितिविनाशाच्या चालकाचें परम शक्तिमान श्रीपरमेश्वराचें स्मरण करून श्री० गो० प्र० भावे यांनीं मूळ ग्रंथलेखक श्रीमत् योगेश्वरानंदतीर्थां-विषयींच्या भक्तिभावानें केलेली ही वाङ्मयसेवा सफल होवो अशी त्याचे चरणीं प्रार्थना करतों. इति शम् ।

# स्थूल परिक्षण

डॉ. श्रीधर भास्कर वर्णेकर, एम्. ए., डी. लिट्.
प्राध्यापक, नागपूर विद्यापीठ.

जगन्नाथपुरी मठाचे परमपूजनीय शंकराचार्य श्री. योगेश्वरानंदतीर्थ यानीं आपल्या पूर्वाश्रमात (पूर्वाश्रमीचे नाव श्री. त्र्यंबक भास्करशास्त्री खरे) असताना ऑडिटरच्या व्यवसायातील व्यग्रता सांभाळून आध्यात्मिक विद्येचा गहन व्यासंग निरंतर चालू ठेवला. व त्याचें परिपक्व फळ म्हणून 'मंत्रशास्त्र' हा प्रस्तुत ग्रंथ १९३६-१९४० मध्यें लिहून जिज्ञासु जनतेला समर्पण केला. प्रस्तुत ग्रंथामध्यें व्यक्त झालेले श्री. त्र्यंबक भास्करशास्त्री खरे यांचें मंत्रशास्त्रावरील असामान्य पांडित्य पाहून जगन्नाथपुरी मठाचे तत्कालीन शंकराचार्य पूज्यपाद भारतीकृष्णतीर्थ यानीं त्यांना 'मंत्रमहार्णव' 'मंत्रनिष्णात' 'मंत्रमर्मभास्कर', इत्यादि उपाधि देऊन त्यांचा मोठा गौरव केला. एवढेंच नव्हे तर १९४३ मध्यें भूज येथें संन्यास दीक्षा देऊन द्वारकापीठाच्या आचार्यपदीं त्यांचा अभिषेक केला.

प्रस्तुत ग्रंथाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाल्यानंतर त्याचा सर्वत्र मोठा बोलबाला झाला होता. त्याचें कारण मंत्रशास्त्राविषयीं भारतातच नव्हे तर साऱ्या जगाच्या आध्यात्मिक आणि आधिदैविक साधना करणाऱ्या लोकांच्या अन्तःकरणांत अत्यंत तीव्र जिज्ञासा! मंत्र तंत्र आणि योग यांच्याविषयींचें ज्ञान बाळगणाऱ्या मनुष्यांविषयीं साऱ्या जगात मोठें कुतूहल आहे. त्याचा लाभ घेऊन मांत्रिक, तांत्रिक किंवा योगी म्हणून स्वतःची प्रसिद्धि करून अज्ञानी

आर्त लोकांना स्वतःच्या भजनी लावून घेणाऱ्या ढोंगी लोकांचा फार मोठा वर्ग आपल्या समाजात आढळून येतो. अशल्या ढोंगी लोकांचे बिंग पुढे उघडकीस येऊन समाजाकडून त्याची मानहानी झाल्याचेंहि पाहण्यात येतें. त्याचा दुष्परिणाम असा कीं, सर्वसामान्य सुशिक्षित समाजात मंत्रतंत्रयोग यासारख्या आध्यात्मिक व आधिदैविक शास्त्रासंबंधी व त्यातील साधनासंबंधी अनादर किंवा तिरस्कार निर्माण होतो. ज्या विद्येविषयीं सुशिक्षित समाजात आस्था राहत नाहीं, त्या विद्येची अप्रतिष्ठा होऊन पुढे ती लयाला जाण्याची शक्यता असते. संस्कृत भाषेचा व तदन्तर्गत शास्त्रादिकांचा झपाट्यानें होणारा ल्य हे आमच्या या विधानाचें फार मोठें निदर्शन आहे!

अशा विपरीत परिस्थितींत विल्यास जात असणाऱ्या प्राचीन विद्यांचे महत्त्व सुशिक्षित लोकांतील सुविचारी वर्गाला नीट कळेल व पटेल अशा स्वरूपात भाषण-लेखनादींच्या द्वारा त्याचा नवाविष्कार करणें अत्यंत आवश्यक असतें.

नवागत पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या प्रचारामुळे नवशिक्षिताच्या उपेक्षेचा विषय झालेला व सनातनी पंडिताच्या रूढ कल्पनापायीं जुनाट पोथ्यांमध्यें दडपत पडलेला तेजस्वी वेदान्त स्वामी विवेकानंदांनी अभिनव स्वरूपात प्रतिपादन केल्यामुळेंच जगताच्या जिज्ञासेचा विषय झाला. **राष्ट्राच्या जीवनात सांस्कृतिक उत्कर्षाचा काळ येतो तसा अपकर्षाचा किंवा ग्लानीचाहि काळ येत असतो. त्या सांस्कृतिक ग्लानीच्या काळांत शास्त्र, विद्या, कला इत्यादींचें उज्जीवन नवीन रीतीनेंच करावे लागतें व तसें न झाल्यास राष्ट्राचे सारें सांस्कृतिक निधान काळाच्या भक्ष्यस्थानीं पडतें.** जगद्गुरू शंकराचार्य, भगवान् पतंजलि, भगवान् बुद्ध, संत ज्ञानेश्वर, तुलसीदास इत्यादि थोर पुरुषांच्या महान परंपरेंत झालेल्या सर्व आचार्यांनीं व सत्कर्मीनीं भारताचें वैचारिक निधान आपापल्या काळांत उज्ज्वलित करून भावी पिढ्यांच्या स्वाधीन केलें, म्हणूनच तें आजवर टिकून आहे. **सांस्कृतिक निधान पुनरुज्ज्वलित करण्याची प्रक्रिया राष्ट्रामध्यें कदापि बंद होतां कामा नये. ती बंद पडली की, जुनी परंपरा उत्सन्न होऊन कोणती तरी परकीय संस्कृति तें स्थान काबीज करते.**

मंत्रशास्त्राभावानें असलेल्या गूढतेच्या तेजोवलयामुळें त्याच्यासंबंधींची तीव्र जिज्ञासा अन्तःकरणात बाळगणारा फार मोठा वर्ग असला तरी त्याला त्या शास्त्रासंबंधींची व्यापक व सखोल माहिती देणारा आधुनिक शैलीत लिहिलेला एखादा उत्कृष्ट प्रबंध ग्रंथ उपलब्ध नव्हता. डॉ. केतकराच्या महाराष्ट्रीय ज्ञानकोशात तंत्रशास्त्रासंबंधीं काहीं माहिती संकलित केलेली आहे. पण मंत्रशास्त्राचा नामनिर्देशसुद्धा नाहीं. तंत्रशास्त्रविषयक लेखातच तुरळक मंत्रविद्येचे उल्लेख आढळतात. अशा परिस्थितींत या लुप्तप्राय शास्त्राविषयींचा प्रस्तुत ग्रंथ हाच प्रथम प्रबंध होय, असें म्हणणें चुकीचें होणार नाहीं.

"हा ग्रंथ स्वतंत्र स्वरूपाचा नाहीं. एखादा मालाकर ज्याप्रमाणें उद्यानातील निवडक निवडक सुमनांचा हार तयार करतो, त्याप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथातून वेचे काढून ते या ग्रंथात ग्रथित केले आहेत हा ग्रंथ लिहिताना 'नामूलं लिख्यते किञ्चित्' हें वाक्य आधारास सर्वांस घेतलें आहे. या शब्दात स्वतः ग्रंथकारानेंच आपल्या ग्रंथाचें स्वरूप सांगितलेलं असून तें किती यथार्थ आहे याची जाणीव संपूर्ण ग्रंथाचें नुसत अवलोकन केलें तरी येऊ शकते.

ग्रंथाच्या पूर्वार्धातील "अन्यधर्मीयांचे देव, मंत्र व यंत्रतंत्र" (पृ. १८८–२१३) हें आठवें प्रकरण मंत्र-यंत्र-तंत्र हें हिंदु धर्मातील खूळ आहे अशी चुकीची समजूत उराशी कवटाळून बसलेल्याच्या डोळ्यात अंजन घालण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. उत्तरार्धाच्या नऊ प्रकरणात विविध प्रकारचे मंत्रतंत्राचें विधान सविस्तरपणें सांगितलं आहे, त्यातहि **"व्यवहारोपयोगी मंत्रतंत्रविधान"** ह्या ९ व्या प्रकरणात दिलेली (श्री. गो. भावे यानी संकलीत केलेली) माहिती फारच मोलाची आहे. शेवटचें उपसंहारात्मक "प्राचीन भारतीय ब्रह्मांड ज्ञान व आधुनिक विज्ञान हें गो. प्र. भावे यानीं लिहिलेलें प्रदीर्घ प्रकरण (पृ. ४८०–५३८) म्हणजे या **संपूर्ण ग्रंथाचें हृद्गत आहे. वैज्ञानिक वृत्तीच्या जिज्ञासूनें तें अवश्य वाचायास हवें.**

एकूण ग्रंथाची उद्बोधकता वाढविण्याच्या दृष्टीनें ठिकठिकाणीं दिलेली देवतांचीं व यंत्रादांचीं चित्रें पाहिलीं म्हणजे या ग्रंथाच्या विद्वान् लेखकानीं व

प्रकाशकानीं हा जिज्ञासित पण उपेक्षित विषय केवढ्या कळकळीनें प्रकाशात आणला आहे याची कल्पना येते.

मन्त्राची साधना करून त्याचे परिणाम अनुभविणाऱ्या व्यक्तींची ओळख पटत नाहीं, तोंपर्यंत सर्वसामान्य चिकित्सक वृत्तीच्या मनुष्याचा मन्त्रशास्त्रावर विश्वास बसणें कठीण असतें. ग्रंथकारानीं मोठ्या प्रयासानें या संबंधींची दुर्लभ माहिती गोळा करून ती या ग्रंथात दिल्यामुळे एक मोठा विवाद्य विषय अनायासें निकालात निघाला आहे. जिज्ञासूंनी मन्त्रसाधकाचे हे अनुभव अवश्य वाचावयास हवेत, स्वतः ग्रंथकारानी एकूण नास्तिक समाजाला तसें आवाहन प्रस्तावनेंत केलें आहे.

**"वेदशास्त्र शाळांतून शिकत असलेल्या विद्यार्थ्यांस या ग्रंथाचा फार उपयोग होणार आहे. व तेच या ग्रंथाचे अधिकारी आहेत."** असे लेखकाचें म्हणणें असल्यानें त्या क्षेत्रातील प्रत्येक व्यक्तीनें म्हणजे सुशिक्षितपण पौरोहित्य करणाऱ्या लोकांनीं या ग्रंथाचें सर्वंकष आलोकन करणें व स्वतःच्या ज्ञानाचा लाभ आपल्या आस्तिक यजमानवर्गास देणें अत्यंत उचित होईल. तसेंच इतरहि अधिकारसंपन्न साधक लोक या ग्रंथाचें सखोल अध्ययन करून त्यांत सांगितलेल्या साधना सत्पुरुषांच्या मार्गदर्शनाखालीं विधियुक्त शास्त्रोक्त पद्धतीनें करून आपले अभ्युदय व निःश्रेयस प्राप्त करण्यास समर्थ होवोत अशी अपेक्षा व्यक्त करून व या मन्त्रशास्त्र ग्रंथाच्या रूपानें महान् धर्मसेवा करणाऱ्या सत्पुरुषांना प्रणाम करून आपलें निवेदन संपवितों !

# १ मंत्रशास्त्र परिचय

## १. विषयप्रवेश

नमामि प्रणवाकारं श्रीविघ्नेशं कृपानिधिं ।
निःश्रेयोभ्युदयार्थे च कामेशीं कामरूपिणीम् ॥

मंत्रशास्त्र या विषयावर आजपर्यंत महाराष्ट्र भाषेत एकही ग्रंथ प्रसिद्ध झाला नाही. हिंदी, गुजराथी अगर प्राकृत या भाषांची जी मायजननी संस्कृत भाषा, त्या भाषेतही मंत्रशास्त्र अशा शीर्षकाचा ग्रंथ नाहीं. इंग्रजी भाषेत 'थिऑसफिकल् सोसायटी' मार्फत प्रसिद्ध झालेला मंत्रशास्त्र असा एक ५० पानांचा ग्रंथ अस्तित्वात आहे. संस्कृत भाषेत, तंत्रग्रंथ, आगम, यामल वगैरे ग्रंथ आहेत, परंतु त्या ग्रंथांतून वैदिक मंत्रांचा ऊहापोह केलेला नाही. तंत्रग्रंथ म्हटले कीं, सार्वजनिक जनसमुदायाची अशी कल्पना झाली आहे कीं, तंत्रग्रंथ म्हणजे आगम अथवा यामल. हे ग्रंथ शाक्त सांप्रदायाचे आहेत व शाक्त सांप्रदायी लोक हे मद्यमांससेवक असतात असा सर्वतोमुखी प्रवाद असल्याने व त्या प्रवादाप्रमाणे शाक्त सांप्रदायी लोक कनिष्ठ दर्जाला पोचल्यामुळे तंत्रग्रंथाकडे महाराष्ट्रांत कोणी ढुंकूनही पाहिलें नाहीं. तंत्रग्रंथ केवळ शक्तिविशिष्ट सांप्रदायरूपी नाहींत. त्यांत सूर्य, गणपति, शंकर, विष्णु या देवतांच्या मंत्रांचा उहापोहही केलेला आहे. तसेंच मंत्रमहोदधि, मेरतंत्र रुद्रयामल, ब्रह्मयामल, वगैरे ग्रंथ केवळ मंत्रांचा विनियोग, जपक्रिया व जपफलें ह्याच गोष्टी सांगतात. परंतु महानिर्वाणतंत्र, कामकलाविलास, प्रपंचसार इत्यादि ग्रंथ तात्त्विक आहेत.

त्या प्रथाकडे कोणा महाराष्ट्रीयाचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. एकंदरींत पुढील लेखात वैदिकमंत्र, आगमोक्त मंत्र म्हणजे तंत्रोक्त मंत्र व पौराणिक मंत्र याची माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

शीर्षकांत मंत्रशास्त्र हे शब्द अशा हेतूनें घातले आहेत की, यापुढील लेखात केवळ मंत्रशास्त्राचें शाब्दिक विवेचन न करिता, मंत्रशास्त्रातील प्रमेयाचें प्रायोगिक उपबृंहणही करण्यात आलें आहे, व त्या योगानें प्रत्यक्ष क्रिया करून अनुभव घेण्याची इच्छा वाचकाचे ठायीं जागृत व्हावी अशी लेखकाची इच्छा आहे. मंत्रशास्त्रात इतर प्रकारच्या मंत्रा-बरोबर आकर्षण, जारण, मारण, स्तंभन, उच्चाटन, विद्वेषण वगैरे सरबोंही मंत्र असतात, परंतु ते येथें सप्रयोग दिलेले नाहात येथे फक्त श्री भगवद्गीतेतील अशा प्रकारचे मंत्रात्मक श्लोक दिलेले आहेत परंतु त्याची सविस्तर विधानें दिलेलीं नाहींत. कारण मनुष्याची निसर्गत च प्रवृत्ति स्वार्थसाधनाकडे ओढा घेत असते. हे व *अशा तऱ्हेचे प्रयोग गुरुसांप्रदायावाचून फलद्रूप होत नाहींत* व गुरूही, *शिष्य अगदीं परार्थपरायण व स्वार्थविन्मुख झाल्यासेरीज ह्या विद्या शिष्याना सागत नाहींत.* म्हणून साध्या व्यवहारास उपयोगी पडतील अशा मंत्राचा सन्निवेश पुढील लेखात करण्यात आला आहे.

शीर्षकांतील विषयाचा उहापोह करण्याकरिता खालीं नमूद केल्या-प्रमाणे त्याचे विभाग पाडण्यात आले आहेत. शास्त्र, मंत्राची व्याख्या, वेद व वेदाचे अपौरुषेयत्व, वेदाच्या शाखा, वेदाच्या शाखा म्हणणाऱ्या ब्राह्मणाचीं वसतिस्थानें, वैदिक मंत्राचे प्रकार, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्वणवेद यातील व्यवहारोपयोगी मंत्र व त्याचे विनियोग, वेदमंत्राचा अनुभव घेतलेल्या सज्जनाचे नामनिर्देश, अवेस्ता व गाथा (पारशी लोकाचे वेदतुल्य ग्रंथ) यातील मंत्र व त्याचे विनियोग, जैन सांप्रदाया-तील मंत्र, बौद्ध सांप्रदायातील मंत्र, आगम व तंत्रें, याच्या व्याख्या, आगमोक्त मंत्राचे प्रकार, मंत्रशक्ति, मंत्रशक्तियोग, यंत्र व त्याची निर्मिती,

मूर्ति, देवालयें व त्यांचें पूर्वकालीन अस्तित्व, मंत्रशास्त्राच्या साधनेंतील मूर्तिपूजेचें स्थान, कलियुगात साध्य होणारे मंत्र, गायत्री मंत्र व त्याचें रहस्य, साबर मंत्र, गारुड मंत्र, पौराणिक मंत्र व यंत्रें, आधुनिक साधुपुरुषांना सांगितलेले सिद्ध मंत्र, तांत्रिक व पौराणिक मंत्राचे अनुभव घेतलेल्या सज्जनांचे नामनिर्देश, मानवाचे संस्कार व साधारण निर्धन मंत्र सिद्ध न झाल्यास त्या मंत्राबद्दल साधकानें करावयाचे मंत्र-संस्कार, मंत्रसिद्धि होण्याचीं साधनें, गुरुतत्त्व, शिष्य व गुरु, कुलगुरु, दीक्षा, मंत्र सिद्ध झाल्याचीं लक्षणें, मंत्रसिद्धीचा पूर्वकालीन उपयोग, मंत्रसिद्धि नष्ट झाल्याचे परिणाम आणि उपसंहार.

## २. शास्त्र.

प्रथमतः शास्त्र म्हणजे काय याचा साधारण लौकिकरीत्या विचार करूं. एका विषयाबद्दल अनेक विचारवान् लोक निरनिराळ्या दृष्टींनी निरनिराळीं गृहीत कृत्यें आधाराला घेऊन निरनिराळ्या भूमिकेवरून आपापले विचार प्रदर्शित करितात, अथवा निरनिराळे प्रतिभाशाली संशोधक निरनिराळ्या उपकरणांनी निरनिराळे प्रयोग करून त्या प्रयोगांनी सिद्ध झालेले सिद्धांत एकत्र करून ठेवतात. असे सिद्धांत दोन प्रकारचे असू शकतात. कांहीं सिद्धांत निरनिराळ्या पदार्थांच्या मिश्रणानें सिद्ध होणारे असतात व कांहीं सिद्धांत एका पदार्थांत अवगुंठित असलेलीं मूलभूत तत्त्वें विघटित करण्याच्या प्रयोगांनीं सिद्ध होतात. म्हणजे कांहीं सिद्धांत पदार्थांच्या मिश्रणजन्य प्रयोगांनी सिद्ध होतात व कांहीं सिद्धांत पदार्थांतील तत्त्वें निरनिराळीं करण्याच्या प्रयोगांनी सिद्ध होतात. अर्थात् कांहीं सिद्धांत भिन्न पदार्थांच्या संघटनेनें वसविलेले असतात. कांहीं सिद्धांत प्रायोगिक असतात व कांहीं सिद्धांत अज्ञेय सृष्टिरचनेची व मानवी जीवनाची आणि मानवाच्या अंतिम ध्येयाची बुद्धिकौशल्यानें मीमांसा करण्याच्या हेतूनें सिद्ध केलेले असतात. याप्रमाणें निरनिराळ्या बुद्धिविशारदांनीं निरनि-

राळ्या भूमिकेवरून निरनिराळ्या प्रकारचे सिद्धांत प्रदर्शित केलेले असतात. असे सिद्धांत व त्यांचे प्रयोग अथवा सिद्धांत व ते सिद्ध करण्याकरितां पूर्वपक्षरूप व उत्तरपक्षरूप प्रमेय-प्रणालिका ज्या ग्रंथांत व्यवस्थित रीतीनें मांडण्यात येते, तो ग्रंथ त्या विशिष्ट विषयाचा शास्त्रग्रंथ होय.

पूर्वकालापासून पट्शास्त्रें म्हणजे न्याय, वैशेषिक, सांख्य, सेश्वरसांख्य, पूर्व मीमांसा व उत्तर मीमांसा; यांना शास्त्रग्रंथ अथवा षड्दर्शनें अशी संज्ञा देण्यांत आलेली आहे व ह्या शास्त्रांच्या बरोबरीचीं गणितशास्त्र, व्याकरणशास्त्र, ज्योतिःशास्त्र, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रेंही पूर्वकालापासून अस्तित्वांत आहेत, परंतु त्यांची गणना पट्शास्त्रांत केलेली नाहीं. शिवाय चार वेदांचे चार उपवेदही शास्त्र या संज्ञेखालीं येत असत, जसें-आयुर्वेद, धनुर्वेद गंधर्ववेद व स्थापत्यवेद. या उपवेदांचे पुन्हां वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र, ज्योतिर्गणितशास्त्र, गायनशास्त्र, तंतुवादनशास्त्र, मृदंगवादनशास्त्र, अगस्त्य संहितेंतील वास्तुशास्त्र व विद्युच्छास्त्र हीं शास्त्रें प्राचीनकाळीं प्रसिद्ध होतीं. प्रस्तुतकाळीं अगस्ति संहितेंतील विमानशास्त्राचा शोध लागला आहे.[1] असें ऑगस्ट १९३५ च्या सह्याद्रि मासिकांत प्रसिद्ध झालें आहे. आशिया मायनरमध्यें (तुर्कस्थानमध्यें) इसवी सनापूर्वी प्रसिद्ध असलेल्या खाल्डियन लोकांनीं लिहिलेल्या मातीच्या विटा सांपडल्या आहेत. त्यांमध्येंही विमानविधेचा सप्रयोग इतिहास दिलेला आहे असें अलीकडे प्रसिद्ध झालें आहे.

वस्तुतः शास्त्र हा शब्द 'शास् अगर शासु' या धातूपासून झालेला आहे. या शास् धातूचा अर्थ अनुशासन करणें अथवा सुसंघटित करणें

---

१. कै. पंडित सातवळेकर यांनीं 'पुरुषार्थ' मासिकांत (१९६७-६८) लेख लिहून प्राचीन विमानासंबंधें वेदांतील वचनें देऊन आकार व गति ह्यांची माहिती दिली आहे. तसेंच कै. वझे इंजिनियर (नाशिक) यानीं आपल्या 'शिल्पशास्त्र (इ. स. १९२८) या ग्रंथांत 'शिल्पशास्त्र विस्तार' या प्रकरणांत विमानविद्या ह्याबद्दल बरीच माहिती दिली आहे. (गो. प्र. भावे)

असा होतो. 'शास्यते अनेन इति शास्त्रम्' अथवा 'शास्ति शास्यते इति शास्त्रम्' म्हणजे ज्या वाक्यरचनेच्या योगानें कोणत्याहि विषयाचे ज्ञान समर्पक रीतीनें लिहिलेलें असतें ते 'शास्त्र' होय. कोणत्याहि विषयासंबंधीं अनेक प्रयोगकर्त्यांनीं अगर अनेक कुशाग्रबुद्धीच्या लोकांनी विशिष्ट ज्ञान संपादन करण्याकरिता अनेक वेळा प्रयत्न केलेले असतात. अथवा अनेक सिद्धांत बसविलेले असतात व अनेक प्रकारच्या उपपत्ति लावलेल्या असतात. ते त्यांचे क्रियासंभार व अनुभवजन्य ज्ञान संपादनाकरिता केलेले प्रयत्न एकत्र करून एका विवक्षित विषयाबद्दल जी व्यवस्थित वाक्यरचना सुसंबद्ध रीतीनें एकत्र केलेली असते, त्या वाक्यसमूहाला शास्त्र म्हणावें. उदाहरणार्थ–आचारशास्त्र, नीतिशास्त्र, मानसशास्त्र, विद्युन्मानसशास्त्र, व्याकरणशास्त्र, अलंकारशास्त्र, छंद शास्त्र, स्वरशास्त्र, तंतुशास्त्र, वनस्पतिशास्त्र, भूगर्भशास्त्र, प्राणिशास्त्र, रसायनशास्त्र, विद्युच्छास्त्र, वेदान्तशास्त्र, योगशास्त्र, परलोकविद्याशास्त्र इत्यादि प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांचीं निवडक अशीं नावें आहेत.

योगशास्त्राचे प्रणेते *पातंजल महामुनि यांनीं* योगशास्त्रातील सूत्रांचे चार विभाग केले आहेत समाधिपाद, साधनपाद, विभूतिपाद, व कैवल्यपाद असे ते चार पाद अगर विभाग होत. या चार पादांपैकीं शेवटील कैवल्यपादातील पहिल्या सूत्रांत योगसिद्धि कशा प्राप्त होतात याचें वर्णन केले आहे. ते सूत्र असें आहे. "जन्मौषधिमंत्रतप - समाधिजा सिद्धय" या सूत्रांत सिद्धि प्राप्त होण्याचे पांच मार्ग सांगितले ते असे कीं, कांहा पुरुषास जन्मादारभ्यच सिद्धि प्राप्त झालेल्या असतात, कांहा लोकांना औषधींपासून सिद्धि प्राप्त होतात कांहींना मंत्रजपापासून व तपश्चर्येपासून व कांहींना समाधिपासून सिद्धि प्राप्त होतात. त्या पांच प्रकारांपैकीं मंत्र अथवा मंत्रशास्त्र हाहि एक सिद्धि-प्राप्तीचा उपाय आहे म्हणून मंत्रशास्त्र या विषयावर विवेचन करावयाचे योजिलं आहे.

## ३. मंत्राची व्याख्या

मंत्रशास्त्रात मंत्राची विशेष माहिती दिलेली असते, म्हणूनच प्रथम मंत्र या शब्दाच्या व्याख्येचा विचार करू. मंत्रधातूचा अर्थ गुह्य परिभाषण असा आहे. 'मंत्रयते' म्हणजे गुह्य गोष्टी मिळवितो, असाही ह्या धातूचा अर्थ होतो. कोणत्याही कार्याकरिता कोणत्याही देवतेचे आमंत्रण म्हणजे आवाहन करणें, असाही मंत्र धातूचा अर्थ आहे. ज्याच्या मननानें सर्व जगाचें ज्ञान होतें. अर्थात जीव, ब्रह्म आणि ब्रह्माण्ड याच्या ऐक्याचें ज्ञान होतें, ज्याच्या मननानेंच संसारपाशबंधनापासून प्राप्त होणारी जीवदशेची मुक्ति साध्य होते व ज्याच्या जपापासून धर्मार्थकाममोक्षादि चतुर्विध सिद्धि प्राप्त होते, तो मंत्र होय. 'मननात् त्रायते इति मंत्र' अशीही मंत्र शब्दाची व्याख्या तंत्रशास्त्रात आढळून येते. श्रीविद्यारण्य स्वामींनीं मंत्र शब्दाची व्याख्या ज्या श्लोकात दिलेली आहे, तो श्लोक असा--

> मकारो मननं प्राह त्रकारस्त्राणमुच्यते ।
> मननत्राणसंयुक्तो मंत्र इत्यभिधीयते ॥
> ब्रह्मक्षा ब्राह्मणाः पूर्वं जलवायव्यादिस्तंभनैः ।
> शक्तेरुत्पादनं चक्रुस्तन्मंत्रमिति गद्यते ॥
> मननाद्वस्तुशक्तीनां त्राणात् संकटसागरात् ।
> [१]मंत्ररूपा भवेच्छक्तिर्मननत्राण धारिणी ॥ जामदग्न्य धनुर्वेद.

वरील सर्व मंत्रव्याख्याचा उत्तानार्थ असा आहे कीं, कोणत्याही

---

१. या वाक्यावरून पुढील गोष्टी सिद्ध होतात.
(१) मंत्रविद्या मनननिष्ठ आहे. म्हणजे मंत्रविद्येचें अधिष्ठान वैचारिक--बौद्धिक आहे. (२) मनावर परिणाम होऊन एकाग्रता साधते. (३) मंत्रविदर्न देवता येऊन जपकाला मदत करितात. (४) मंत्राच एक महारर्भ तंत्र असते व त्यामुळें आत्मीय व परकल्याण होतें आणि (५) मंत्रविदेनें भौतिकवर स्वामित्व गाजविता येतें (गा. प्र. भा.)

अक्षर समुच्चयाचे मनन म्हणजे अभ्यास अर्थात् मंत्राचे पुनः पुन मनन-पूर्वक मनोमय उच्चारण करणें, व ते उच्चारण केल्याने उच्चारकर्त्याचे मनोरथ ती अक्षरमाला अगर तो अक्षरसमुच्चय पूर्ण करितो. श्रीविद्यारण्य स्वामींच्या वर उद्धृत केलेल्या श्लोकाचा अर्थही असाच आहे. अशा नाना प्रकारच्या वर्णयोजना (उदाहरणार्थ 'हसक्षे') योजून नाना प्रकारचीं इष्ट फळे देणारे जे शब्दसमूह अगर वर्णसमूह त्यास मंत्र म्हणावें. एकंदरींत मंत्राचा उपयोग मंत्रातील गूढशक्ति प्रकाशात आणण्याकरिता होतो. अगर आरंभी निरर्थक दिसणाऱ्या शब्दसमूहाला तो इष्ट फलदायी आहे असे अनुभवता येते. म्हणजे या प्रकारच्या मंत्रातील सामर्थ्यानें इष्टफलप्राप्ति व अनिष्ट फलपरिहार ह्या गोष्टी साध्य होतात. अमुक वर्णसमुच्चयाचा जप केल्यानें अमुक इष्टफलप्राप्ति होते व अमुक अनिष्टफल निवारण करिता येतें, असा आदेश पूर्वकालीन ऋषिमुनींनी किंवा अर्वाचिन सिद्धपुरुषांनी दिलेला असतो. म्हणून त्या वर्णसमुच्चयास तत्फलदायी अगर तत्तदनिष्टफलनिवारक मंत्र म्हणावें. "ज्याच्या अर्थाच्या प्रकाशनासाठी आम्हाला काहीं मनन करावें लागतें, आणि काहीं प्रयोगही करावे लागतात, मननाने व प्रयोगानी ज्याच्या अर्थावर प्रकाश पडतो, तसेच ज्याचा अर्थ उत्तरोत्तर विकसित होऊ शकतो वा होणारा आहे त्याला मंत्र म्हणतात." विनोबा भावे. (मराठा २९-१२-१९६८ गो. प्र. भा.)

## ४. शब्द व ध्वनि

वेदमंत्राचा उच्चार म्हणजे ध्वनी होय. ध्वनिपासून गति व गतीपासून ध्वनि ही परस्परावलंबी उपपत्ति आहे. गतीचीं रंग, प्रकाश, उष्णता, आकर्षणशक्ति व विद्युत् अशीं रूपांतरें होतात. योगशास्त्राच्या सिद्धान्ता-प्रमाणें पाहिले तर ध्वनीला रंग व आकार आहे. मानवी शरीरातील षट्चक्रांपैकीं अनाहत विशुद्धि व आज्ञा या चक्रात उत्पन्न होणारे ध्वनि

योगशास्त्रात सांगितल्याप्रमाणें बरोबर आहेत, असें पाहून मगच मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं मंत्रांतील ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उदात्त, अनुदात्त, स्वरित असे स्वर कायम केले व इष्ट फलप्राप्तीकरिता इष्ट अशी विद्युत्शक्ति निर्माण होतें, याचे प्रयोग पाहूनच मंत्राचे निरनिराळे विनियोग (उपयोग) त्यांनीं ठरविले. अशा *प्रकारच्या वेदमंत्रांच्या पठणानें अतींद्रिय जगांतील सुप्त विद्युतशक्ति जागृत करून तिचा पुरवठा जगत्कल्याणकरितां व जगद्धारणेकरितां व्हावा या हेतूनेंच त्यागमूर्ति ब्राह्मणाचें तें आदि कर्तव्य समजलें गेलें व म्हणूनच त्यांस सर्व वर्णांचे गुरू ही संज्ञा दिली गेली.* ध्वनीपासून म्हणजे *अर्थपूर्ण* शब्दापासून उत्पन्न होणाऱ्या अनंत शक्ति व शक्तीपासून जी अनंतविध कार्ये घडतात, त्यांना अनुलक्षूनच त्या ध्वनीचे अर्थ त्या ध्वनींमध्येंच अनुस्यूत असतात, असें सिद्ध होतें. म्हणून शब्द *आणि अर्थ यांचा सृष्टींतील परस्पर संबंध स्वयंभू आहे, नित्य सिद्ध आहे, अखंड* आहे व *चिच्छक्तियुक्त* आहे; परंतु मानवी वाचारूपी यंत्रांतून हे ध्वनि बाहेर पडतांना त्या मंत्रांच्या कार्यक्षमतेप्रमाणें ते बाहेर पडणार व त्याच्यापासून तितक्या प्रमाणानेंच कार्यें होणार हें सिद्धच आहे.

असे शब्द दोन प्रकारचे आहेत. मानवी व्यवहार संपादण्याकरितां योजलेले जे शब्दसमूह, त्यांच्या योगानें बनलेल्या भाषेस 'सांकेतिक भाषा' असें म्हणतात व इतर पशुपक्ष्यादिकांच्या शब्दाला 'ध्वनि' म्हणतात. मानवी व्यवहाराकरितां योजलेली ही सांकेतिक भाषा निरनिराळ्या मानववंशामध्ये निरनिराळ्या प्रकारची असते. अन्नपानादिकांचे संपादन, इंद्रियसुख संपादन, आनंद, भय, शोकदर्शन हेंच मानवी व्यवहार होत. तसेंच पशुपक्षी यांचेंही ध्वनिरूप उच्चार वरील मानसिक सुखदुःखदर्शक असतात. पशुपक्षी यांची भाषा जाणणाऱ्या ज्ञानी लोकांनीं पशुपक्ष्यांच्या विशिष्ट ध्वनि उच्चार विशिष्ट इच्छादर्शक असतात, असें प्रात्यक्ष प्रयोग करून सिद्ध केलें आहे. 'गोरिला' नावाच्या वानराच्या ध्वनीवरून एका गृहस्थानें गोरिलाची भाषा बसविली आहे. म्हणून

सांकेतिक भाषेपेक्षां मानवी भाषेला शब्द व पशुपक्षी यांच्या उद्‌गारांना ध्वनि म्हणणे अशा प्रकारचा भेद फार सूक्ष्म आहे.[1] असो. आता एखादी इष्ट परिणामकारक गोष्ट करावयाची असल्यास ठरविलेली अशीच शब्दयोजना केली पाहिजे. अशा शब्दयोजनेस सिद्ध भाषा असे म्हणतात. उदाहरणार्थ, पर्जन्य पडण्याकरिता जीं पर्जन्यसूक्तें म्हणावी लागतात. या पर्जन्यसूक्तासंबंधानें होणाऱ्या परिणामाचा अनुभव लेखकानें घेतल्याचा उल्लेख पुढील भागात आलेला आहे. त्या सूक्ताची भाषा सर्वत्र सारखी असली पाहिजे म्हणजे मग अशा त्या भाषेनें घडून येणारा इष्ट परिणाम सर्वत्र सारखा होईल.

---

१. फार फार जुन्या काळची माणसें पशुपक्ष्यांचीं भाषा जाणत असत. कोल्हा, भालू (म्हावारी कोल्ही) हुमण, कुथ, घुबड इत्यादि प्राण्यांच्या 'ध्वनि' म्हणजे आवाजावरून, ओरडण्यावरून भावी अनर्थांची कल्पना जाणणारे लोक असत. (भारताच्या कांहीं जंगली भागात अद्यापि क्वचित आहेतही.) मुंग्या, चिमण्या, खारकुडी (हिंदीत 'गढी म्हणतात', इंग्रजींत squirrel म्हणतात) यांची पण भाषा आहे असे सूक्ष्म निरीक्षणानें ध्यानात येईल. वानर व माकडें ह्यांची भाषा आहे 'टार्झन' Tarzan या इंग्रजी चित्रपटात ह्या प्राण्यांची भाषा कशी असते तें समजून येतें. त्या त्या प्राण्यांच्या—पशु पक्षी इत्यादि हालचाल व ओरडणे यावरून भावी घटनांची आगाऊ कल्पना कशी होते व ती कशी समजावी ह्याचे सूक्ष्म निरीक्षण करुन भारतीय ज्योतिर्विदांनीं कांहीं सिद्धांतही बसविले आहेत. महाभारतीय युद्धाच्यावेळीं ज्या अशुभ घटना घडत होत्या त्या, प्राण्यांच्या आवाजावरुन ओळखून त्यांचे वर्णनही केलेलें आहे. राजा भर्तृहरीला पक्ष्यांची भाषा येत होती हे ऐतिहासिक उदाहरण विचारार्ह आहे.

आयुर्वेदामध्ये प्राण्यांची भाषा जाणी अपत्याला यावी या हेतुन गर्भिणी, दर त्यासपेय पदार्थांचे प्रयोगही सांगित रे आहेत. पाश्चिमात्यांना अनेक प्रयोग करून पाण्यांतील माशांचीही भाषा असते असे शोध पाण्यात राहून करुन त्यांचें निरीक्षण करून त्यांची भाषा समजून घेण्याचा प्रयत्न कांहीं पाश्चिमात्य शास्त्रज्ञ करीत आहेत. (Science 1963) गो. प्र भा.

## ५. मंत्रोच्चारपद्धति व परिणाम

अशा मंत्राचा जप तीन प्रकारचा असतो. व्यक्त, *उपांशु* व *मानस*, अशा त्या तीन प्रकारच्या जपक्रियेचीं निरनिराळी फळेही सांगिली आहेत.

जिव्हेने स्पष्ट उच्चारलेल्या जपास '*व्यक्त*' जप म्हणतात. असा जप दुसऱ्यास ऐकू येतो. ह्या जपानें आधिभौतिक प्रतिबंधाचा परिहार होतो. जिव्हेने अस्पष्ट म्हणजे दुसऱ्यास ऐकू न जाईल व आपणास ऐकू येईल अशा जपास '*उपांशु*' जप म्हणतात. ह्या जपाने आधिदैविक प्रतिबंधाचा परिहार होतो. '*मानसिक जप*' म्हणजे मनातच, परंतु मोठ्या आवाजानें जप केल्यास त्यास मानसिक जप म्हणतात. हा जप आपल्या अंतर्रसनेने होतो व तो आपल्या सूक्ष्म श्रवणेंद्रियास ऐकू येतो. अशा प्रकारचा जप आपल्या प्राणमय शरीरातील वाचेने होतो. स्वप्नातील शब्द जसे स्वप्नावस्थेतील श्रवणेंद्रियास ऐकू येतात व जागृतीत आल्यावर केवळ स्मरणाने त्याचा अनुभव अन्नमय शरीरात येतो, तसा मानसिक जपाचा अनुभव जागृतावस्थेत असताना येतो. अशा प्रकारच्या जपास '*मानसिक जप*' म्हणतात. ह्या जपाने आध्यात्मिक प्रतिबंधाचा परिहार होतो असे सांगितले आहे. वैखरी वाणीनें होणारा जप '*व्यक्त*' होय. मध्यमा वाणीने होणारा जप '*उपांशु*' होय व पश्यंती वाणीने होणारा जप '*मानसिक*' होय. व परावाचेने होणारा जप '*उन्मनी*' म्हणजे मन प्रांताच्या पलीकडील वाचेने होणारा जप होय. *ह्या जपानें आत्मसाक्षात्कार होतो.*

जिव्हेनें स्पष्ट उच्चारलेल्या जपाने अगर अस्पष्ट उच्चारलेल्या उपांशु जपानें प्रत्येक वर्णाचे ठायीं जी गूढशक्ति असते ती उच्चाराबरोबर जागृत होते. व त्या वर्णाबरोबर अंतराळात उच्चारकर्त्याच्या आसमंतात विद्युद्वलये, विद्युत्पुंज व विद्युच्छलाका उत्पन्न होतात. त्या विद्युच्छक्तीने अंतराळातील दृश्य व अदृश्य तत्त्वे जागृत होऊन जपकर्त्याकडे आकर्षित केली जातात. *ह्या क्रियेने* वातावरणावर मंत्रोद्दिष्ट परिणाम होऊन परंपरया

वातावरणातून स्थूल सृष्टीवर म्हणजे जपकर्त्याच्या अन्नमयादि कोशावर ते मन्त्रोद्दिष्ट परिणाम होतात. पौर्वात्य योगशास्त्रातील प्रक्रियात वर्णन केल्याप्रमाणे मानवी शरीरात 'कुंडलिनी शक्ति' वास करते, तसेच ब्रह्मांडात 'महाकुंडलिनी' शक्तीचे वास्तव्य आहे. 'पिंडीं ते ब्रह्मांडीं' या उक्तीप्रमाणे या दोन्ही 'कुंडलिनी शक्ति' आपापलीं कार्यें करीत असतात. ही महाकुंडलिनी म्हणजे महाविद्युत् शक्ति होय. सर्व ब्रह्मांडातील घडामोडी जशा महाकुंडलिनी शक्तीनें चालतात, तशाच शरीरस्थ कुंडलिनी शक्तीनें म्हणजे विद्युत् शक्तीनें शरीरस्थ सर्व क्रिया चालतात. मानव शरीर उत्पन्न झाल्यावेळीं ज्या आकाशस्थ ग्रहाचे जसे परिणाम घडून येणार असे ठरलेले असतें, त्याप्रमाणे शरीरस्थ कुंडलिनी शक्ति कार्य करते, परंतु या ग्रहाच्या अनिष्ट परिणामाचा परिहार करणें झाल्यास त्या ग्रहाचे त्या त्या वेळीं जे परिणाम घडणार असतील, त्या परिणामाची प्रतिक्रिया मन्त्रशक्तीनें साध्य करिता येते. प्रत्येक व्यक्तीला याप्रमाणें मन्त्रजपानें मन्त्रशक्ति उत्पन्न करून स्वतःवर आक्रमण करणाऱ्या आगामी अनिष्ट परिणामाचा परिहार करिता येतो, इतकेंच नव्हे तर अशी मन्त्रशक्ति जागृत करून दुसऱ्याच्याही भावी अनिष्ट परिणामाचा प्रतिकार करता येतो. यावरून *मन्त्रशास्त्र हें प्रयोगसिद्ध शास्त्र आहे* असें सिद्ध होतें. फल ज्योतिषशास्त्रानें मनुष्यास आगामी संकटाची *सूचना मिळते. प्राक्तन* म्हणजे दैव व प्राक्तनकर्मापासून उत्पन्न होणाऱ्या संकटाचा परिहार अद्यतन कर्में करून करिता येतो; हेंच मानव जन्मातील इति कर्तव्य होय व तें मन्त्रशक्तीच्या साह्यानें साध्य करिता येतें. *हीच मन्त्रशास्त्राची महती होय.*

## ६. जपाचा परिणाम

*आधुनिक पाश्चात्य शास्त्रज्ञांनी शोधबुद्धीनें* असा सिद्धांत स्थापित केला आहे कीं, *मानवी शरीर हें एक विद्युत् घटयन्त्र आहे.* (Battery-

Electric Power house) तेव्हा अशा ह्या कुंडलिनी शक्तियुक्त मानवी शरीराच्या साधनानें जो वर्णघटित मंत्राचा उच्चार होतो, त्या उच्चाराच्या योगानें विद्युच्छक्ति उत्पन्न होणे, ही गोष्ट क्रमप्राप्तच आहे. जगातील आद्य ग्रंथ जे वेद ते म्हणणाऱ्या ऋषिवर्यांनी आपल्या दिव्य-दृष्टीने व योगिक बलानें मंत्राच्या ठायीं गूढ असलेल्या दिव्य शक्तींचा अनुभव घेतला व त्यांनीं इष्टफलप्रापक व अनिष्टफलनिवारक शक्तींचा संचय असलेल्या मंत्राचा विशिष्ट कार्मी विनियोग करिता येतो, असा सिद्धांत बसवून अखिल मानव जातीच्या कल्याणार्थ मंत्र व त्याचे विनियोग (उपयोग) शिष्यपरंपरेत चालू ठेविले.

## ७. मंत्रशास्त्राची उत्पत्ति

आतापर्यंत शास्त्र, मंत्र व शब्द याचे विवरण झालें. वस्तुतः मंत्रशास्त्राचे निराळे असे शास्त्रग्रंथ उपलब्ध नाहींत. तंत्र व आगम, यामल व कल्प हेच ग्रंथ मंत्रशास्त्राचा ऊहापोह करीत असतात. वैशेषिक, सांख्य, न्याय वगैरे षट्शास्त्रांत मंत्रशास्त्र असा निराळा शास्त्रीय ग्रंथ उपलब्ध नाही. निदान लेखकास तरी तो उपलब्ध झाला नाहीं. तंत्रशास्त्र ग्रंथांत असें वर्णन आहे की, श्रीशंकराच्या चार मुखापासून 'वेद' निर्माण झाले व पांचव्या ऊर्ध्व मुखापासून 'आगम' उत्पन्न झाले, वेद व आगम हे एकदाच म्हणजे एका वेळीच निर्माण झाले आणि शास्त्रे मागाहून निर्माण झालीं. शास्त्राचे कर्ते निरनिराळे ऋषि मुनि आहेत. वर नमूद केलेलीं षट्शास्त्रें निर्माण झालीं त्यावेळीं अगर त्यानंतर मंत्रशास्त्र असें एक शास्त्र कोणी निर्माण केलेलें आहे असें दिसत नाही.

एकंदरीत मंत्रशास्त्र असें निराळें शास्त्र नाही याचे कारण असें असावें की, चार वेदांपकीं एकच वेद म्हणजे अथर्वणवेद मंत्रशास्त्रमय आहे. म्हणजे इतर उर्वरित तीन वेदांत मंत्र नाहीत असें नाही. परंतु ह्या अथर्वणवेदात इष्ट फलदायी व अनिष्ट परिहारक असेच मंत्र पुष्कळ

आहेत, म्हणून कदाचित् निराळ्या मन्त्रशास्त्राचा ग्रंथ निर्माण केला नसावा. यज्ञकर्म व यज्ञमीमांसा ह्याच वैदिक काळात वैदिकांचा मुख्य व्यवसाय असल्याने व यज्ञीय कर्म म्हणजे मासिक, पाण्मासिक, वार्षिक व द्वादश-वार्षिक असे निरनिराळे यज्ञ त्या यज्ञीय कर्मांचे भाग पाडलेले असल्याने यज्ञामध्ये तीन ऋत्विक्, यजमान व यजमानपत्नी यांचे रक्षण करण्याचे कार्य ब्रह्म्याकडे म्हणजे अथर्वणवेदवेत्याकडे सोपवून दिलेले असे. अर्थात् अथर्वणवेदवेत्याच्या रोजच्या *व्यवहारात मन्त्रविद्या जागृत ठेऊन तिचा उपयोग करण्याची जरुरी असल्याने रोजच्या व्यवहाराचे निराळे शास्त्र लिहिलेले नसावे असे वाटते.*

□ □

अमृत–मंजिरी

१. मन्त्रशास्त्र हे अनुभवदर्शी शास्त्र आहे
२. मन्त्रजप अर्थानुलक्षी करा तरच फलप्रद होतो.
३. सर्व वेद मन्त्रमय आहेत.
४. वेदमन्त्र संस्कृत भाषेत आहेत
५ संस्कृत ही एकच भाषा सर्वात जास्त प्रगत व प्रगल्भ आहे.
६. संस्कृत इतके जास्त वर्णोच्चार जगातील कोणत्याच भाषेत नाहीत

# २ वेद व आगम विचार

## १. वेद व त्यांचे अपौरुषेयत्व

अशा प्रकारच्या सर्व प्राचीन व अर्वाचीन मत्राचे उगमस्थानभूत झालेले असे *सर्व जगातील आद्य ग्रंथ म्हणजे वेद हे होत.* वेद हे ज्ञानरूप आहेत, अनत आहेत, अपूर्व आहेत व अपौरुषेय आहेत. अपौरुषेय म्हणजे त्याचा निर्माता असा एक पुरूष नाहा. "यस्य निश्वसित वेदा" या वचनानं वेदाची उत्पत्ति पचभौतिक देहधारी पुरुपाकडून न होता ती परमात्म्याच्या शक्तीपासून झाली आहे असें निर्णित केले आहे. *ब्रह्मदेवाच्या मुखापासून वेद निर्माण झाले म्हणजे त्याच्या निश्वासाबरोबर ते अमूर्तातून अगर अव्यक्त अवस्थेतून व्यक्तावस्थेत आले.* ब्रह्मदेवानें श्वास आत घेतल्याबरोबर पुन्हा ते अव्यक्त रूपात अतर्धान पावतात. मानवी प्राणी श्वास व उच्छ्वास करितात व म्हणून ते आपल्या श्वासोच्छ्वासाचे निर्माते होत नाहीत. या उदाहरणाप्रमाणेच ब्रह्मदेव हे वेदाचे कर्ते होऊ शकत नाहात. *या ब्रह्मदेवाच्या श्वासापासून* उत्पन्न होऊन ऋषींना तेजोरूपानें प्रत्यक्ष दृश्य झालेले व श्रुत झालेले असे वेद असल्यानें "ऋषयो मन्त्रद्रष्टार आसन्" *ऋषी मन्त्रद्रष्टे होते. पण काही ऋषि मन्त्रकर्तेही होते.* त्याची प्रज्ञा अतिमानव कोटींतील होती.

वेदाचे भाष्यकार श्रीसायणाचार्य याना वेदाचे लक्षण खालीं नमूद केल्याप्रमाणे लिहिले आहे.

"इष्टप्राप्त्यनिष्टपरिहारयोरलौकिकमुपायं यो ग्रंथो वेदयति स वेदः। प्रत्यक्षेणानुमित्या वा यस्तूपायो न बुद्धयते एव विंदति वेदेन तस्यात् वेदस्य वेदता॥

इष्टफलप्राप्ति व अनिष्टफलपरिहार दर्शविणारे व प्रत्यक्ष अथवा अनुमान या प्रमाणानी ज्याची कल्पना करिता येत नाही अशा प्रकारचे उपाय सागणारे जे ग्रथ ते वेद होत.

तसेच अथर्ववेदाची प्रस्तावना लिहिताना वेदभाष्यात श्रीसायणाचार्य लिहितात कीं—

"ततः शब्दार्थस्तत्संबंधानां नित्यत्वेन अपौरुषेयत्वात्पुरुष बुद्धिप्रभवदोषानुप्रवेशाभावेन वेदाना स्वतः सिद्धिप्रामाण्यम्। पुरुषप्रयत्नाऽनिवर्त्यत्वेन नित्यत्वम्"

वेदाचे अपारपयेत्व असे सिद्ध होतें की, वेदातील शब्द व त्याचे अर्थ याचा नित्य सबध आहे. म्हणून वेद अपौरुपेय आहेत पुरुपबुद्धीमध्ये दोप होणे अपरिहार्य आहे व अशा पुरुप-बुद्धिजदोपाचा वेदामध्यें अभाव आहे, म्हणून ते स्वत.सिद्ध आहेत. पुरुपप्रयत्नानी ते साध्य होण्यासारखे नाहात कोणी म्हणेल मी वेदातील ऋचेसारखी एक ऋचा तयार करतो, तर त्याने तयार केलेल्या ऋचेच्या विनियोगानें अमुक फल साध्य करून देणे ही गोष्ट त्याला साध्य होणार नाहा, म्हणून वद हे अपौरुपेय आहेत.

वेद हे स्वयप्रकाश आहेत. कारण ते स्वयभू आहेत. ज्याला प्रकाशित होण्यास दुसऱ्या पदार्थाच्या सहाय्याची अपेक्षा नसते व जो दुसऱ्या पदार्थास आपल्या प्रकाशाच्या सहाय्यानें प्रकाशित करितो तो स्वयप्रकाश होय. स्वभावत जो पदार्थ मधुर आहे त्याला मधुरिमा आणण्यास दुसऱ्या मधुर पदार्थाची अपेक्षा नसते दूध, दही, ताक या पदार्थांस माधुर्य आणण्यास गूळ, साखर अगर मध या पदार्थाची जरूर लागते परतु साखर, गूळ व मध हे पदार्थ स्वत सिद्ध मधुर असल्यानें त्यास माधुर्य आणण्यास दुसऱ्या पदार्थाची आवश्यकता भासत नाहा. एखाद्या

नृपप्रासादातील पदार्थ समजवून घेण्यास प्रकाशाची जरूर लागते परंतु प्रकाशास व्यक्त होण्यास किंवा आपल्या प्रकाशकत्वाचा गुण सिद्ध करण्यास दुसऱ्या कोणत्याही पदार्थांची जरूर लागत नाही. सर्व जगात प्रकाश ही अशी वस्तू आहे की, ती इतर सर्व पदार्थांस व्यक्त करिते. प्रकाश झाला कीं, त्याबरोबरच अंधकाराचा विनाश होतो. प्रकाश व अंधकार या जोडीत प्रकाश वस्तू आहे. अंधकार ही काही वस्तू नव्हे. ती एक शून्यावस्था आहे. प्रकाश हा स्वयंप्रभविष्णु आहे, ज्योतिष्मान् आहे. आणि असे आहे, म्हणून असे म्हणण्यास काही हरकत नाही कीं, ज्याप्रमाणे प्रकाशाचे दिग्दर्शन करण्याकरिता कोणत्याही इतर साधनाची अपेक्षा नसते, त्याप्रमाणेच वेद हे अखिल ब्रह्मांडातील दृश्य व अदृश्य मनोनुभवी वस्तू प्रकाशित करणारे आहेत, म्हणून वेदाचे दिग्दर्शन वेदच करू शकतात. सर्व *पंचभौतिक वस्तुजाताच्या अतीं एक अज्ञेय, अप्रमेय, अमूर्त, चिद्विलासमय वस्तू म्हणजे ब्रह्म आहे*, तेच वेदाचे मूळ होय, याकरिताच वेदांना स्वयंप्रकाशादि सर्व उपपदे लागू होतात. वेदाच्या नित्यत्वाबद्दल आणखी उहापोह करण्याचे हा निबंध हे स्थळ नव्हे.

## २. योगशास्त्रदृष्ट्या वेदांचे अपौरुषेयत्व

(अ) या विषयाचा विचार करावयाचा तर त्याचे तीन भाग पडतात (१) वेद व त्याची उत्पत्ति किंवा उपपत्ति. (२) वेद प्रगट करणारे वेदद्रष्टे ऋषि व वेदश्रोते ऋषि. (३) वेद श्रवण व वेद दर्शन होण्याचे साधन.

*वेद व त्याची उत्पत्ति किंवा उपपत्ति* — वेद व वेदज्ञानाची अभिव्यक्ति करणाऱ्या मात्रा व पादरूप अक्षरसमूह, अर्थात प्रत्येक वस्तूचे मूलभूतशब्द व शब्दसमूह, ज्यांची रूपे व नाद आकाशतत्त्वात अनुगुंठित असतात ते वेद होत. म्हणजे *आकाशतत्त्वाच्या लहरींतील संघर्षणाने प्रगट झालेली नाद व रूपें हेच वेद होत.*

ऋचो अक्षरे परमे व्योमन् ।
तस्मिन् इंद्रो वरुणो मित्रो अर्यमा ओकांसि चक्रिरे ।

'न क्षरति इति अक्षरः' क्षरणरहित व अनश्वर म्हणजे नित्य अशीं वेदाक्षरे 'परमे परमव्योम्नि' म्हणजे महदकाशरूपी परब्रह्मांत असतात व तेथें अग्नि, वरुण इत्यादि देवताचीं स्थानें आहेत. म्हणजे परमाकाशातील अणुअणूत तीं ऋगादि वेदाक्षरे निविष्ट झालेलीं आहेत. अशा त्या ब्रह्मरूप परमात्म्याचे ठिकाणीं सर्व देव रहातात. सूक्ष्मदर्शी ऋषींना ते देव व तीं वेदाक्षरें दृगोचर झालीं. तसेंच वरील वर्णनाला उद्बोधक असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें एक वाक्सुमन उद्धृत करण्यात येत आहे. तें असें—

घोषणाचिया कुंडि । नादचित्रांची रूपडि ।
प्रणवाचिया मोडि । रेखिली पेशीं ॥

आकाश संवलित आकाशफलकातील परमाणूच्या लहरीतील *परमाणूच्या संघर्षानें उत्पन्न झालेल्या नादात वेदाक्षरें ऐकूं येतात*, हाच अर्थ घोषणाचिया कुंडि, नादचित्राची रूपडि (चित्रे) ह्या ओवींत आहे. प्रणवाच्या अंगभूत असलेल्या उच्चाराची अर्थात् मात्राची रेखिव मांडणी केलेली असते, तींच वेदाक्षरें होत. वरील वेदाक्षराचा अनुभव योगातील 'शब्दानुविद्ध' व 'दृश्यानुविद्ध' या समाधींत येतो. समाधि अखंडैक—रसानें सवित् स्फुरण होणें हीच समाधि होय.

दृश्यानुविद्ध समाधि—वृत्तीतून इतर नामरूपें काढून टाकून अस्ति भाति प्रियतास्फूर्तीची महदाकाशातील प्रकाशाचे ठिकाणीं धारणा केली तर महदाकाशात जीं ऋगादि वेदाक्षरें अनुस्यूत आहेत, तीं दिसणे हाच 'श्रुति' होत. ह्या समाधीस दृश्यानुविद्धसमाधि असे म्हणतात. अशीं वेदाक्षरें ज्या महर्षींना दिसलीं तेच *मन्त्रद्रष्टे ऋषि होत.*

शब्दानुविद्ध समाधि—श्रवणउपयोगी वाच्यार्थ म्हणजे वाच्याकाशाचा त्याग करून महदाकाशाचे ठिकाणीं धारणा करावी म्हणजे त्या योगानें अनुभूतींत येणारे वेदाक्षराचे नाद हाच श्रुति होत व ऋषींनीं ह्या श्रुति

ऐकल्या म्हणून त्यास 'वेदश्रोते ऋषि' असे म्हणतात. त्यानीं ऐकलेल्या वेदाक्षरास मूर्तस्वरूप देऊन ती पठणात लेखनात आणली म्हणून ते ऋषि वेदद्रष्टे व वेदश्रोते ऋषि या अभिमानुष पदवीस प्राप्त झाले. अशा प्रकारची समाधि प्राप्त होण्यास त्यावर जन्मापासूनचे सर्व संस्कार झालेले होते व तीव्र तपश्चर्येने त्याना दूर श्रवण व दूरदर्शनादि सिद्धि प्राप्त झालेल्या होत्या. अशा समाधि साधनाने मूळ अस्तित्वात असलेले वेद, ऋषींना ऐकले व पाहिले म्हणून ते ऋषि वेदकर्ते होऊ शकत नाहात. अर्थात वेद पुरुषयत्नाना निर्माण झालेले नाहात. ते स्वयभूच आहेत हे सिद्ध होतें.

## ३. वेदोत्पत्ति परिचय

अशा वेदाचे चार विभाग झालेले आहेत. वेद हे एकच, परतु यज्ञादि कर्मांच्या पूर्तीकरिताच ते चतुर्भागात्मक झालेले आहेत, असे स्पष्ट होते.

**"ऋचां त्वः पौषमास्ते पुपुष्वान् गायत्रं त्वा गायति शक्वरीषु।**
**ब्रह्मा त्वो वदति जातविद्यां यज्ञस्य मात्रां वि मिमीत उ त्वः॥"**

ऋ सहिता १०७१-११

ह्या ऋग्वेदातील अवतरणात यज्ञाकरिता चार ऋत्विजाची चार दिशेकडे जरुरी आहे, असें म्हटलं आहे. ऐतरेय ब्राह्मणात असे म्हटल आहे की "त्रयो वेदा अजायन्त, ऋग्वेद एवाग्नेरजायत यजुर्वेदो वायो सामवेदो आदित्यात्, इति" सत्यापाढ सूक्तात असे म्हटल आहे कीं, "ननु यज्ञ व्याख्यास्याम स त्रिभिर्वेदैर्विधीयते। ऋचः सामानि जज्ञिरे यजुस्तस्मादजायत" (ऋ.स) परतु उपरिनिर्दिष्ट 'ऋचां त्व पोषमास्ते' या ऋग्वेदातील वचनानें ऐतरेय ब्राह्मणामध्ये अशी शका घेतली आहे की, 'अथ केन ब्रह्मत्व क्रियते?' या शकेचें निराकरण असे केले आहे का, यदेतत्त्रयं विद्याय शुक्र तेन ब्रह्मत्व क्रियते" यावर श्री सायनाचार्य आपल्या अथर्वणे वेदभाष्यात लिहितात कीं—

याद्दग्वर्णं तथा वर्णान्यसंहृतिधराणि च ।
पश्चिमं यद्विभोर्वक्त्रं ब्रह्मणः परमेष्ठिनः ।
आविर्भूतानि सामानि तत्तच्छंदांसि नान्यथा ।
आथर्वणमशेषं च भृंङ्गांजनचयप्रभम् ॥'' (मार्कंडेय पुराण)

ब्रह्मदेवाच्या पूर्वमुखापासून जपाकुसुमाच्या म्हणजे जास्वंदीच्या फुलाच्या रंगाप्रमाणे वर्ण असलेले ऋग्वेद निघाले. दक्षिण मुखापासून धूलिधूसर रंगाचे यजुर्वेद निघाले. पश्चिम मुखापासून शुभ्रवर्ण सामवेद निघाले. उत्तर मुखापासून नीलवर्णाचे अथर्वण वेद निघाले. ब्रह्मदेवाच्या मुखापासून निघाले म्हणजे अमूर्त रूपातून मूर्तरूपात आले. त्याचा अर्थ असा कीं, श्री ब्रह्मदेवाच्या श्वासातून ध्वनिरूपानें वेदाचा उच्चार झाला. ध्वनिरूपानेंच ते अंतराळात राहिले. अशा प्रकारानें ध्वनिरूपात असलेले वेद योगारूढ ऋषिवर्यांनी आपल्या दिव्य अशा योगज-दृष्टीनें पाहिले व आपल्या दिव्य श्रुतिशक्तीनें त्या वेदमंत्राचे श्रवण केले आणि श्रवण करून त्यांनी ते म्हटले म्हणून वेदांना 'श्रुति' असें म्हणतात व ज्या ज्या ऋषींनी ते वेदमंत्र पाहिले, श्रवण केले व पठण केले, त्या त्या ऋषींस 'वेदमंत्रद्रष्टे' ऋषी असें संबोधण्यात आलें व ते ते ऋषी त्या मंत्राचे 'ऋषी' झाले अशा मंत्राच्या दर्शनाचे वेळीं वेदद्रष्ट्या ऋषींस त्या मंत्राच्या देवताही योगज दृष्टीनें दिसल्या. त्या त्या देवता त्या त्या 'मंत्राच्या देवता' होत असें त्या मंत्रद्रष्ट्या ऋषींनी आपल्या शिष्यास सांगून ठेवलें.

वर लिहिल्याप्रमाणे ब्रह्मदेवांनी उच्चारलेल्या वेदमंत्रापासून सृष्टि उत्पन्न झाली. ब्रह्मदेवांनी वेदमंत्राचा उच्चार करण्यापूर्वी वेदमंत्र होतेच व सृष्टीही होतीच. परंतु ते वेदमंत्र व सृष्टि हे द्वंद्व महाप्रलय झाल्यामुळें अमूर्त स्वरूपातच होतें. म्हणजे महाप्रलयाचे वेळीं ही सृष्टि वेदमंत्रात लीन झाली व वेद हे ब्रह्मरूपात अंतर्धान पावले इतकेंच, वेद ब्रह्मरूप असल्यानें ते लय पावत नाहींत. तर ब्रह्मरूपच होऊन जातात. कारण ब्रह्म ही वस्तु अविनाशी व एकमेवाद्वितीय आहे

## ४. वेदमंत्र व आगमोक्तमंत्र समन्वय

सर्व वेद मंत्रमयच आहेत व वेदाचे पठनपाठन हेच तत्कालीन ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य होतें. यज्ञक्रिया चालू असताना नाना प्रकारचे प्रत्यूह उत्पन्न होत असत. अनिष्टफलनिवारण व इष्टफलप्राप्ति या दोन्हाची नित्यनैमित्तिक कर्मांत इष्टापत्ति असल्याने मंत्रशास्त्र अशा स्वतंत्र ग्रंथाची प्रारंभीं आवश्यकता वाटली नसावी. म्हणून लेखकानें निबंधाच्या शीर्षकांत "मंत्रशास्त्र व मंत्रशक्तियोग" असा या लेखाचा नामनिर्देश केला आहे. मंत्रशास्त्राची केवळ शास्त्रीय रीतीनें मांडणी केली असती, तर त्या उपक्रमाचा विशेष उपयोग झाला नसता. म्हणून मंत्रशास्त्राचा विषय आचारात कसा आणावा हे समजण्याकरिता योगशास्त्रातील मंत्रयोग व तंत्र आणि आगम ग्रंथातील मंत्र, यंत्र व इतर प्रतीकें यांची साधना कशी करावी या सर्वांचा समन्वय केला आहे. मंत्रशास्त्रांतर्गत मंत्रविद्या आजच्या आचारविहीन काळातही कशी अनुभविता येईल हे दाखविण्याकरता हा प्रयत्न केला आहे. असो. आता प्रथमत वेदमंत्राबद्दल विचार करू.

## ५. वेदमंत्रद्रष्टे ऋषि व वेदशाखा

प्रत्येक युगचतुष्टयाच्या शेवटीं वेदअभ्यासकाचे बुद्धीस मालिन्य प्राप्त होऊन वेदपठन बंद पडत व वेदज्ञानही नष्ट होतें. अशा वेळीं व्यासरूपान श्रीभगवान् महाविष्णु प्रगट होतात, व वेदांचा उद्धार करण्याकरिता आपल्या शिष्याना वेद शिकवून त्यांचेकडून वेदमंत्राचा प्रचार करवितात. याप्रमाणे सत्तावीसाव्या युगपरिवर्तनाचे शेवटीं श्रीव्यासांना आपल्या "पैल" नामक शिष्यास ऋग्वेद शिकविला. पैल ऋर्षीना त्याच्या पाच शाखा सांगितल्या. त्या पाच शाखा खालीलप्रमाणे आहेत—आश्वलायन, सांख्यायन, शाकल, बाष्कल व मांडूक्य वैशंपायन नामक शिष्यास यजुर्वेद

सांगितला.' त्याच्या शाखा तेरा आहेत. त्या अशा—चरक, आव्हारक, कठ, प्राच्यकठ, कपिष्ठल, चारायणीय, वारायणीय, वार्तांतवीर्य, श्वेताश्वतर, औपमन्यव. पाताडनीय, मैत्रायणीय, वतैत्तिरीय. हा कृष्ण यजुर्वेद होय. याज्ञवल्क्य ऋषींना श्रीसूर्य देवतेने अश्वरूपाने शुक्लयजुर्वेद सांगितला. त्याच्या शाखा सोळा आहेत. त्या अशा :—काण्वाः, माध्यंदिनाः, जाबालाः, बौधेयाः, शाणायटाः, शावीय नागराः, प्रापणीयाः, कापोलाः, पाड्वत्साः, आवटिकाः, परमावटिकाः, पाराशर्याः, वैधेयाः, वैनेयाः, गालवाः, वाजपेयाः, व कात्यायनीयाः, जैमिनी नामक शिष्यास सामवेद सांगितला, त्याच्या शाखा नऊ झाल्या.

त्या अशा – जैमिनीया, गौतमा, कौथुमाः, लांगलाः, महाखल्वलाः, खल्वलाः, मुद्गलाः, शाट्यायनीयाः, तसेच सुमत नामक शिष्यास आथर्वण वेद सांगितला. त्याच्या शाखा नऊ आहेत. पैप्पलाः, दान्ताः, प्रदान्ताः, स्तोतागः, औतराः, वल्प्रदाः, शौनकीयाः, देवदर्शाः, चरणविद्याः कुरुजकाः (गयावळ्यः), आजामिला. (गंगापुत्रा), सेमवसु, श्रावका, (मरुदेशे). या शाखांच्या उपशाखा आणखी आहेत. कृष्ण यजुर्वेदाच्या मैत्रायणीय शाखेच्या सात उपशाखा आहेत. मानवाः, दुंदुभा इत्यादि व तैत्तिरीय शाखेच्या उपशाखा औख्य व कांडिकेय अशा आहेत, व कांडिकेय उपशाखेच्या आणखी पाच प्रति उपशाखा आहेत. त्या अशा :—आपस्तंभा., बौधायनाः, सत्यवादिनाः, हिरण्यकेशीयाः, औधेयाः, कृष्णयजुर्वेदातील कठ शाखेच्या तेरा उपशाखा आहेत व शुक्ल यजुर्वेदाच्या जाबाल शाखेच्या चोवीस उपशाखा आहेत व बौधेय शाणायट या उपशाखेच्या बावीस

---

१. मंत्रब्राह्मण संहिता । मिळोनि पढतां निश्चिता । मूळ प्रख्याता । यजुर्वेदा जाणिजे ॥ ७५ ॥ गुरुचरित्र अ. २६ भाविक भने एक न्यून । संहिता मिळोनि ब्राह्मण । तेचि यजुर्वेद मूळ जाणा । वरकड शाखा जाण ॥ ७६ ॥ (गु. प्र. मा.)

उपशाखा आहेत या बावीस उपशाखांत पाल्शा (महाराष्ट्रातील पळशे) ही उपशाखा येते. म्हणजे पाळ–शा हे शुक्लयजुर्वेदीय ब्राह्मण होत.[१]

वरील शाखांची माहिती "चरणव्यूह" या ग्रंथावरून व रा रा. दत्तात्रय लक्ष्मण जोशी यांनी प्रसिद्ध केलेल्या पुस्तकावरून घेतली आहे. वरील शाखांपैकी पुष्कळ शाखा लुप्तप्राय झालेल्या आहेत.

पृष्ठ २४ वरील स्तंभात वर्णन केलेल्या शाखांचे ब्राह्मण त्या त्या ठिकाणीं उपलब्ध आहेत असे म्हणता येत नाही. खरोखर पाहिले तर वेदविद्येत निष्णात् असणाऱ्या ब्राह्मणांची संख्यागणना म्हणजे खानेसुमारी केली पाहिजे. म्हणजे प्रत्येक शाखेंतील वेदवेत्ते ब्राह्मण किती आहेत ह, व किती शाखा अस्तित्वात आहेत हे समजून येईल. वेदविद्येतील मंत्रशक्ति जागृत ठेवणाऱ्यांची परंपरा नष्ट झाल्यानें मंत्रपठणाकडे सार्वत्रिक ब्राह्मणवर्गाचें दुर्लक्ष होत आहे. मंत्रशक्ति ज्यांना आजच्या कालांतही जागृत ठेविली अशी काही रत्ने वैदिक मंडळींत आहेत. परंतु अलीकडे आचारभ्रष्टता इतकी वाढली आहे कीं, केवळ गायत्री मंत्र कामिक फलप्राप्तीकरिता कसा जपावा हे बऱ्याच लोकांस माहित नाहीं. वैदिक धर्माची व वैदिक संस्कृतीची मोडत चाल्लेली घडी पुन्हा बसविणे हे जगत्कल्याणकारक किंबहुना राष्ट्रकल्याणसाधक कार्य करणे हाही महत्त्वाचा प्रश्न आर्य संस्कृतीच्या अभिमान्यापुढे असावयास पाहिजे

केडगाव क्षेत्राचे संस्थापक क. वा. श्री १०८ नारायण महाराज यांना मागें जो मोठा यज्ञसमारंभ केला त्या यज्ञसमारंभास व्यक्तिशः सामील

१. श्रीगुरुचरित्र २६ व्या अध्यायांत चारही वेदांच्या शाखोपशाखा सविस्तर दिलेल्या असून त्याबद्दल जास्त संशोधन व्हावयास हवे. लेखकानें वर उल्लेखिलेल्या, त्याचप्रमाणें पंडित सातवळेकर ह्यांच्या लिखाणांतून वर्णिलेल्या शाखांपेक्षा जास्त व निराळ्या शाखा वरील २६ व्या अध्यायांत आहेत. (गा. प्र. मा.)

## वेदाच्या शाखा व वेदशाखाच्या ब्राह्मणाचीं वसतिस्थानें.

आता या शाखाचे ब्राह्मण आर्यावर्ताचे बाहेर कोठे कोठे होते याचे दिग्दर्शन करू

| देशाचे नाव | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद | अथर्वण वेद |
|---|---|---|---|---|
| सिंध वाल्हीक | | काशिना | | |
| कूर्म (कच्छ भूज) | | मलना, कुशेद्वा | | |
| सिंहल (लंका) | | पालिभद्रा, साभरकटा | | औतरा |
| माध | | दासलकहा, कुञ्जका, वारूणा | | कुञ्जका |
| | | (गयानल) हिरण्यश्रृंगा | | |
| गुर्जर देश | | हरिद्रवीया, रोहिणा, आदोचा | महाखल्वला | |
| | | | मुद्गला | |
| काशी | आश्वलायनाया | हिरण्यकेशीया, आपस्तंभा | | अजामिला |
| नारायण सरोवर | | | महाखल्वला | |
| विदेह देश | | मैथिला | | देवनर्णा, शौनकेया |
| ताम्रपर्णी | | | | |
| यवनदेश (बलुचिस्तान) | | कठा, प्राच्यकठा, चारायणीया | | |
| | | हसलेकठा | | |
| मथुरा | | चाभगा (चोम) | | |
| गांधार | | सानरा, मुद्गलकठा, उर्ध्वगजा, मुद्गला | लागला | स्तोभगा |

| देशांचे नाव | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद | अथर्वण वेद |
|---|---|---|---|---|
| आंध्र देश | बाष्कलाः | आैख्याः | कौथुमाः | चरणविधाः |
| नेपाळ | | वेतालाः, शौनकाः | जैमिनाः | स्तोताराः |
| किंपुरुष (अफगाणिस्थान) | | | | |
| महाराष्ट्र, कर्नाटक | आश्वलायनीयाः, शाकला | बौधेयाः, त्रिगुलाः, देवरूखाः. मानवाः, शामायनीयाः, कायस्ताः पालाशाः (पलशे), मैत्रायणीयाः तैत्तिरीयाः, बौधेयाः, राणावटाः. काण्वाः, माध्यंदिनाः | राणायणीयाः | |
| मरुदेश (मारवाड) | | शाठ्यायनीयाः, पुष्करणीयाः, भैरवाः, पाराशर्याः, वाराहाः, शैवजाः, जयन्नवाराः | | श्रावकाः |
| हिमवत देश (हिमालयाचा आसमंतात भाग) | माडूक्याः | कुथुथराः, धूम्राक्षाः, टोंभिलाः | | |
| सरयू–सरस्वती | | काण्वाः, माध्यंदिनाः | | |
| गोमती तीर | | सारस्वतः | | दानाः |
| मालव देश (माळवा) | | श्रीमाळी, कपोशाः, पांडूवत्साः | | |
| वंग देश (बंगाल) | माडूक्या. | कोसलरुटाः, कुब्जकाः, चांभगाः, (चोभे) वारुणाः (गयावळाः). | | |
| आसुरी (एशिया मायनर) | | | मगब्राह्मणाः | |

होण्याचा सौभाग्य-योग मंत्रशास्त्रद्योत कै. वा. श्री. १०८ रामशास्त्री गोडबोले-वास्तव्य मुंबई-यांच्या कृपेनें लेखकास प्राप्त झाला होता. त्यावेळीं ऋग्वेदादि प्रत्येक वेदात पारंगत असलेल्या ब्राह्मणास पाचारण करण्यात आलें होतें. त्यावेळी मंत्रशास्त्राचा मूळ वेद जो आथर्वण वेद आहे, त्यात पारंगत असलेले व मणि, मंत्र व औषधी यांचा अनुभव असलेले एक दोनच वेदवेत्ते ब्राह्मण पाहण्यात आले. आथर्वणवेद पोथी-वरून म्हणणारे सुद्धा जमेस धरले तर एकंदर *सर्व भारतवर्षात आठच ब्राह्मण दिसून आले.* आथर्वणवेदी ब्राह्मणाकडे यज्ञामध्यें ब्रह्मयाचें कार्य असते व त्याने होता, उद्गाता, अध्वर्यु, यजमान व यजमानपत्नी यांचे संरक्षण करावयाचे व यज्ञकार्यांत उत्पन्न होणाऱ्या इतर प्रत्यूहाचें निरसन करण्याचे कार्यही करावयाचे हे कर्तव्य त्या अथर्ववेदीय ब्राह्मणाकडे असे. *राजगुरु आथर्वण वेदवेत्ता असावा* लागतो व त्या राजगुरूनें राजानें करावयाचीं हव्य कव्य कर्मे, व त्याला नेहमीं उत्पन्न होणाऱ्या संकटांतून त्यास निभावून नेण्याचेही कार्य करावयाचे असे. या वेदाची परंपरा नष्ट झाल्यामुळे वेदाबद्दल आज सर्वत्रैव अनास्था दिसत आहे, व वेद ही एक जुनी भाषा आहे म्हणून वेदाचें संरक्षण करावयाचें इतकीच वेदग्रंथाची महती आज राहिली आहे. *आथर्वण* वेदात जसे इष्ट फलदायी व अनिष्टफलपरिहारक मंत्र आहेत तसे ऋग्वेद व सामवेद या वेदातही आहेत. वेद मंत्रातील व्यवहारोपयोगी मंत्र कोणते व त्यांचा अनुभव कोणास आहे कीं काय, अशाबद्दल लेखकानें पुष्कळ शोध केला, परंतु त्याची त्या बाबतींत कांहीं अशी निराशाच झाली आहे. एकंदरीत अशा प्रकारच्या वेदाभ्यासास चालना मिळाली तर "वेदाभ्यास जड" अशी जी आधुनिक वैदिक वर्गास निंदास्पद व्याजोक्ति म्हणजे उपरोधिक पदवी मिळाली आहे ती निरर्थक ठरेल.

ब्रह्माण्डपुराणात वेदमंत्राबद्दल स्पष्टीकरण केलेलं आहे, तें असे आहे.—

## ६. वेदमंत्रांचे प्रकार

मंत्रा नवविधाः प्रोक्ता ऋग्यजुःसामलक्षणाः।
मूर्तिर्निंदा प्रशंसा च आक्रोशस्तोष एव च।
प्रश्नानुज्ञानमाख्यानं आशास्त्रिविधयोगतः।
प्रशंसा स्तुतिराक्रोशो निंदा च परिदेवना।
अभिशापो विशापश्च प्रश्नः प्रतिवचस्तथा।
आशीर्यज्ञस्तथाऽऽक्षेपाः अर्थाख्यानं च संकथा।
वियोगा ह्यभियोगाश्च कथा संख्या वरश्च वै।
प्रतिषेधोपदेशौ च नमस्कारः स्पृहा तथा।
विलापश्चेति मंत्राणां चतुर्विंशतिरुद्धृता।
मंत्राणां नवविधत्वं चतुर्विंशति भेदा इति।

ब्रह्माण्डपुराण अध्याय ३३-३४

मूर्ति, निंदा, प्रशंसा, आक्रोश, तोष, प्रश्न, अनुज्ञा, आख्यान व आशा असे मंत्राचे नऊ विधि आहेत. तसेच प्रशंसा, स्तुति, आक्रोश, निंदा, परिदेवना, अभिशाप, विशाप, प्रश्न, प्रतिवचन, आशीः, यज्ञ, आक्षेप अर्थाख्यान, संकथा, वियोग, अभियोग, कथा, संख्या, वरप्रदान, प्रतिषेध, उपदेश, नमस्कार, स्पृहा, विलाप असेही मंत्राचे चोवीस भेद आहेत.

याशिवाय श्रुतींचे विधात्री, अभिधात्री व नियोक्त्री असे भाग पाडलेले आहेत.

तत्र च विधात्री श्रुतिर्लिंगाद्यात्मिका
द्वितीया यागादिश्रुतिः
यस्याः श्रवणादेव शब्दस्य संबंधः
प्रतीयते सा विनियोक्त्री

म्हणजे प्रत्यूहपरिहारक ऋचास 'नियोक्त्री ऋचा' असे म्हणतात. वेदकालीन समाजामध्ये ब्राह्मणवर्गीयाचा काळ यजन, याजन, अध्ययन, अध्यापन या कर्मांमध्ये जात असे. त्रैवर्णिकांची नित्य नैमित्तिक कर्मे ममत्वक करणे हेही काम त्याचेकडे असे. त्रैवर्णिकाच्या अध्यापनाचे कार्य त्याचेकडे असल्याने आयुर्वेद धनुर्वेद, गंधर्ववेद, ज्योतिःशास्त्र, अग्निहोत्र इत्यादि विषयातही त्यास पारंगत असावे लागे. यज्ञीय कर्मे आचरीत असताना ज्या अडचणी उत्पन्न होत असत त्याच्या निरसनाचे ज्ञान अगस्त्य क्षत्रियाना धनुर्वेदशिक्षा देत असताना नानाप्रकारचे व्यवहारोपयोगी मंत्र अगर अस्त्रमंत्र व त्याचा विनियोग कसा करावा हे ज्ञान तत्कालीन ऋषिवर्यांनी नमूद करून ठेवलेले असे, व हे ज्ञान गुरुशिष्य परंपरेत टिकून रहात असे. याचप्रमाणे पाठ्यमंत्राचे गर्भितार्थ, उत्तानार्थ व विनियोग (वेदमंत्र मुखोद्‌गत असल्याने) तत्कालीन ब्राह्मणवर्गीयास सुतराम करतलामलकवत् भासत असत.

## ७. वेदमंत्रांचे अनुभव न येण्याची कारणे

कालांतराने ब्राह्मणवर्गीयाची तीव्र बुद्धि आणि ग्राहकशक्ति व पाठशक्ति या क्षीण झाल्या त्रैवर्णिकाची नित्यनैमित्तिक कर्मे घडवून आणण्याकरिता म्हणजे व्रतबंध, विवाह इत्यादि संस्कारात लागणारे मंत्र, संहिता व उपनिषदे इत्यादि विषय पाठ करण्यातच त्याचा काल निघून जाऊ लागला वेदमंत्राचा अर्थ व त्याचा विनियोग करताना व्याकरणशास्त्र न समजल्यामुळे त्याच्या कर्मात व्याकरणशास्त्रदृष्ट्या *विभक्तिप्रत्ययात* चुका होऊ लागल्या ब्राह्मणवर्गांत भिक्षुक व गृहस्थ असे भेद पडले व वैदिक व शास्त्री असेही भेद पडले अशा वेळी श्री सायणाचार्यांनी चारी वेदावर भाष्ये लिहिली व त्यात वेदमंत्राचे विनियोगही लिहिले. कालांतराने त्याच्या प्रयत्नाचा उपयोग करून घेण्याचे कार्यही बंद पडले हे खरे.

## ८. वेद मंत्रांचे विनियोग

प्रथम गृह्यसूक्तात मंत्राचे विनियोग सापडतात. पुढें अग्निपुराण वायुपुराण व ब्रह्मांडपुराण या ग्रंथातही वेदमंत्राचे विनियोग आढळून येतात. याच वेळीं श्रीमहर्षि शौनक ऋषीने ऋग्वेदातील मंत्राचा विनियोग लिहून ठेवलेला आहे. त्याचे नाव 'ऋग्विधान' असे आहे लेखकाला अशीं ऋग्विधानें दोन उपलब्ध झालीं. एक विधान श्रीरंगम् येथें 'वाणी विलास' छापखान्यात छापलेले व दुसरे ऋग्विधान पुणे येथील ग्रंथ-प्रकाशक रा. गोटबोले यानी छापलेल्या ऋग्वेदाच्या संहितेत असलेले. श्रीरंगम् येथील ऋग्विधान वे. शा स. वेंकटरमण शास्त्री व वे शा स रामभट दीक्षित या विद्वानद्वयाना प्रसिद्ध केलेले आहे श्रीरंगम् येथें छापलेल्या व पुणे येथे छापलेल्या ऋक्संहितेच्या पोथींत छापलेल अशा दोन्ही ऋग्विधानाचा साकल्याने विचार केल्यास त्यातून खालीं लिहिलेल्या विषयाचा निर्देश केलेला आहे

स्वर्णस्तेय, द्रव्यसंपादन, सुरूपस्त्रीचें भार्यार्थसंपादन, क्षय, अपस्मार, महारोग, शत्रुपीडा वगैरेचें निवारण, वाक्सिद्धि, ऋणनाश, प्राणाकर्षणाविद्या, परकायाप्रवेश व परकायानिर्गमविद्या, अग्निविद्या, वातरोगपरिहार, महाविषपरिहार, अणिमादि अष्टसिद्धिप्राप्ति, कारागृहवासनिवृत्ति, भूत, प्रेत पिशाचादिकाच्या पीडेचा नाश, भगेंद्रादिरोगपरिहार, वैश्वनरविद्या, कन्या विवाह वगैरे विषय आलेले आहेत अशा मंत्रापैकीं काहा थोड्या मंत्राचा निर्देश पुढील स्तभात केलेला आहे व मूलमंत्र या ग्रंथाच्या उत्तरार्धात दिलेले आहेत.

## ९. ऋग्वेदांतील मंत्र व विनियोग

| अष्टक | वर्ग | ऋचा | ऋचा प्रारंभ | विनियोग-(ऋषि-देवता-छंद) |
|---|---|---|---|---|
| १ | ७ | ७ | जातवेदसे सुनवाम'—वेद. | **दुष्टश्वापद भीति नाश**—छंद—त्रिष्टुप—ऋषि—मारीचपुत्र कश्यप—देवता—जातवेद अग्नि |
| २ | ५ | १४ | नकतो न ककतोऽथो सता न ककतो/— | **सर्प** विंच्वादिप्राणिज विषनाश अनुष्टुप्-अगस्त्य—अप्तृणसूर्य. |
| ८ | ४ | १० | हविष्पातमजरं स्वर्विदि दिविस्पृशा हुत-जुष्टमग्नौ | **वैश्वानर विद्या**—त्रिष्टुप्—परमेष्ठी प्रजापति—परमात्मा |
| ७ | ४ | १७-१८-१९ | सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् | नारायणदर्शन |
| ८ | ७ | १७ | नासदासीन्नोसदासीत्तदानीं नासीत् रजो नो व्योमा परो यत् (नासदीयसूत्र) | योगसिद्धि |
| ८ | ८ | १९ | मुचामि त्वा हविषा (ब्रह्मणस्पतिसूक्त) | **क्षयरोगनाश**, पुत्रप्राप्ति, —कन्याविवाह कोर्टीय कामे—**पांच** अनुष्टुभ—इतर त्रिष्टुप्—इंद्र. अनुष्ठानी ब्राह्मणद्वारा गणपतीस २१ वेळ अभिषेक. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | २ | १ | सुप्रमादिसूक्ते पाच ऋचा = | मार्गशीर्ष महिन्यात १० हजार जप–परकायाप्रवेश |
| ७ | ७ | १ | न निर्वंध सूक्त (आठ ऋचा) | परकायेतून परत आल्यावर ३० हजार जप–विष्णु मंदिरात = भृगुच्यवन-गोगायत्री सूक्त; |
| ७ | ७ | २ | अग्निमीळे भुजा मृगत (१० ऋचा) | प्राणाकर्षण विद्या–रोज शभर वेळा म्हणणे. |
| ५ | ४ | ३० | ॐ त्र्यंबकं यजामहे | अपमृत्युहरण– ३० हजार प्रणव संपुटित वसिष्ठ |
| ८ | ८ | ११ | इस्रपती सूक्त (५ सूक्ताचे) | कुष्ठनाश–माघ महिन्यात बेलवृक्षाखाली रोज शभर जप = शासननाम–इंद्र–अनुष्टुप् |
| ३ | ७ | १४ | हंस शुचिषद् अनियिर्दुरोण सत् (पाच ऋचा) | (i) कुष्ठनाश–विष्णु मंदिरात २० हजार जप व ३० हजार अर्घ्य देणे<br>(ii) सर्व कार्यसिद्धी–रोज १०८ जप. वामदेव दक्षिना–त्रिष्टुभ् |
| २ | ६ | २९ | गणानात्वा श्रवस्तमम् | विघ्ननाश-कार्यसिद्धी–रोज १०८ जप |
| ४ | ४ | १ | ऋतस्य गोपा मत्यधर्माणा ४ ऋचा, | मूत्ररोगनाश–यातील १ ऋचा अश्वत्थवृक्षाशी जप. |

| १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|
| ३ | ७ | २३ | वायो शुक्रो अयामि....दिविष्टिपु | वातरोगनाश–माघांत अश्वत्थवृक्षाखालीं रोज ३० हजार जप. सौभरिकाण्व—आग्नि—सतोबृहती. |
| १ | ७ | ७ | जातवेदसे सुनवाम सोममराति | अणिमादिसिद्धिप्राप्ति–बिल्ववृक्षाखालीं एकलक्ष जप. मरीचपुत्र कश्यप–जातवेद–त्रिष्टुप् |
| ५ | ६ | १७ | ध्रुवासु, त्वासु क्षितिषु क्षियन्तो ॥ (सात ऋचा ७ मंत्र) | कारागृहमुक्ति–२० हजार जप करावा वसिष्ट–वरुण–अनुष्टुप् |
| ७ | ८ | ३ | यदादीध्ये न नृविपाण्येभि....५ ऋचा ॥ | अकालकृत कर्म निवृत्ति–रोज १० वेळ म्हणणे कवष–अक्षर–जगती |
| ८ | ७ | १४ | रात्री सूक्त | भूतप्रेत-व्याघ्र-चोरादि भयनाश–रोज ३ दा व रात्री एकदां म्हणणें–कुशिक–रात्री–गायत्री |
| ४ | ७ | ११ | नृगृणानो–गृणते–नृवचसे रिरीहि ॥ | भगंद्रनाश–विष्णुमंदिरांत पाण्यात उभे राहून ३० हजार जप. |
| ३ | ८ | १९ | वधेन दस्यु....वाजे अस्मान् ॥ | व्याधिनाश व भूमिप्राप्ति–रोज १० वेळ जप. |

वर लिहिलेले ते मत्राचे *आदि शब्द आहेत.* परतु अशा मत्राचा अनुभव घेतलेले असे सत्पुरुष सापडण्याची हल्लींच्या काळात मोठीच उणीव आहे. लेखकानें या बाबतींत बरेच परिश्रम केले. टिकटिकाणीं भिक्षा मागणाऱ्याप्रमाणे दारोदार फिरण्याचे व कटुशब्द ऐकण्याचे प्रसग सोसले. काही सज्जनाना असे म्हटले कीं, "सर्वांचे नावसुद्धा न घेणारे असे तुम्ही ही उठाठेव का करिता? इराण्याच्या हॉटेलात जा, महार-मागाच्या समूहात सहभोजन करा, आमचेकडे का येता? लघुशकेला पाणी न घेणारे तुम्ही भ्रष्ट लोक तुमचे मुखावलोकनही नको." हे शब्द खरे आहेत. परतु त्या मत्रज्ञ सज्जनाना लेखका-बद्दल जेव्हा लेखकाच्या समागमातील मडळींना लेखकाच्या वर्त-नाची खात्री दिली, तेव्हा कोठे मत्राबद्दल बोलण्याची त्याची प्रवृत्ति दिसली

मत्रशक्तीचा प्रभाव वर्णन करीत असता लेखकाला आधुनिक सुधारणानी मूर्तिमत भ्रष्ट झालेल्याशीं बोलण्याचेही प्रसग आले. तेव्हा ते म्हणत कीं, "अहो मत्र आहेत म्हणता तर आम्हाला अनुभव सागू नका, अनुभव घेतलेलीं माणसे दाखवा" अशा पृच्छकाचीं कुतूहलें पुरविणे ह काम सोपें नव्हे लेखक स्वत मत्रशास्त्रज्ञ नाहीं, म्हणून त्याला अशीं कुतूहल पुरविण्यास दुसऱ्याकडे पहावे लागते. अशा मत्रशक्तिसपन्न मनुष्याकडे गेल्यास त्याना म्हणावें, आम्हीं काहा तमाशा माडला नाहीं, किंवा जादूचा खेळ आमचेकडे नाहीं आमचे सहवासात रहा, प्रसग येईल तेव्हा अनुभव दिसेल परतु असे अनुभवी मत्र जर नमूद करिता न आले तर हा लेख लिहिण्याचा उपक्रम केवळ पिष्टपेषणवत्, किंवा केशनिकृतनवत् होईल, म्हणून काही मत्र व मात्रिक मिळाले तर त्याचा यथायोग्य काळीं उपक्रम करण्याचा विचार ठरवून प्रस्तुत ऋग्वेद मत्रातील अनुभवित मत्राचीं उदाहरणे दिलीं आहेत तीं अशीं—

| १ | २ | ३ | ४ | ५ |
|---|---|---|---|---|
| ३ | ७ | २३ | श्रायो शुक्रो अयामि....द्विनिष्टुप् | **वातरोगनाश**–माघांत अश्वत्थवृक्षाखालीं रोज २० हजार जप. सौभरिकाण्व—आग्नि —सतोबृहती. |
| १ | ७ | ७ | जातवेदसे सुनवाम सोममराति | **अणिमादिसिद्धिप्राप्ति**–बिल्ववृक्षाखालीं एकलक्ष जप. मरीचपुत्र कश्यप–जातवेद –त्रिष्टुप् |
| ५ | ६ | १७ | ध्रुवासु, त्वासु क्षितिषु क्षियन्तो ॥ (सात ऋचा ७ मंत्र) | **कारागृहमुक्ति**–२० हजार जप करावा वसिष्ट–वरुण–अनुष्टुप् |
| ७ | ८ | ३ | यदादीध्ये न दविषाण्येभि....५ ऋचा ॥ | **अकालकृत कर्म निवृत्ति**–रोज १० वेळ म्हणणे कवष–अक्षर–जगती |
| ८ | ७ | १४ | रात्री सूक्त | **भूतप्रेत-व्याघ्र-चोरादि भयनाश**–रोज ३ दा व रात्री एकदां म्हणणें–कुशिक–रात्री–गायत्री |
| ४ | ७ | ११ | नृगृणानो–गृणते–नूनृचसे रिरीहि ॥ | **भगेंद्रनाश**–विष्णुमंदिरात पाण्यांत उभें राहून २० हजार जप. |
| ३ | ८ | १९ | वधेन दस्यु....वाजे अस्मान् ॥ | **व्याधिनाश व भूमिप्राप्ति**–रोज १० वेळ जप. |

वर लिहिलेले ते मंत्राचे *आदि शब्द आहेत.* परंतु अशा मंत्राचा अनुभव घेतलेले असे सत्पुरुष सापडण्याची हल्लींच्या काळात मोठीच उणीव आहे. लेखकाने या बाबतीत बरेच परिश्रम केले. ठिकठिकाणीं भिक्षा मागणाऱ्याप्रमाणे दारोदार फिरण्याचे व कटुशब्द ऐकण्याचे प्रसंग सोसले. कांहीं सज्जनांनी असे म्हटले कीं, "सत्येचे नावसुद्धा न घेणारे असे तुम्ही ही उठाठेव का करिता? इराण्याच्या हॉटेलात जा, महार-मांगाच्या समूहात सहभोजन करा, आमचेकडे का येता? लघुशंकेला पाणी न घेणारे तुम्ही भ्रष्ट लोक तुमचे मुखावलोकनही नको" हे शब्द खरे आहेत. परंतु त्या मंत्रज्ञ सज्जनांनी लेखका बद्दल जेव्हा लेखकाच्या समागमातील मंडळींनी लेखकाच्या वर्तनाची खात्री दिली, तेव्हा कोठे मंत्राबद्दल बोलण्याची त्यांची प्रवृत्ति दिसली.

मंत्रशक्तीचा प्रभाव वर्णन करीत असता लेखकाला आधुनिक सुधारणांनी मूर्तिमंत भ्रष्ट झालेल्याशीं बोलण्याचेही प्रसंग आले तेव्हा ते म्हणत कीं, "अहो मंत्र आहेत म्हणता तर आम्हाला अनुभव सांगू नका, अनुभव घेतलेलीं माणसें दाखवा." अशा पृच्छकांचीं कुतूहलें पुरविणें हें काम सोपें नव्हे. लेखक स्वतः मंत्रशास्त्रज्ञ नाहीं, म्हणून त्याला अशीं कुतूहलें पुरविण्यास दुसऱ्याकडे पहावें लागतें. अशा मंत्रशक्तिसंपन्न मनुष्याकडे गेल्यास त्यांनी म्हणावें, आम्हीं कांहीं तमाशा मांडला नाहीं, किंवा जादूचा खेळ आमचेकडे नाहीं आमचे सहवासात रहा, प्रसंग येईल तेव्हा अनुभव दिसेल परंतु असे अनुभवी मंत्र जर नमूद करिता न आले तर हा लेख लिहिण्याचा उपक्रम केवळ पिष्टपेषणवत्, किंवा केशानिकृंतनवत् होईल, म्हणून कांहीं मंत्र व मांत्रिक मिळाले तर त्याचा यथायोग्य काळीं उपक्रम करण्याचा विचार ठरवून *प्रस्तुत ऋग्वेद मंत्रातील अनुभवित मंत्राचीं उदाहरणे दिलीं आहेत* तीं अशीं—

## १०. ऋग्वेदीय कांही मंत्र व कांही अनुभवी सज्जन

'कृणुष्वपाज'—या मंत्राच्या पाच ऋचा—या मंत्राला 'दहरासो' ह्या शेवटल्या अर्धेलीचे संपुटीकरण केले पाहिजे. —'रक्षोघ्नदेवता त्रिष्टुप छंद' १० हजार जप—त्यापूर्वी ३० हजार गायत्रीमंत्र जप करावा. या योगानें ब्रह्मराक्षसादि भूतबाधा नष्ट होते.

अनुभवी गृहस्थ वे. मू. प्रल्हादगुरु, इंदूर. [पारनेरकर महाराज]

**कुपुंभकस्तदब्रवीत् गिरेः प्रवर्तमानकः**
**वृश्चिकस्यारसं विषमरसं वृश्चिक ते विषम्।**

प्रथम मंडळ $\frac{१९१}{१६}$ शान्तिपाठात ह्या मंत्र आहे.

ह्या मंत्राचा १० हजार जप केल्यावर वृश्चिकदष्ट मनुष्याच्या दंशाच्या ठिकाणीं भस्म मंत्रून लावावे.

मुंचामि त्वा हविषा—या मंत्राचा विनियोग क्षय, अपस्मार, याच्या रोगशमनार्थ होतो. (ऋग्वेद ८-८-१९)

कै. वा. त्र्यंबकशास्त्री वैद्य, लोधी मोहल्ला, इंदूर.

**सोमो अप्सु मे अतर्विश्वानि भेषजा**
**आपो याचामि भेषजम्**
**आपः पृणीत भेषजं वरूथं तन्वे३ मम् ज्योक् च सूर्यं दृशे**
**पयस्वानग्न आगहि तं मा सं-सृज-वर्चसा।**

व्याहृतींनी पूरकप्राण म्हणजे प्राणायाम करावा. विशिष्ट स्थळीं कुंभकात विशिष्ट दुःखादि वेदना काढण्यास प्राण साठविणे व गायत्री शिरान ते दुःख, तो विकार, त्या वेदना उच्छ्वासाबरोबर रेचकाने बाहेर पाठविणे. या क्रिया केल्या असता तो विकार, दुःख अगर वेदना नाहीशा होतात' (हें सर्व मनोमय वाणीनें उच्चारीत व ध्यानाने क्रिया करीत मनोचार,

---

१. असेच कांहीं मंत्र पुढे उत्तरार्धांत दिले आहेत.

झाला पाहिजे.) सुजलेल्या भागावर वरील मंत्राने २१ वेळा मार्जन दररोज केलें तर तीन दिवसात गुण येतो. अपस्माररोग बरा होतो.

क्षयरोग :— वे. शा. स. करदीकर गुरु तासगाव, सातारा.

## पर्जन्य पडण्याचा वैदिक मंत्र

**ध्रुवासु त्वासु क्षितिपु क्षियन्तो व्यस्मत् पाशं वरुणो मुमोचत्।**
**अवो वन्वाना अदितेरुपस्थाद् यूयं पातः स्वस्तिभिः सदा नः।**

ऋ. ५।६।१०

नाभिमात्र जळात उभे राहून दहा हजार जप करावा. घृत, दुग्ध व वेताच्या समिधांनी १ हजार हवन करावें.

## पर्जन्य पडण्याकरितां पौराणिक श्लोक :

**मुंच मुंच सलिलं दयानिधे नाथ नास्ति समयो विलंबितः।**
**चातकस्य मृतके कुटुंबके वारि वारि जल किं करिष्यति॥**

या श्लोकाचा १ लक्ष सामुदायिक जप करावा.

वे. शा. स. दत्तात्रय भालचंद्र दीक्षित,
दुर्गाघाट, भटकचेरी, बनारस.

ऋग्वेदोक्त मन्युसूक्त चार ब्राह्मणांनी दरमहा प्रत्येकीं एक हजार जप करावा.

## कोणतेंही कठीण कार्य साधण्यास

१० ब्राह्मणांनीं दररोज प्रत्येकीं १ हजार जप करावा. असे हे १० दिवसाचें अनुष्ठान आहे. जप १ लक्ष होईल. त्यानंतर घृताक्त तिलाचे १० हजार हवन. नंतर मार्जन–तर्पण १ हजार. ब्राह्मणभोजन २४ ब्राह्मणाचें.

वे. शा. स. सामदेव शास्त्री तुळापूरकर
दुर्गाघाट, काशी बनारस.

महानसंकट निवारणार्थ "प्रत्यगिरा" मंत्राचा अनुभव घेतला आहे.

(लेखक)

## ११. यजुर्वेदांतील मंत्र व त्यांचा उपयोग

आता यजुर्वेदातील मंत्राचे विवेचन करू. यजुर्वेदाचे दोन भेद आहेत. एक कृष्ण यजुर्वेद व दुसरा शुक्ल यजुर्वेद. शुक्ल यजुर्वेदातील संहिता मंत्रात्मक आहे व कृष्ण यजुर्वेदात मंत्र व गाथा (गद्यात्मक) युक्त संहिता आहे. नाही मंत्र दोन्हीं वेदात आहेत.

ब्राह्मण ग्रंथातही कृष्णयजुर्वेदातील मंत्र व संहिता असे भाग येतात. तसे शुक्ल यजुर्वेदातील ब्राह्मण ग्रंथात संहितेतील मंत्र येत नाहीत. काण्व व माध्यंदिन शाखेतील संहितेतील मंत्रोच्चारात फरक असतो. 'प'च्या ऐवजीं 'ख'चा उच्चार होतो म्हणजे मंत्राक्षराच्या उच्चारात फरक दिसतो. एकंदरीत याज्ञवल्क्यानीं पुरस्कारिलेला तो शुक्ल यजुर्वेद व वैशंपायनानीं पुरस्कारिलेला तो कृष्ण यजुर्वेद होय. ऋग्वेदातील मंत्राचा विनियोग जसा श्री. शौनक ऋषींना सांगितला तसा यजुर्वेदातील मंत्राचा विनियोग श्री कात्यायन ऋषींनीं यजुर्विधान या ग्रंथात नमूद केला आहे. तसेच राजा *काळनाथ* यानीं *'यजुमंजिरी'* या नावाची टीका लिहिली त्या ग्रंथातही यजुर्वेदीय मंत्राचा विनियोग सांगितला आहे. श्री *मदनमार्तंड* याचा *'कर्मविपाक'* नावाचा ग्रंथ आहे, त्यातही यजुर्वेदीय मंत्राचा विनियोग आहे. परंतु या कर्मविपाक ग्रंथात कुष्ठ, क्षय, अपस्मार व शीर्षरोग या रोगनिवारणाकरिता शान्ति दिलेल्या आहेत त्या शान्ति करणे म्हणजे हल्लींच्या काळात अशक्यप्रायच गोष्ट आहे.

श्री गायत्रीमंत्र हा सर्व मंत्राचा राजा आहे. हा मंत्र चारी वेदात वर्णन केलेला आहे.

यजुर्वेदातील मोठा महत्त्वाचा मंत्रसमुच्चयाचा भाग म्हणजे 'रुद्र' होय. महामांत्रिक श्री *भास्करराय* यानीं रुद्राच्या अनुवाकाचे विनियोग रुद्रभाष्य ग्रंथात दिलेले आहेत. रुद्रभाष्याचा मांत्रिक दृष्टीने हा स्वतंत्र ग्रंथच लिहिलेला असल्याने, मंत्रशास्त्रदृष्ट्या रुद्रमंत्राचा विचार करणाऱ्याला

टळतो. धोत्र्याच्या एक लक्ष आम्ययुक्त फुलांनीं होम केल्यास त्र्यम्बकेश्वराचे दर्शन होतें.

७. 'विष्णो रराट्‌मसि विष्णो पृष्टमसि'—या मन्त्राचा दहा हजार जप केला तर सर्व बाधा नाश पावतात.

८. 'अग्नो स्वाहा'—या मन्त्राचा १ हजार जप करून तिल, यव व अपामार्ग यांनी होम व एक हजार जप केला व गोरोचनाचा तिलक केला तर सर्व वश्यता होते.

९. 'मधु वाता ऋतायते'—या मन्त्राने तिलाज्यांनी होम केला तर सर्व वश्यता प्राप्त होते.

१०. 'स्वस्ति न इंद्रो वृहस्पति'—या मन्त्राच्या जपानें सर्व व्याधी नाहींशा होतात.

११. 'ॐ समिन ३ सङ्कल्पेयाः३ सप्रियो रोचिष्णौ'—या मन्त्राच्या जपानें मूळव्याध बरी होते.

१२. 'स्रुवेण देवस्य'—या मन्त्राचा अपामार्ग तडुलांनी होम केला तर दुसऱ्यानें केलेला अभिचार निष्फळ होतो.

१३. 'रुद्र पातु'—या ऋचेनें पळसाच्या समिधांनी होम केल्यास द्रव्य प्राप्त होतें

१४. 'अन्नपतेऽन्नस्य नो देहि'—या मन्त्राने तिलाज्यानें सहस्र होम केला तर अन्न प्राप्त होतें

१५. 'हसक शुचिषत् वसुरंतरिक्ष'—जलात उभें राहून जप केल्यास सर्व पापांचा नाश होतो.

१६. 'नम स्वाहा'—याचा तीन लक्ष वेळा जप केल्यास बंधनातून मुक्त होतो.

१७. 'इह गाव प्रजायध्वम्'—या मन्त्राचा एक सहस्र जप केल्यास बुद्धिवर्द्धन होतें.

१८. 'मुचन्तु मा शपथ्यात्'–या मंत्राच्या सहस्र जपानें अपमृत्यु नाहींसा होतो.

१९. 'काण्डात् काण्डात् प्ररोहन्ति'–या दहा हजार दूर्वाखण्डाचा होम केल्यास महामारी नष्ट होते

२०. 'मधुमान्नो वनस्पति'–औदुंबराच्या समिधांनी सहस्र होम केल्यास धन, सौभाग्य व व्यवहार यात जय मिळतो.

२१. 'अपागर्भ व्यधदात् पुरूवा'–या ऋचेनें यव व दुग्ध यानी सहस्र आहुतींचा होम करावा, पाऊस पडतो.

२२. 'अप पिबेति'–दधि–मधु–घृतानीं सहस्र होम केल्यास महाव्याधि नष्ट होते.

२३. 'नमस्ते रुद्र मन्यव'–या ऋचेच्या एक लक्ष जपानें सर्व उपद्रवशान्ति होते

२४. 'अध्यवोचदधिवक्ता प्रथमो'–व्याधिपीडिताचें रक्षण होते. मोहऱ्या घेऊन एक हजार जप करून घरात फेरल्यास ब्रह्मराक्षसादि भूतें पळून जातात

२५ 'प्रमुञ्चधन्वनस्त्वमुभयोरा'–ह्या सहा मंत्रानीं आयुध मंत्रण करावें, रिपूचा नाश होतो.

२६ 'समित स्वमकल्प यथा सप्रियो रोचिष्णौ सुमनस्यमान्'–(अष्टक ४ यजुर्वेद) रक्ती मूळव्याध बरी होते ११ वेळ पाणी मंत्रून तें पिण्यास व शोचास घ्यावें, ३ दिवसात मूळव्याध बरी होते

२७ 'केतुं कृण्वन्'–या मंत्राचा सहस्र जप केल्यास संग्रामात जय प्राप्त होतो

२८. 'यमेन दत्त'–कोटी होम केल्यास संग्रामात विजयप्रद रथ प्राप्त होतो.

२९. 'इम जीवेभ्य'–या मंत्रानें दगड अथवा लोखंडाचे तुकडे मंत्रून टाकले तर सर्व चोरभय नाहींसें होतें

३०. 'गणाना त्वा गणपतिं'—या मत्रानें चतुष्पथावर होम केला तर सर्व भय नाहींसें होते.

३१. 'आद्यतमन्त कनय पुराणा'—'कालाग्निरुद्रऋषि, रुद्रोदेवता अनुष्टुप् छद.'—या मत्राचा एक हजार जप केल्यास ज्वरनाश होतो

## यजुर्वेद मंत्रांचे अनुभवी सज्जन

या व्यतिरिक्त काहीं अनुभवाचे मत्र लिहिण्यात येत आहेत—'प्रमदिने पितुमत्, कुत्सऋषि त्रिष्टुप् छद, इन्द्रोदेवता, गर्भेनुसनिर्वेपाम्'—गर्भमुक्त होण्याचा विनियोग आहे.

वे. शा. स. गणेश लक्ष्मण शाने गुरु, नाशिक.

'नमोस्तु रुद्रेभ्यो'—या मत्राचें अनुष्ठान केल्यानर पिशाच्चबाधा नष्ट होते

'त्र्यम्बक यजामहे'—या मत्राचे अनुष्ठान ओसाड गृहात रात्री १२ वाजता करणे अपमृत्यूचे निवारण होतें

'या व्याघ्रनिषूचिके'—या मत्राच्या जपानें व्याघ्रभय, वा विषारी जनावराचें भय नाहींसे होतें

'या ते रुद्र शिवातनू'—आगतुक उपद्रव नाहींसे होतात.

'ओषधयः समवदन्ते'—सर्व रोगनिवारणार्थ दहा हजार जप करावा. या मत्रानें पाणी मत्रावें कॉलरा, महामारी, प्लेग 'या ते रुद्र शिवातनू' या मत्रानें पाणी मत्रावें म्हणजे वरील रोग बरे होतील

'देवाना भद्रसुमति नमोरुद्रेभ्यो पृथिव्या' या मत्रानें २१ वेळा जप करावा. स्त्री असल्यास कुंकु, पुरुषास भस्म मत्रून वरून खालीं उतरून पाण्यात टाकावें

वे. शा. स. महादेवशास्त्री जोशी, जांभूळपाडा, भोर स्टेट.

परमृत्यो अनुपरेहि पथा यस्ते स्व इतरो देवयानात्
चक्षुष्मते शृण्वते ते ब्रवीमि मान प्रजारिरिषो मोत वीरान्।

ऋषि यमपुत्रस्य सकुसुम देवता मृत्यु छंद जगती
अग्निविद्या, अग्नि उत्पन्न होतो
कुसुभकस्तदब्रवीत् गिरे प्रवर्तमानक ।
वृश्चिकस्याऽ रसविष अरस वृश्चिक ते विषम् ॥
अनुष्टुपछंद, अगस्त्यऋषि, अप्तृणमूर्योदेवता
विंचू आदि विषयुक्त प्राण्याच्या दशापासून मुक्ति
कै. व. वे शा. स श्रीधरशास्त्री वारे, नाशिक.
गायत्रीमंत्राचा १०८ जप २५ वर्षे केला – किरकोळ बाबी बऱ्या होतात
प्रो. रामचंद्र दामोदर करमरकर, बुधवार पेठ, पुणें.

## सामवेदी मंत्र व वर्णन

४५. सामवेद – चार वेदांपैकीं सामवेदीयाचे कार्य 'प्रशसने'चें म्हणजे प्रशसा अथवा स्तुति करण्याचें आहे श्रीशुक्राचार्य म्हणतात "उद्गाथ यस्य शाखादेर्यज्ञे तत्सामसज्ञक । औद्गात्र सामभिश्चैव" यज्ञात उद्गात्याचें कार्य सामवेदीयांनी करावें असें ठरलें आहे सामवेद हा गायन वेद आहे अर्थात् गायनविद्या म्हणजे गंधर्व वेद, हा सामवेदाचा उपवेद आहे गायनविद्येचे प्रथमाचार्य श्रीनारद मुनी हे होत त्याचा "नारद-शिक्षा" या नावाचा गायनशास्त्रावरील आद्य ग्रंथ होय गोपालकृष्णानी श्रीभगवद्गीतेत आपल्या विभूतीचें वर्णन करिताना चतुर्वेदांपैकीं, 'वेदाना सामवेदोस्मि' "सामवेद ही वेदांपैकीं माझी मुख्य विभूति आहे" असें सागितलें आहे यजुर्वेदात असलेल्या ऋचाचा पुनरुद्धार सामवेदातील ऋचात झालेला आहे व सामवेदातील ऋचा ऋग्वेद व अथर्ववेदातही दिसून येतात यावरून वेद हे एकच होत निरनिराळ्या कार्याकरिता त्या मूळ वेदाचे निरनिराळे विभाग श्री ब्रह्मदेवाच्या मुखातून निघाले ऋग्वेद प्रथम झाला व अथर्वणवेद शेवटीं झाला अशा प्रकारचें आधुनिक शोधकाचे मत आहे परतु खरी गोष्ट अशी असावी कीं, एका कार्याकरिता

जी एक ऋचा उपयोगात आणली तिचा पुन्हा दुसऱ्या कार्याकरिताही उपयोग केला आहे. दुसरें कार्य मागून उपस्थित झाले म्हणून ती ऋचा मागून झाली असें म्हणता येत नाही. त्या ऋचेच्या दुसऱ्या वेळी निराळ्या कार्याकरिता विनियोग सांगितला म्हणून ती ऋचा अगर ऋचाचा समुदाय नंतर अस्तित्वात आला हें म्हणणे योग्य दिसत नाही. सामवेदात एकंदर ऋचा १४७८ आहेत. सामवेद संहितेचे 'पूर्वार्चिका ऋचा' व 'उत्तरार्चिका ऋचा' असे दोन भेद आहेत. सामगायनाच्या प्रक्रियेत 'प्रकृति गान' व 'विकृति गान' असे दोन भेद आहेत. याशिवाय वैष्णवी संहिता, स्कान्दी संहिता व पैत्री संहिता असेही तीन भेद आहेत.

सामवेदातील सामगायनाच्या ऋचा कशा म्हणाव्या याचें स्पष्टीकरणही दिलेलें आहे. जर्मन पंडित डॉ. इरविन फेलर यांनी सन १९१२ साली सामवेदातील लेखात "आज्यदोह" या ऋचेची स्वरावर्त लिहिलेली आहे. त्यांनी कलकत्ता संस्कृत कॉलेजचे प्रोफेसर धर्मव्रत चट्टोपाध्याय यांच्या सल्ल्याने ती स्वरावर्त तयार केलेली आहे. परंतु त्या स्वरावर्ती प्रमाणे ती ऋचा गाइल्यास व ते गाणें ऐकल्यावर ज्याला गायनाचें थोडें तरी ज्ञान असेल त्याला समजून येईल कीं, वरील स्वरावर्त चुकीची आहे. पुणें येथें वे. मू. लक्ष्मणशास्त्री द्रवीड (सामवेदी) सामवेदी शाळेचे संस्थापक, खुन्या मुरलीधर मंदिराचे समोर सदाशिवपेठ पुणे, यांनी वरील "आज्यदोह" या ऋचेची स्वरावर्त तयार करून ज्या आपल्या विद्यार्थ्यांस शिकविली, त्या विद्यार्थ्यांनी गाइलेले साम लेखकाने ऐकले. व जर्मन प्रोफेसरांनी तयार केलेल्या स्वरावर्ताप्रमाणे गाइलेलेही ऐकिलें. त्यावरून लेखकाचें मत असे झाले कीं, वे. मू. द्रवीड शास्त्री यांनी बसविलेली स्वरावर्त बरोबर असावी. श्री १०८ नारायण महाराज केडगावकर यांनी मागें जो मोठा यज्ञ केला त्यावेळीं विष्णुकांची येथील सामवेदी ब्राह्मण आलेले होते त्यांचेंही मत जर्मन प्रोफेसराची स्वरावर्त चुकीची आहे असेंच पडले. सामवेदाचे मंत्र व त्याची स्वरावर्त लेखकास वे. मू. लक्ष्मणशास्त्री द्रवीड,

पुणें, याचेकडून मिळाली. या त्याच्या मदतीबद्दल लेखक फार आभारी आहे. असो. आता पहिल्यानें सामवेदातील व्यवहारोपयोगी ऋचाचें वर्णन देऊन मग गायनाचे सामाचाही निर्देश करावयाचा आहे.

१. 'यत इन्द्र भजामहे'—ह्या ऋचेचा जप केल्यास हिंसादोष नाहीसे होतात.

२. 'अद्या नो देव सवित्'—दु स्वप्ननाश होतो.

३. 'अबोध्यग्नि'—घृतानें होम करून शेष घृतानें अभ्युक्षण केलें तर मेखलाबध होतो. म्हणजे गर्भपतन होत असेल तर गर्भ टिकतो.

४. 'सर्पसाम'—हें साम म्हटल्यानें सर्पभीति नष्ट होते.

५. 'मघवा बाधते'—सहस्र होम करून शतावरी वनस्पतीचा मणी बांधावा, शत्रुभीति नष्ट होते.

६. 'समभ्यायन्ति'—मंत्राच्या जपानें तृषा नाहींशी होते.

७. 'पथिदेवव्रतम्'—मार्गांतील भयाचा नाश होतो.

८. 'भगोन चित्र'—या मंत्राच्या जपानें नेत्रांत अंजन केलें तर नेत्ररोग नष्ट होतात.

९. 'रथंतर वामदेव्य'—वचा (वेखड) चूर्ण तुपात घाळून मुलास खाण्यास देणे. बुद्धिवर्धन होते.

१०. 'गव्येपुणेति'—या मंत्राचें गाईच्या गोठ्यांत अनुष्ठान केलें तर गाई सतत राहतील.

११. वान आ यातु मेवज—यव घृताक्त करून होम केल्यास ऐंद्रजाल नाहींसें होतें.

## आथर्वणवेद व त्यांतील मंत्र

आथर्वणवेद.

**त्रयो लोकास्त्रयो देवास्त्रयो वेदास्त्रयोऽग्नयः ।**
**मात्रार्धे विलयं यान्ति वेदश्चाथर्वणः स्मृतः ॥**

तीन लोक, तीन देव, तीन वेद व तीन अग्नि हे सर्व अर्धमात्रेत लय पावतात व ही अर्ध मात्राच अथर्वणवेद होय. इतर वेदाचा लोप होईल, परंतु चवथ्या अर्धमात्रारूपी वेदाचा लोप होणार नाही (कौशिक परिशिष्ट). राजा व प्रजा यांची दैवी व मानवी आपत्ति दूर करण्याचें कार्य अथर्ववेदीयाकडे असते, व राजा व प्रजा यांची आपत्ति दूर झाल्याखेरीज दोघाच्या हातून धर्मरक्षण व तपादि कार्य होऊ शकत नाहीं. सृष्टीची उत्पत्ति करण्यापूर्वी ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्याकरिता साधनीभूत म्हणून श्री महाविष्णूनी हंसावतार धारण करून 'तप तप' असा आदेश केला. असें तप करीत असताना त्या तप प्रभावापासून भृगुऋषी उत्पन्न झाले व भृगुऋषीपासून आंगिरस ऋषि उत्पन्न झाले. ही उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकीं होय. या भृगुआंगिरस ऋषींनी अथर्ववेदवाणी श्रवण केली व त्यानी आपल्या वाणींतून अथर्ववेदाचा बाहेर उच्चार केला. म्हणून आथर्ववेदाला अथर्वांगिरस वेद असे म्हणतात. त्या आंगिरस ऋषींचे वीस पुत्र होते. त्या प्रत्येकानें एक एक काण्ड म्हटले, म्हणून आथर्ववेदाचीं वीस कांडे झालीं.

> एतद्वै भूयिष्ठं ब्रह्म यद् भृग्वांगिरसः ।
> येऽङ्गिरसः स रसः ।
> येऽथर्वाक् तद्भेषजम् । यद् भेषजं तदमृतम् ।
> यदमृतं तद्ब्रह्म (गो ब्रा. ३-४)
> एवं सारभूतब्रह्मत्वात् ब्रह्मकर्तव्यप्रतिपादनात् ।
> अयं ब्रह्मवेदः इत्यप्याख्यायते ।

आर्यावर्त हे वेदाचें मूलस्थान व आर्यावर्तांतील दशविध ब्राह्मण हे वेदाचे आश्रयस्थान होत. मोगलाईपासून ब्राह्मण ब्रह्मकर्मापासून च्युत झाले मधला काल म्हणजे मराठाई व पेशवाई या काळात कोठे डोकें वर निघतें तोच त्याचाही अंत झाला व आंग्लाई सुरू झाली. इंग्रजी शिक्षणाबरोबर ब्राह्मणवर्गीयात, वेदाभ्यासाची उपेक्षा झाली. आज तर

मामगवशीर्यांना जीवनरक्षणाचीच चिंता पडल्यामुळें वेदाभ्यासाकडे सर्वस्वी दुर्लक्ष होऊन ते परकीयाच्या उपहासास पात्र होत आहेत. आर्यावर्तांतील ब्राह्मण वेदाभ्यासविमुख होत आहेत, तर शार्मण्य (जर्मन) देशीय पंडित वेदाभ्यासमग्न होत आहेत. चार वेदापैकीं सामवेद व आथर्वणवेद हे लुप्तप्राय झाले आहेत शके १८५८ साली श्रीनारायण महाराज केडगावकर यांनी जो महायाग समारंभ केला त्या वेळीं सर्व आर्यावर्तांतील आथर्वणवेदी ब्राह्मणांस आमंत्रणें दिलीं असता केवळ आठच ब्राह्मण उपस्थित झाले. त्या वेळी शार्मण्य देशीय राजप्रतिनिधी (German Ambassador) यानीं या आथर्वणवेदाच्या रक्षणाबद्दल श्रीनारायण महाराज यास विद्युत्संदेश पाठविला होता, असें ऐकण्यात आलें. एकदरींत शार्मण्य देशीयाची या आथर्वण वेदाभ्यासाबद्दल किती उत्सुकता व आथर्वणवेद रक्षणाबद्दल किती तत्परता आहे हे दिसून येतें.

आथर्वणवेदी ब्राह्मण यज्ञसंरक्षण व यजमान व यजमान-पत्नी यांचें संरक्षण करीत असतो, असा मागें उल्लेख आलेला आहे तथापि इतकेंच नव्हे तर राजाचें राज्य, सैन्य व प्रजा यांचेंही संरक्षण त्यास करिता येतें तसेंच समाजावर एकदम धाड घालणारे व कुटुंबेंचीं कुटुंबें नाहींशीं करणारे, विषूचिका (cholera) सन्निपात, यक्ष्मा, वातमार, अशा रोगांचेही निराकरण त्यास–आथर्वण वेदांतील मणिमंत्र व औषधि याच्या सामर्थ्यानें करिता येतें.

आजलाईच्या काळांमध्यें सनातनधर्मीय राजे रजवाडे नामशेषच झालेले आहेत ते केवळ नामधारी राजे आहेत. त्यास वेदाचें अर्थात आथर्वण वेदाचें महत्त्व समजत नाहीं. नानाप्रकारच्या अडचणींतून पार पडण्यास आथर्वणवेदवेत्ता ब्राह्मण उपयोगी पडेल ही भावनाच नाहींशी झालेली आहे त्यामुळें सर्व हिंदी मराठी ब्राह्मण संस्थानांतून या वेदाची जोपासना नष्ट झाली आहे. लेखकानें कै. वा. श्रीनारायण महाराज केडगावकर याम साम व आथर्वणवेदशाळा स्थापन करण्याबद्दल विनंती केली होती, तिचा उपयोग झाला नाहीं! आज चाळीस वर्षांत आपल्या

महाराष्ट्रातील बहुतेक कुटुंबात चाललेल्या वेदशाळा बंद झाल्या व कुटुंबातील अध्वर्यु वेदवेत्ते नष्ट होऊन त्यांच्या मुलाबाळांनी आंग्ल शिक्षणाची कास धरून कोणी रेल्वे, कोणी रेल्वे मेल सर्विस, अशा ठिकाणीं नोकऱ्या पत्करल्या आहेत व ते कसाबसा तरी आपला उदर-निर्वाह करीत आहेत जे ब्राह्मणवर्गातील इनामदार जाहागीरदार आहेत त्यांनी तरी वेदाभ्यास करावा, तर त्यांचीं व्यसनें इतकीं वाढलीं व राहणी इतकी बदलली कीं, ते ब्राह्मण तरी आहेत किंवा काय याचीच शंका येऊ लागली आहे काय करावें, कसें जगावें, नवनीति प्रचाराचा ओघ कसा थांबवावा अशी ज्यांना चिंता लागली आहे, अशांनी या लेखाकडे दृष्टिक्षेप करून या आथर्वण वेदाचे अध्ययन सुरू केल्यास उत्तम मार्ग त्यास मिळेल, अशी लेखकाची दृढ समजूत आहे.

शुक्राचार्य म्हणतात—

> **अथर्वांगिरसो नाम सूपास्योपासनात्मकः।**
> **इति वेदचतुष्कं तु ह्युद्दिष्टं च समासतः।**
> **विविधोपास्यमंत्राणां प्रयोगस्तु विभेदतः।**
> **कथिता सोपसंहारास्तद्धर्मनियमैश्चयत्।**
> **अथर्वणा चोपवेदस्तंत्ररूपः स एव हि।**

सर्व तऱ्हेच्या मंत्राचा उपासनामार्ग आथर्ववेदातच आहे ह्या वेदात सर्व तऱ्हेचे मंत्र व त्याचे प्रयोग परिपूर्ण रीतीनें सांगितलेले आहेत. तंत्र ग्रंथ या आथर्वणवेदाचे उपवेद आहेत वस्तुतः आगमादि तंत्रग्रंथ हा पांचवा वेद होय.

श्रीपतंजलि भाष्यकारानीं वेदचतुष्टयाचा उल्लेख करिताना *'ऋग्यजु-साम'* असा उल्लेख न करिता *'अथर्वयजुर्ऋक्साम'* असा केला आहे "त्रेता साध्यानुश्रविके कर्मण्यथर्ववेदस्याभिचारादि प्रधानस्यानुपयोगित्वेन विहारनिर्माणादि तदुपकरणसंपादनाङ्गभूतरक्ष पिशाचादिनिरासंसाधनी भूताना मंत्रविशेषाणां कर्मविशेषाणां च तत्र सद्भावेन प्रथम तस्योप योगात् प्रथममुपस्थिति ॥"

यज्ञयागादि कर्मांत भूतपिशाचादिकांपासून रक्षण करण्याचें कर्म आणि त्या कर्माच्या मंत्राचा विस्तृत विचार आथर्ववेदामध्यें आहे. तसेंच नाना प्रकारच्या रोगाच्या निवारणाकरिता औषधि व मणि विशेष याचाही उल्लेख याच वेदात असल्यानें व्यावहारिकदृष्ट्याही तो फारच उपयोगी होईल. म्हणून 'शन्नो देवीरभिष्टये' या आथर्ववेदीय मंत्राचा प्रथम निर्देश केला आहे.

न तिथिर्न च नक्षत्रं न ग्रहो न च चंद्रमा ।
आथर्वमंत्रसंप्राप्त्या सर्वसिद्धिर्भविष्यति ॥
यस्तत्रार्थवर्णान् मंत्रान् जपेत् श्रद्धासमन्वितः ।
तेषां अर्थोद्भवं कृत्स्नं फलं प्राप्नोति सध्रुवम् ॥
(स्कंदपुराण, कमलाल्या खंड)

आथर्ववेद मंत्राचें अनुष्ठान करावयाचें असल्यास नक्षत्र, चंद्र, तिथि इत्यादि पाहण्याची जरूर नाहीं. मंत्राच्या वर्णांचा सार्थ विचार करून जो मंत्राचा जप करील त्याला इष्ट फलप्राप्ति निश्चयानें होईल असें सांगितलें आहे. तथापि चारी वेदांच्या मंत्राचे अनुष्ठान करण्यापूर्वी कोणकोणते संस्कार केले पाहिजेत याचा उहापोह 'संस्कार' या शीर्षकाखालीं पुढें केलेला आहे.

## आथर्वण वेदाचे उपवेद

आथर्वणवेदाचे उपवेद पाच आहेत ते असे – प्रजापति पूर्वेकडे पहात असता सर्पवेद उत्पन्न झाला, दक्षिणेकडे पहात असता पिशाचवेद, पश्चिमेकडे पहात असता असुरवेद, उत्तरेकडे पहात असता 'इतिहासवेद व उर्ध्वा दिशेकडे पहात असता उर्ध्वाम्नाय,' म्हणजे आगम व पुराणवेद. असे पाच उपवेद उत्पन्न झाले (गो ब्र १–१०)

ऐहिक व आमुष्मिक चतुर्विध पुरुषार्थ याच्या ज्ञानाला कारणीभूत झालेल्या या आथर्ववेदाचे दहा भेद आहेत, ते असे –स्तोदा, पैप्पलादा, मौदा, शौनकीया, जाजला जलदा, ब्रह्मवदा, वेददर्शना, चारणा, वैद्या, त्यापैकीं शौनकादि चार शाखामध्यें अनुवाक्, सूक्त व ऋचा याचा

विनियोग गोपथ ब्राह्मणाप्रमाणें पाच प्रकारच्या सूक्तानीं सागितला आहे ते पाच प्रकार असे — *कौशिक, वैतानस, नक्षत्र, आगिरसकल्प* व *शातिकल्प*. असे हे पाच भेद होत

**कौशिकसूत्र** — यात पुढें दिलेले विषय येतात

गार्ग्योक्त लोममणि, शत्रुहस्तित्रासनानि, इषुनिवारणानि, सर्वशस्त्रनिवारणानि, मोहनकर्माणि, स्वसेना रक्षणानि, वेश्यसग्रामविधि, नवे रथे घटिके सस्कार, कृषिकर्माणि, समुद्रकर्माणि, कृषिकर्मबीजवापन, ज्वरातिसारे अतिमात्रे अगनाडीप्रवाहे च भैषज्य, पिशाचभैषज्य, पिशाचोच्चाटनकाम जलोदरभैषज्य, अतिकासे शीर्षार्तिशिरोवेदनाया भैषज्य, वातगुल्मे भैषज्य, धनुर्वाते अगकम्पने भैषज्य, श्वेतकुष्ठभैषज्य, ज्वरभैषज्य, राजयक्ष्मादि भैषज्य, कर्ण व्याधिविसर्पणे भैषज्य, ब्रह्मग्रहे भैषज्य, तृषाक्रातभैषज्य, उदरगडुल भैषज्य, गडमालाभैषज्य, केशवृद्धीकरणे केशवृद्धिकरणे च भैषज्य, वृष्टिनिवारण कर्म, अभिचारदोषनिवारण कर्म, नदीभये नदीदूरगमनकर्म, वृष्टिकर्म, पुरुषबधने मोचनशाति, वाचा बधनस्य मोचने शान्ति, नष्टे द्रव्ये लाभकर्म, मेधाजनन

**नक्षत्रकल्प** — नक्षत्रपूजनविधि, रक्षाबधन, महाशान्तिनामनानिर्णय, अमृतामहाशान्तिनिर्णय, मणिबधनदक्षिणादि, हस्ति अश्वादीना इद्रमहोत्सव, *कार्तिक्या रम सपाप्य अभिमन्त्र्य* राजान *प्राशयेत्, ब्रह्मयाग*, स्कन्दयाग, अस्त्रविद्या, धनुर्विद्यामत्रलक्षण, आसुरीकल्प, भूमिरूपलक्षण,[1] अथर्वहृदय, सर्वकामविना उपाया

**वेतानसकल्प** — दर्शपूर्णमासादिषु अयनान्तेषु त्रयीविहित कर्मसुब्रह्मा, ब्रह्मणाच्छसी, आग्नीध्र, होता, चतुर्णा ऋत्विजा कर्म, दर्शपूर्णमासा अग्न्याधान, अग्निहोत्रम्, सोमयाग, वाजपेय आप्तोर्याम, अग्निचयन, सौत्रामणि, *गवामयन, राजसूययज्ञ, अश्वमेध, सत्रिसत्राणि, सावत्सरिकायणानि*

१ हे वेदव्यास पंडित सातवळेकर यांनीं प्रसिद्धिलेल्या आथर्वणवेदाच्या पाच भागात प्रत्येकीं ५०० पृष्ठ वरील्यैकीं बरेच विषय स्पष्ट केलेले आहेत. [गो ब्रा भा]

**आगिरसकल्प.** – अनुष्ठानक्रम, मत्रसिद्धिदेश. मालामत्रलक्षण, यत्रलेखनद्रव्याणि, यत्रलेखनी, मत्रान्ते पल्लवसपुटाश्च, शत्रुनाममत्रेषु प्रयनविधि, दिशासननिर्णय, मालारज्जुनिर्णय लक्ष्मीसूक्तविधान, प्रणवमत्र, अग्निमत्र भद्रकालीमत्र, धूमावतिमत्र, महाप्रत्यगिरामत्र, त्रिपुरभैरवीमत्र, भुवनेश्वरीमत्र, सोममत्र, नृसिंह – उपासनाखड, सिद्धोदनविधि, यास्यदेवीरीति देवीमूक्तविधान, गणपतिमत्र, लक्ष्मीमत्र, काममत्र

**शान्तिकल्प** : महाशान्तिसभारकथन, व्रतनियम, कर्मक्रम विनायकशान्ति, आहुतिमत्र, नवग्रहआवाहनमत्र, ग्रहयाग, शान्तिगण, कृत्यादूषण, चातन, मातृनामा, वास्तोस्पत्यादिगणहोम

आथर्ववेदातील मत्र व त्याचे विनियोग –

आमावास्या, पूर्णिमा, पुष्य नक्षत्र, असे तीन काळ सर्व कर्मास प्रशस्त आहेत.

अद्‌भुत कर्म करण्यास सर्व काळ प्रशस्त आहे अभिचार कर्माबद्दल माहिती मूळ ग्रथात पहावी

**मंत्रमुचारयन्नैव मंत्रार्थत्वेन संस्मरेत्।**
**शेषिणं तन्मना भूत्वा स्यादेतदनुमंत्रणम्।**
**एतदेवाभिमंत्रस्य लक्षणं चेक्षणादिकम्।**

अनुमत्रण म्हणजे – शेषिणी मत्रार्थत्वेन अनुसधानपुरसर मत्रजप अभिमत्रणस्य ईक्षणविशेष ।

## आथर्वण वेद मंत्र व त्यांचे विनियोग

**जन्मान्तरकृत–पापं व्याधिरूपेण जायते।**
**तच्छान्तिरौषधैदानेर्जपहोमार्चनादिभि.।**

या वचनावरून असे दिसते की, व्याधि नानाप्रकारच्या असतात आहार, देशान्तर, जलान्तर, इत्यादिकानी झालेल्या व्याधींचा उपशम वैद्यशास्त्रोक्त चिकित्सेनें होतो पूर्वजन्मकृत पापानें उत्पन्न झालेल्या व्याधींची निवृत्ति आथर्वण वेदातील होमहवन केल्यानें होईल

| सूक्त | ऋषि | देवता | विनियोग |
|---|---|---|---|
| १. विद्माशरस्य पितर | अथर्वा | मन्त्रोक्त | ज्वर, अतिसार, अतिमूत्र, नाडीव्रण, संग्रामजय, आज्य सक्तूंनी होम १००० आहुति, धनु व शर यांचें अभिमंत्रण, ज्वरादि अतिसार, अतिमूत्र, निवारणास मुंज नावाच्या तृणाची दोरी करून बांधावी, क्षेत्रमृत्तिका, व वल्मिक मृत्तिका अंगाला लावावी. |
| २. विपित ते वस्तिबिल | ,, | ,, | मूत्ररोगांत वस्तिद्वार मूत्र निरुद्ध होतें. तें या सूक्तानें मुक्त होतें. विधि वरील ऋचेप्रमाणें (धनुराकारो मूत्राशये वस्तिं रुच्यते). |
| ३. अम्बयो यन्त्यध्वभिर्जामयो अध्वरीयताम् | सिंधुद्वीप. | आप | गाईम्हशींना रोग झाला तर सलवणजल या मंत्रानें अभिमंत्रण करून पाजावें. सर्व रोग शमनाकरितां आज्य, पलाश, व औदुंबराच्या समिधांनीं १००० हवन केलें तर कार्य होतें. |
| ४. अप्स्वन्तरमृतमप्सु भेषज | सिंधुद्वीप | आप | मूर्छित मनुष्यावर या ऋचेनें १००० अभिमंत्रित जलसिंचन केलें तर तो मनुष्य उत्क्रांत असला तरी जागा होतो. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. अस्मिन् वसुवसनो | ” | ” | सर्व सपत्नकर्म त्रयोदशीला कृष्णवर्णाचे दोन मणी वस्त्रात बांधून दधिमधु यात बुडवावे; चार दिवसानंतर हातास बांधावे; दधिमधु यानी रोज १०८ वेळा वरील मंत्रानें मंत्रण करावें, व तें दधिमधु प्राशन करावें. |
| ६. अप देवानामसुरो निराजति | अथर्वा | असुरोवरुण | दर्भपिंजूलियुक्त घटजलानें जलोदर रोगनाशार्थ वरून खालीं अभिषेक करावा. |
| ७. अमूर्या यान्ति योषितो | ” | ” | क्षीरजवहननिवृत्ति एक हजार जप. शस्त्रघातादि रुधिर प्रवाह निवृत्ति. या कार्याकरिता केदार मृत्तिका बांधावी |
| ८. शुकेषु ते हरिमाणं | ” | ” | श्वेतकुष्ट शमन, १००० जप. |
| | | | भृंगराजहरिद्रेंद्रवारुणीनीलिकापिष्ट्या शुष्कगोमयेन श्वित्रप्रदेशे आलोहितदर्शनं प्रघृस्य लेपयेत्. पलितनाशेऽपि उपरिनिर्दिष्ट कर्म कारयति. |
| ९. किलास च पलित | ” | ” | ह्या मंत्रानें केशाना शौक्ल्य. श्वित्रादि (पांढरे केश, पांढरें कोड) रोग निवृत्ति होते–नीली (नील) श्वित्राला लावावी. |

| मंत्र | ऋषि | देवता | विनियोग. |
|---|---|---|---|
| १०. यदग्निरापो अदहत, नम शीताय तक्मने | अथर्वा | असुरोवरुण | एकाहिकशीत ज्वरवेलाज्वरादिशानये लोहकुठार अग्नौ संताप्य उष्णोदकमध्ये स्थापयित्वा व्याधित अभिसिंचयेत्. |
| ११. रेनस्तत् पश्यत | ” | ” | आ य हुत्वा खड्गादिशस्त्र सपात्य अभिमंत्र्य प्रयच्छेत्. कार्यसिद्धौ. उदकपूर्णं कुंभे आचमेत्, ऊनेन अधिकेन वा कार्यसिद्धि, दर्भस्तंभ अभिमंत्र्य कार्यं चिंतयित्वा गणयेत, समसंख्याया अभिमतसिद्धिः अक्षान् अनेन मंत्रेण अभिमंत्र्य प्रक्षिपेत्, इष्टसंख्यापततेन कार्यसिद्धि. |
| १२. अग्निर्नः शत्रून् प्रत्येतु, स सेना मोहयतु | ” | ” | परसेनामोहनमंत्र. ह्या मंत्राचा १०८ जप करून एकविंशति शर्करा शूर्पे (शर्करा=वाळूचे बारीक दगड) कृत्वा परसेना प्रति प्रेरयेत्. |
| १३. मुंचामि त्वा हविषा जीवनाय | ” | ” | राजयक्ष्मा, पूतिगंध मत्स्यसहित ओदन अभिमंत्र्य भोजनकाले प्राशयेत्, आरण्यतिलैश्च ज्वालि- |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | तोदपात्रेण उपःकाले गृहे व्यथितं अवसिंचयेत्, व्यथित उपस्पृश्य अभिमत्रयेत्. ह्या मंत्राचा १००० जप करावा. |
| १४. योगिरिष्व जायता. (१ ते १० ऋचा). | अथर्वा | असुरोनरुण' | राज्यक्ष्माकुष्ठादिरोगशान्तये पिशितं नवनीतं अभिमत्र्य, प्रतिलोम व्याधित शरीर प्रतिलिंपेत्. |
| १५. ददिर्हि मह्य वरुणो, यत्ते अपोदक, वृषामेरवो | ,, | ,, | तृतीयया दष्टस्थान पीडयति, विपमन्यत्र गच्छति, मृदादि तोयेन अप्रदक्षिणा रेखा करोति, वंधदष्टस्य शिखा बध्नाति, श्वेतवस्त्रेण ग्रंथि बध्नाति. |
| १६. अपचितः प्रपतत, सुपर्णो सवतेरिव | ,, | ,, | 'गण्डमाला अपचितः' या मत्रानें शंख उगाळावा, तो लेप लावावा. या मत्रानें जल मंत्रून गडमाळेस लावावें. सैंधवाचें पाणी मत्रून गडमाळेवर लावावें. |
| १७. या बभ्रवो याश्च शुत्रा. | ,, | ,, | केशवृद्धि, कासनिवृत्ति होण्याकरितां पालाश, उदुबर, जबु, काम्पील, सारु, वड, शिरीष, स्रक्य, वेरणः, बिल्व, जागिडः, कुटक', गृह्य गलानलः, वेतस् शिवलः सिपुनः स्यदनः कारणिका, अस्मयो, वनः, तुन्यु, पूतदारुः, [यांपैकीं] कोणत्याहि वृक्षाचा शाकलमणि अभिमत्रून बांधावा. |

| मंत्र | ऋषि | देवता | विनियोग |
|---|---|---|---|
| १८. इन्द्रस्य प्रथमो | अथर्वा | असुरोवरण | पैद्व सुवर्ण रंगाचा किडा चिरडून नस्य करावें, नागविषाचा परिहार होतो. |
| १९. अयं मे हस्तो हस्ताभ्यां दशशाखाभ्यां | ,, | ,, | मोहनास्त्र, दुसऱ्यास मोहन करणे हा 'हिप्नाटिझमचा' प्रयोग होय. |
| २०. ब्रह्मजज्ञानं प्रथमं | ,, | ,, | भक्तमभिमन्त्र्य ददाति. स्त्रीप्रसव सुखानें होतो. |
| २१. जाङ्गिडोसि | ,, | ,, | द्विपाद, चतुष्पाद यांचें रक्षण. सर्वरक्षाकर उत्तरदेशात जाङ्गिड वृक्ष आहे, त्याचा मणि वरील ऋचेनें अभिमंत्रून घ्यावा. व तो बांधावा. |
| २२. दर्भमणि | ,, | ,, | शत्रुविजय |
| २३. शतावरिमणि[1] | ,, | ,, | श्वित्र पामा ग्रहापस्मार निवारण. |

इत्यादूपण त्रिलोहमणि वगैरे मंत्रानुभव घेतलेले वैदिक, वे. शा. सखारामभट वैद्य, गोयन्का महाविद्यालय, ललिता घाट, बनारस.

---

१ शूल, निद्रानाश, श्वास, पांडुरोग, भगंदर, कर्करोग, सर्पविष, जलोदर, या मंत्राचा अनुभव जनार्दन गणपतराव जांभोटकर, मंत्रचिकित्सालय, मोहन बिल्डिंग, गिरगाव, मुंबई ४. ह्यानी घेतला असून ते अजूनही लोकोपकाराचें कार्य करीत असतात. (गो प्र. भा.) आधुनिक वेद व्यास कै. पंडित सातवळेकर ह्यानीं 'आर्थव वेदाचें सुबोध भाषांतर' (मराठी वेदा-

विशेषत आथर्वेदाच्या मंत्राची सिद्धि होण्यारिता वरील क्रम करून पचभूतात्मक देहाचा पचन्यात लय करावा व देहातील पापपुरुषाचा नाश झाला अशी भावना करावी नतर अतर्मातृका भावना, बहिर्मातृका व प्राणप्रतिष्ठा करावी व नतर षडग न्यास करावे. नतर तत्वादि न्यास षट्चक्रें व त्यात चक्रातील देवतांचें ध्यान करावें (हीच अजपाजपगायत्री होय) पुरुषसूक्त व विष्णुसूक्त याचे न्यास करावे. नतर मत्रजप करावा. सिद्धि होईल मत्रसिद्धीला अडथळे सस्काराचे आहेनच. परतु ह्या शिवाय आणखीही अडथळे आहेत ते असे —

> जिह्वा दग्धा परान्नेन हस्तो दग्धः प्रतिग्रहात् ।
> मनो दग्धं परस्त्रीभिः मंत्रसिद्धिः कुतो भवेत् ॥

---

(मागील पानावरून)

नुवाद) भाग पाच प्रसिद्ध केले असुन (प्रत्येकीं ५०० पृ) त्यात भाग ४ 'दीर्घजीवन व आरोग्य' या भागात वर उल्लेखिलेले रोग व उपाय यावद्दल थोडेंसें स्पष्टीकरण आहे. (गो प्र. भा.)

वर उल्लेखिलेले 'मणि' हे वैडूर्य, माणिक्य इत्यादि रत्नज मण्याप्रमाणें किंवा काचेचे मणि नसुन उद्भिज वनस्पति वृक्षातर्गत असे 'वशलोचना'-प्रमाणें लहानमोठ्या आकाराचे उत्कृष्ट औषधी पदार्थ आहेत. (गो. प्र भा )

◘ ◘

अमृत–मजिरी

१ देवदेवता मत्रामध्येच असतात आवाहन केल्यावरच येतात
२ वैदिक मत्र हे विज्ञानाचें अथाग भाडार आहे
३. वैदिक मंत्र नित्य सिद्ध व स्वयभु आहे वेदाना 'श्रुति' असेंही म्हणुतात
४. वैदिक मत्रातील विज्ञान वैश्विक विज्ञान आहे
५ वैदिकमत्र विज्ञान केवळ पचभौतिक नाहीं

# ३ मंत्र व उपासना

## १. सगुणोपासना

यानंतर आगम ग्रंथात मूर्धिनस्थान पावलेल्या सगुणोपासनेबद्दल विचार करणे जरूर आहे.

बहिरंग उपासना, बाह्यपूजा अथवा सगुणोपासना याचे विविध क्रम, पूजासंभाराचे प्रकार, या गोष्टी अनंत कालापासून अस्तित्वात आहेत व पुढें अनंतकालपर्यंत अस्तित्वात रहातील. म्हणजे एका महाकल्पाच्या आरंभापासून परिसमाप्तीपर्यंत किंवा एका महाप्रलयापासून दुसऱ्या महाप्रलयापर्यंत थोड्या फार प्रमाणात त्या अस्तित्वात रहात असतात. वस्तुतः मनुष्यप्राणी हा उत्सवप्रिय आहे. धर्मग्रंथात मानवी संस्काराच्या उन्नतावनत स्थितीच्या अनुरोधानें कृत, त्रेता, द्वापार व कली असे कालखंड केलेले आढळतात व 'कृते यद्ध्यायते विष्णु' 'त्रेतायां यजतो मखैः' 'द्वापारे परिचर्याया' कलौ तद्धरिकीर्तन व कलि. शयानो भवति संजिहानस्तु द्वापारः उत्तिष्ठन्स्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन्' कृतत्रेतादि कालखंडात मानवी जीवनाचे व्यापार कसे होतात, हें यात वर्णन केलेले दिसतें. कृतयुगात उद्योगसंपन्नता दिसते व कलियुगात आलस्यप्रचुरता दिसते. कलियुग म्हणजे वादविवादाचें, भांडणाचें, दुःखाचें युग, अथवा कलियुग म्हणजे नाना प्रकारच्या मानवी सुखसंवर्धक व मानव सहायक कलाची उत्पत्ति व संवर्धन होणारें युग, असेंहि कांहींचे म्हणणें आहे. स्वार्थलोलुपता म्हणजे राक्षसी स्वार्थ, कलियुगात जास्त

पाळावतो असेंहि निदर्शनास येतें. असें जरी आहे तरी कृत, त्रेता द्वापार व कलि ह्या *महायुगात पुन्हा लघुयुग पर्याय असतात.* म्हणजे कृतयुगात कृतकृत, कृतत्रेता, कृतद्वापार आणि कृतकली अशीं लघुयुगें असतातच. इतकेंच नव्हे तर *आज कलियुगातही कृतयुगीन, त्रेतायुगीन व द्वापारयुगीन मनुज – सच दिसून येतात.* चारी वेदांतून परब्रह्माच्या सावयव व सगुण मूर्तीचा उल्लेख आहे 'अनंता वै वेदाः' वेद अनंत असल्यानें व आथर्वणवेदांत नमूद असलेलीं सूक्तें ऋग्वेदातही असल्यानें प्रथम ऋग्वेद, नंतर यजुर्वेद, नंतर साम व अनंतर आथर्वण अशी वेदोत्पत्ति लावणें हें योग्य दिसत नाहीं. विश्व एका काळीं उत्पन्न झालें असें म्हणता येत नाहीं. अखिल विश्वांत कांहीं स्थळीं लय, कांहीं स्थळीं उत्पत्ति व कांहीं स्थळीं उत्पत्तीनंतरची पूर्णावस्था असा क्रम चालू असतो. म्हणजे ह्या *विश्वांत उद्‌भव – स्थिति – लय पुन्हा उद्‌भव – स्थिति – लय अशी योजना* चालूच असते 'धाता यथापूर्वमकल्पयत्' या वाक्यावरून एकदा वेदाची जागृति पुन्हा अस्तंगतता हा क्रम चालूच आहे वेद प्रथम, नंतर ब्राह्मण ग्रंथ नंतर आरण्यकें, उपनिषदें अशी वेदग्रंथाच्या उपस्थितीची आनुपूर्वी लावता येत नाहीं. *गायत्री मंत्र चारही वेदांत आहे.*

देव्यथर्वशीर्ष, गणपत्यथर्वशीर्षादि उपासनापद्धति अथर्वण वेदाच्या उपनिषद् भागात आहेत. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करिताना 'प्राणप्रतिष्ठाया जप्त्वा' असा देव्यथर्वशीर्षाचा जप सांगितला आहे. यावरून उपनिषदें ह्या वेदग्रंथाचा शिरोभाग शेवटीं श्रुतिगोचर झाला असावा असें म्हटल्यास प्रथमतः वेदसंहिता नंतर ब्राह्मण व नंतर उपनिषदें अशी आनुपूर्वी लावता येणार नाहीं. न तशी लावली तर ऋग्वेदकालीं संध्याकर्माची प्रक्रिया उपलब्ध नव्हती असें म्हणावें लागेल म्हणजे ऋग्वेदकालीं संध्या-विधान नव्हतें अशी आपत्ति उत्पन्न होईल म्हणून वेद ब्राह्मण व उपनिषदें एकदमच अस्तित्वात होतीं; असें म्हणणें आपस्यक आहे संध्याकर्म करिताना इतर प्रार्थना व यज्ञीय कर्माचीं विधानें श्रुतिगोचर झालीं असावीं

अशी कल्पना करावी लागते. यावरून उपनिषद्काल, वेदकाल असे कालखंड कल्पिता येत नाहीत व कल्पिलेच तर त्या कालखंडाच्या पूर्वी-पासून सूर्योपासना व अग्न्युपासना लोकात रूढ झालेल्या होत्या, अग्नीचे ध्यान "सप्तहस्तश्चतु शृगो सप्तजिह्वो द्विशीर्षक " "स्वाहातु दक्षिणे पार्श्वे देवीं वामे स्वधा तथा। बिभ्रद्दक्षिणहस्तैश्च शक्तिमन्न स्रुच स्रुव। तोमर व्यजन वामैर्घृतपात्र च धारयन्॥" असे आहे यजुर्वेदात "याते रुद्र शिवातनूर-घोरापापकाशिनी। यामिषु गिरिशतहस्ते बिभर्ष्य स्तवे।" या वचनावरून वेदात देवताचीं हस्तपादादि इंद्रियविशिष्ट वर्णनें आढळून येतात. तसेच वेदकाळीं म्हणजे पाश्चात्याच्या अनुकरण-शैलीप्रमाणे आधुनिक कालगणना विचारात घेता सात हजार वर्षांपूर्वी सूर्यमदिरे होतीं, असें मोहनजोदारो येथील उत्खननात सापडलेल्या लेखावरून दिसून येते.

मनुष्याच्या भावना जागृत करण्याकरिता मूर्तिपूजा, मूर्तिरथोत्सव व देवताचे नित्यनैमित्तिक सामुदायिक उत्सव याची आवश्यकता आहे असें म्हणण्यास काहीं हरकत नाहीं आजकाल असा कोणताही धर्म नाहीं किंवा पथ नाहीं कीं त्यात अशा उत्सवाचें समूळ उच्चाटन केलेलें आहे निरीश्वरवादी रशिया देशात प्रार्थनालयाची निरर्थकता समजून त्याच्या जागा शिक्षणसस्थाकरिता उपयोगात आणलेल्या आहेत असे वाचण्यात येतें परतु ह्या ठिकाणीं सुद्धा शेंकडा ३० लोक प्रार्थनालयात जाणारे आहेत. म्हणजे शेंकडा ३० टक्के लोकाकरिता प्रार्थनामदिरें रक्षण केलेलीं आहेत असें म्हणावयास काही हरकत नाहीं दुसऱ्या युरोपियन युद्धाचे वेळीं रशिया देशावर आपत्ति (म्हणजे जर्मनीच्या हिट्लरची स्वारी) आली तेव्हा सर्व उर्वरित प्रार्थनामदिरात्न रशियाला जय मिळावा अशा प्रार्थना कराव्या असे ठरविण्यात आल होते[1]

---

१. अमेरिकेचे मानवसहित चद्रयान चद्राजवळून फेऱ्या घालून परत पृथ्वीवर सुखरूप आलें. (१९६९) ह्या विज्ञान विक्रमाच्या आनदामुळें निरीश्वरवादी

विशेषत वेदान्तदुन्दुभि सारखा बारा महिने तेरा काळ दुमदुमून राहिला आहे, अशा या आपल्या भारतवर्षांत उपासकाची अर्थात् सूर्योपासकाकरिता देवतायतनाची अधिकच आवश्यकता आहे व तशी सूर्योपासना चालूही आहे. परंतु हल्लींच्या कराळ कलिकाळात ती उपासना वेगडी व केवळ ढोंगधत्तुरा माजविणारी झाली आहे. संध्या अगर पूजा करिताना न्यास करण्यास सांगितले आहेत, ह्या न्यासक्रियेनें धातुमय अगर पाषाणमय मूर्तीच्या अगर यंत्राच्या ठिकाणीं देवताआवाहनानें पूजाकाल-पर्यंत देवतेचा आविर्भाव होत असतो व उपासकानें आपल्या शरीरांतील विशिष्ट स्थानी देवताचे न्यास केल्यानें (दृढभावना जागृत केल्यानें) उपासक देवतामय होतो परंतु ही न्यासक्रिया, नाक, डोळे, कान यास भावनाविरहित स्पर्श करण्यापलीकडे राहिली नाहीं! तशीच स्थिति वेदांत त्रय म्हणजे प्रस्थानत्रयीच्या अभ्यासाची झाली आहे. प्रस्थानत्रयीच्या अभ्यासानें वेदान्तसूरी पंडित होतात. पूर्वपक्ष व उत्तरपक्षही करितात, सांख्य, पातंजल, जैमिनीय पूर्वमीमांसा, काणाद, गौतम व बौद्धदर्शन यांच्या अध्ययनानें विवेचक बुद्धि जागृत होण्याच्या ऐवजीं त्या त्या शास्त्रात गढून गेल्यामुळे "षड्दर्शनमहाकूपे पतिता पशव खग" (गरुडपुराण), अशी त्या अभ्यासकाची गति होते व मूलग्राही व ऐहिकामुष्मिक फलदायी उपासनेकडे त्याचे दुर्लक्ष होते. म्हणून *आधुनिक कालात उपासना साधन परिणामी फलदायी होण्याकरिता वैदिक, तान्त्रिक व पौराणिक मंत्रमूलक प्रतीकोपासनेकडे* जनतेचें लक्ष वेधलें पाहिजे.

मागील स्तभामध्ये तंत्रशास्त्राचीं जीं सात अगर बत्तीस लक्षणे

---

रशियात हजारों लोक प्रार्थना मंदिरात जाऊन देवासमोर आनंद व्यक्त करून आले असे जाहीर झालें, त्वकरच रशियाचीं शुक्रवेधी यानें अशीच परत येतील. साराश प्रार्थना व त्यांचीं मंदिरें ह्यांचें समूळ उच्चाटन झाले आहे, असा एकही देश नाहीं. म्हणून तें कृत्य वा ती स्थिति अमानवी व अस्वाभाविक आहे हेंच खरें. (गो. प्र मा.)

सांगितलीं आहेत, त्या लक्षणांत देवतार्चनरूपी उपासनासाधन सांगितलें आहे या साधनावद्दल तन्त्रशास्त्र असें प्रतिपादन करितें कीं, मन्त्रशास्त्र हें प्रत्यक्षशास्त्र आहे म्हणजे या शास्त्रांत आत्मदर्शनाचीं साधनें सांगितलीं आहेत. इतर शास्त्रांत वादविवादरूप पूर्वपक्ष, उत्तरपक्ष, न्यायशास्त्रांतील परिष्कार इत्यादि वाक्‌शक्तीचे व स्मरणशक्तीचे विषय येतात. परंतु *मन्त्रशास्त्रांत प्रत्यक्ष अनुभवाचेच विषय असतात.* विश्वास असो वा नसो औषधीप्रयोगानें जसें वृश्चिकपीडाहरणाचें कार्य होतें, तसेंच विश्वास असो वा नसो, वृश्चिकमन्त्रानें वृश्चिकदंशाची पीडा नष्ट होते. नागदंशानें मूर्छित झालेल्या मनुष्याचे ठायीं विश्वास अगर भावनाचा उद्गम होणें शक्य नसतें, असा मनुष्य सर्पमन्त्रानें बरा होतो यावरून *मन्त्रशास्त्र* हें *प्रत्यक्षानुभवदर्शी शास्त्र* आहे. मन्त्रशास्त्राचा असा निर्वाळा आहे कीं, मन्त्रशास्त्र हें रोग, कष्ट, पीडा यांचे निवारण करणारें व शरीरसुखलब्धीस साधनभूत आहे. इतकेंच नव्हे तर *या शास्त्रांत सर्व मानवास आत्मोद्धाराचा मार्ग निर्दिशित केलेला आहे.*

स्त्री, शूद्र, द्विजबंधु, दास किंवा अनार्य लोक अथवा जे जे मानव वेदत्रयी पठनपाठनास अयोग्य मानण्यांत आले आहेत व ज्यांचे संस्कार वेदोक्त ऋचांनीं होऊं शकत नाहींत त्यांचा समावेशही आगमोक्त आचारधर्मांत करितां येतो. म्हणजे त्यांचे सर्व संस्कार आगमोक्त मन्त्रांनीं करितां येतात वेदमन्त्राप्रमाणें *आगमोक्त मन्त्रांना ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उदात्त, अनुदात्त असे स्वर नसतात.* त्यामुळें ज्यांची वाणी परंपरेनें उत्कृष्ट संस्कृतीस प्राप्त झाली नाहीं, त्यास आगमोक्त मन्त्राचा जप, पाठ अगर आवृत्ति करण्यास सुलभ पडतें. वरील स्तंभांत वर्णन केल्याप्रमाणें मन्त्रसामर्थ्याची सत्यता सर्व मानवजातीला अनुभवितां येते, असा लेखकाचा दृढ विश्वास आहे, अंधविश्वास नव्हे. लेखकाच्या माहितींतील एक यावनी मन्त्र आहे. तो मन्त्र एका ब्राह्मणानें यवन अवलियाम सांगितला त्यानें तो मन्त्र एका जैनास दिला, त्या जैनानें एका ब्राह्मणास सांगितला

इतक्या प्रकारच्या भिन्न जातींच्या लोकांत जरी तो मंत्र परंपरेनें दिला गेला तरी त्या *मंत्राची सिद्धि नष्ट झाली नाहीं*. त्या मंत्राचें वार्षिक विधान हिंदूकरिता बलिप्रतिपदेला करावें व यवनांनीं मोहरमच्या दहाव्या दिवशीं करावें असें सांगण्यात आलें आहे. त्या मंत्राचे विधान हिंदूकरिता असें आहे कीं, मंत्र म्हणून १०८ तांबडया कण्हेरीचीं फुलें तांब्याच्या ताम्हनांत पाणी घालून त्या पाण्यांत चंद्राला उद्देशून तीं वहावयाचीं एवढेंच. या विधीनें त्या त्या जातींतील अगर वर्णांतील मनुष्यानें वरील विधान केल्यास त्याला त्या मंत्राच्या सिद्धीचा अनुभव येतो.

अशा प्रकारचे विधि व दीक्षाविधानासारखे उत्सव यांनी मनुष्याच्या मनावर उत्कट परिणाम होतात. सर्व सृष्टीच्या मुळाशीं मन सृष्टि आहे, व मन सृष्टीनेंच स्थूलसृष्टि निर्माण झाली आहे. मंत्रातील गूढशक्ति विधियुक्त आचारानीं व गुरूच्या संस्कारानीं जागृत होते व गुरूनीं ती शिष्याच्या मन पटलावर स्थापित केलेली असते. ती प्रभावशाली होण्यास शिष्याचाही अधिकार असावा लागतो. जशी ज्या शिष्याची आचारशुद्धि, जसा त्याचा अधिकार तशी त्याचे ठिकाणीं मंत्रशक्ति आरूढ होते. अधिकारपात्रतेप्रमाणें म्हणजे संस्कारशुद्धतेनें आगीं असलेल्या सामर्थ्या-प्रमाणें लहानापासून मोठ्या अधिकारसंपन्न शिष्याला उपयोगी पडतील अशीं नानाप्रकारचीं मंत्रविधानें हीं मंत्रशास्त्रांत उल्लेखित केलेलीं आहेत. आचारविचार आणि व्यवहार यांत परद्रव्यापहार, परस्त्रीसंपर्क हें वर्ज्य आहे परंतु मंत्रसिद्धि प्राप्त होण्यास परान्न घेणें, प्रतिग्रह म्हणजे दक्षिणा घेणें, हेही आचारदोष गणिलेले आहेत. 'सत्यपूता वदेत् वाणी' असें सांगण्यात येते व 'नास्ति सत्यात् परो धर्म ' असेंही सांगण्यात येते सर्व प्रकारची आचारशुद्धिसंपन्नता असूनही असत्यभाषणी मनुष्य असेल तर त्याला मंत्रसिद्धि प्राप्त होणार नाहीं. यदाकदाचित् गुरूसामर्थ्यानें मंत्रसिद्धि प्राप्त झाली तरी तीही टिकणार नाहीं. एका गृहस्थानें आपला मुलगा असा पाहिला कीं, तो कधींही असत्यवाणी वदला नाहीं त्या मुलाला

सांगितलीं आहेत, त्या लक्षणात देवतार्चनरूपी उपासनासाधन सांगितलें आहे. या साधनाबद्दल तन्त्रशास्त्र असें प्रतिपादन करितें कीं, मन्त्रशास्त्र हे प्रत्यक्षशास्त्र आहे म्हणजे या शास्त्रात आत्मदर्शनाचीं साधनें सांगितलीं आहेत. इतर शास्त्रात वादविवादरूप पूर्वपक्ष, उत्तरपक्ष, न्यायशास्त्रातील परिष्कार इत्यादि वाग्शक्तीचे व स्मरणशक्तीचे विषय येतात. परंतु *मन्त्रशास्त्रात प्रत्यक्ष अनुभवाचेच विषय असतात.* विश्वास असो वा नसो औषधीप्रयोगानें जसें वृश्चिकपीडाहरणाचें कार्य होतें, तसेंच विश्वास असो वा नसो, वृश्चिकमन्त्रानें वृश्चिकदंशाची पीडा नष्ट होते. नागदंशानें मूर्छित झालेल्या मनुष्याचे ठायीं विश्वास अगर भावनाचा उद्गम होणे शक्य नसते, असा मनुष्य सर्पमन्त्रानें बरा होतो. यावरून *मन्त्रशास्त्र* हे *प्रत्यक्षानुभवदर्शी शास्त्र* आहे. मन्त्रशास्त्राचा असा निर्वाळा आहे कीं, मन्त्रशास्त्र हे रोग, कष्ट, पीडा याचे निवारण करणारें व शरीरसुखलब्धीस साधनभूत आहे. इतकेंच नव्हे तर या *शास्त्रात सर्व मानवास आत्मोद्धाराचा मार्ग निर्दिशित केलेला आहे.*

स्त्री, शूद्र, द्विजबधु, दास किंवा अनार्य लोक अथवा जे जे मानव वेदत्रयी पठनपाठनास अयोग्य मानण्यात आले आहेत व ज्याचे संस्कार वेदोक्त ऋचानीं होऊ शकत नाहींत त्याचा समावेशही आगमोक्त आचारधर्मांत करिता येतो. म्हणजे त्याचे सर्व संस्कार आगमोक्त मन्त्रानीं करिता येतात. वेदमन्त्राप्रमाणें *आगमोक्त मन्त्रांना ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत, उदात्त, अनुदात्त असे स्वर नसतात.* त्यामुळें ज्याची वाणी परंपरेनें उत्कृष्ट संस्कृतीस प्राप्त झाली नाहीं, त्यास आगमोक्त मन्त्राचा जप, पाठ अगर आवृत्ति करण्यास सुलभ पडतें वरील स्तंभात वर्णन केल्याप्रमाणें मन्त्रसामर्थ्याची सत्यता सर्व मानवजातीला अनुभविता येते, असा लेखकाचा दृढ विश्वास आहे, अंधविश्वास नव्हे. लेखकाच्या माहितींतील एक यावनी मन्त्र आहे. तो मन्त्र एका ब्राह्मणानें यवन अवलियास सांगितला. त्यानें तो मन्त्र एका जैनास दिला, त्या जैनानें एका ब्राह्मणास सांगितला

इतक्या प्रकारच्या भिन्न जातींच्या लोकांत जरी तो मंत्र परंपरेनें दिला गेला तरी त्या मंत्राची सिद्धि नष्ट झाली नाहीं. त्या मंत्राचें वार्षिक विधान हिंदूकरिता बलिप्रतिपदेला करावें व यवनांनी मोहरमच्या दहाव्या दिवशीं करावें असें सांगण्यात आलें आहे. त्या मंत्राचें विधान हिंदूकरिता असें आहे कीं, मंत्र म्हणून १०८ तांबड्या कण्हेरीचीं फुलें तांब्याच्या ताम्हनांत पाणी घालून त्या पाण्यांत चंद्राला उद्देशून तीं वहावयाचीं एवढेंच. या विधीनें त्या त्या जातींतील अगर वर्णांतील मनुष्यानें वरील विधान केल्यास त्याला त्या मंत्राच्या सिद्धीचा अनुभव येतो.

अशा प्रकारचे विधि व दीक्षाविधानासारखे उत्सव यांनीं मनुष्याच्या मनावर उत्कट परिणाम होतात. सर्व सृष्टीच्या मुळाशीं मन सृष्टि आहे, व मन सृष्टीनेंच स्थूलसृष्टि निर्माण झाली आहे मंत्रातील गूढशक्ति विधियुक्त आचारांनीं व गुरूच्या संस्कारांनीं जागृत होते. व गुरूनीं ती शिष्याच्या मन पटलावर स्थापित केलेली असते. ती प्रभावशाली होण्यास शिष्याचाही अधिकार असावा लागतो. जशी ज्या शिष्याची आचारशुद्धि, जसा त्याचा अधिकार तशी त्याचे ठिकाणीं मंत्रशक्ति आरूढ होते. अधिकारपात्रतेप्रमाणें म्हणजे संस्कारशुद्धतेनें आंगीं असलेल्या सामर्थ्या-प्रमाणें लहानापासून मोठ्या अधिकारसंपन्न शिष्याला उपयोगी पडतील अशीं नानाप्रकारचीं मंत्रविधानें हीं मंत्रशास्त्रांत उल्लेखित केलेलीं आहेत. आचारविचार आणि व्यवहार यांत परद्रव्यापहार, परस्त्रीसंपर्क हे वर्ज्य आहे परंतु मंत्रसिद्धि प्राप्त होण्यास परान्न घेणें, प्रतिग्रह म्हणजे दक्षिणा घेणें, हेही आचारदोष गणिलेले आहेत 'सत्यपूता वदेत् वाणी' असें सांगण्यांत येते व 'नास्ति सत्यात् परो धर्म ' असेंही सांगण्यांत येतें. सर्व प्रकारची आचारशुद्धिसंपन्नता असूनही असत्यभाषणी मनुष्य असेल तर त्याला मंत्रसिद्धि प्राप्त होणार नाहीं यदाकदाचित् गुरुसामर्थ्यानें मंत्रसिद्धि प्राप्त झाली तरी तीही टिकणार नाहीं. एका गृहस्थानें आपला मुलगा असा पाहिला कीं, तो कधींही असत्यवाणी वदला नाहीं. त्या मुलाला

गायत्रीमंत्राशिवाय दुसरा मंत्रही अवगत नव्हता. असें असून त्या मुलाचे वाणींतील शब्द अक्षरशः खरे होत असत. उदाहरण देण्याचा हेतु हा कीं, सर्व संस्कार असूनही मंत्रसिद्धि *प्राप्त होण्याकरिता व ती स्वताचे* ठायी टिकून राहावी, याकरिता *सत्यवचनाचीही पूर्णतया आवश्यकता आहे.*

मंत्रशास्त्राचा मुख्य गुण म्हणजे त्यामध्ये निरनिराळ्या साधना सागितल्या आहेत हाच होय. ही साधना म्हणजे केवळ पूजा अगर प्रार्थनाच नव्हे. ह्या साधनेंत देवांची करुणा भाकणें, 'पापोऽहं पापकर्माहं पापात्मा पापसंभवः त्राहि मां कृपया देव' *इत्यादि वचनें म्हणणें व तशी भावना करून घेणें, अगर इष्टपदार्थ अगर इष्टवासनापूरणार्थ याचना करणें, या गोष्टी येत नाहीत पापकर्म घडल्याबद्दल पश्चात्तापपूर्वक क्षमायाचना करणें इत्यादि मार्ग नाहीत. पण उलट ह्या साधनेंत पुरुष व प्रकृति यांचें ऐक्यसाधन करणें ही गोष्ट प्रामुख्यानें येते.* तसेंच शरीरातील प्रकृतितत्त्व व पुरुषतत्त्व याचें ऐक्य संपादन करण्याकरिता प्रकृतितत्त्व म्हणजे सगुणरूप आकलन करून, म्हणजे त्या रूपाशी तादात्म्य करून, निर्गुणरूप म्हणजे पुरुषतत्त्व यात कसें विलीन करावें हीच गोष्ट ही साधना शिकविते. उदाहरणार्थ, आपली वाचाशक्ति म्हणजे आपली जिव्हा शाबूत आहे. कंठाजवळील शब्दोच्चार तार-मंद-मध्यमस्वरोत्पादक एक पेटिकाही आहे. इतकें असूनही शब्दोच्चार कसा होतो व तो शब्द कोण उच्चारितो याचा विचार करितां त्या शब्दाला व उच्चार करणाऱ्याला रूप नाहीं असें दिसून येतें, तेव्हा या दोघांचा संयोग झाल्याशिवाय म्हणजे प्रकृति-पुरुषाची ऐक्यता झाल्याशिवाय शब्दोच्चार होणार नाहीं. हें जसें *सत्य आहे तशी प्रकृतिपुरुषाची ऐक्यता संपादन करण्याचें साधन म्हणजे एक विशिष्ट पद्धतीची पूजाअर्चना हें आहे. म्हणून ही साधना साध्य करण्याकरितां शरीरांतील गूढ शक्ति जागृत करावी लागते.* ह्या साधनेंत तोच पुरुष सिद्ध झाला असें समजावें की, ज्यानें आपल्या शरीरांतील कुंडलिनी शक्ति जागृत करून तिच्या साहाय्यानें शरीरांतील षट्चक्रें

चक्राचा अनुभव घ्यावा लागतो. ही साधनासिद्धि परोक्षानुभूति व अपरोक्षानुभूति प्रत्यक्ष करून देणारी आहे. पंचदशी पंचीकरणादि ग्रंथाच्या अभ्यासानें व वेदान्तावर व्याख्यानें दिल्याने वा वेदान्तातील प्रस्थानत्रयींतील शब्दसृष्टीच्या आधारानें ही अनुभूति प्राप्त होणार नाही. वेदान्तात शिरल्यावर सगुणोपासना 'अधमाप्रतिमापूजा' या वचनानें टाकाऊ झालेली असते. पण मोरोपंत म्हणतात

**सगुणिं अनादर करनी जो कोणी आदरील पंचदशी।**
**त्याच्या ज्ञानाग्नीनें न जळे एकहि पटप्रपंचदशी'॥**

हेच खरें. मंत्रशास्त्र असें सांगते की योग्य गुरूपाशीं जाऊन अभ्यास करा. कुंडलिनीशक्ति जागृतीचा अभ्यास करा व नंतर अनुभव न येईल तर सोडून द्या. दुसऱ्या मार्गांत इतकी शर्त दिलेली नाहीं व रोकडा परमार्थ सांगितलेला नाही. या मंत्रमार्गीय साधनानें पातंजलीय योगशास्त्राला प्रत्यक्ष शास्त्राची योग्यता आणून दिलेली आहे.

पूजा करण्याकरिता मूर्ति कोणकोणत्या प्रकारच्या असाव्या याचाही उल्लेख करणे इष्ट आहे.

**शैली दारुमयी लौही लेख्या लेप्या च सैकती।**
**मनोमयी मणिमयी प्रतिमाष्टविधाः स्मृताः।**

(मणि म्हणजे स्फटिक, वैडूर्य, मुक्ता, हीरक, पाचु, लालक)

यात शैली, (दगडाची) दारुमयी, लोही, मणिमयी या प्रतिमा स्थूलप्राधान्य भावनामय आहेत.

सूक्ष्म प्राधान्य भावना मनोमयी प्रतिमांनी (स्थूलप्रतिमाचा आकार मनात आणण्याने) साध्य होते व परभावना मंत्रमय प्रतिमांनी साध्य होते. मंत्रविद्या श्रीज्ञानेश्वरमहाराज व श्रीएकनाथमहाराज यांस अवगत होती. कारण मंत्रपुरश्चरणहवन हे विधी श्रीएकनाथी भागवतांत वर्णन केलेले आहेत. श्रीसमर्थ रामदासस्वामींना मंत्रशास्त्र अवगत होते. कारण त्यांनी

स्त्रिया शूद्र यात भेद नसतो. एकमेकाचे एकमेक पादवदन करितात, त्यावेळीं एखाद्या फडावरील मुख्य निरूपणकारही, पादवदन करावयाची व्यक्ति कोणीही असो, त्या व्यक्तीचें पादवंदन करण्यास कचरत नाही. पढरपूरच्या यात्रेंत ही गोष्ट प्रामुख्याने दिसते.

## २. मंत्र व त्यांतील शब्द

येथपर्यंत तत्रमार्गाची व्याप्ति कशी आहे हे वर्णन केले. तत्रमार्ग दर्शविणारीं तत्रें व आगम या सर्वांत अनुस्यूत असणारें मत्रशास्त्र व तदगभूत यत्रें व मूर्ति याचेकडे आता वळू. मत्र आणि शास्त्र या शब्दाची व्याख्या पूर्वी आलेली आहे म्हणून मत्राबद्दल विचार करिताना मत्रातील व मत्रशब्दसमूहातील शब्द व इतर शब्दसमूहातील शब्द यातील शब्दशक्तीचा फरक पाहणे आवश्यक आहे मत्रघटित शब्दसमूहच इतर शब्द व शब्दसमूह यातील कार्य करण्याचें सामर्थ्य यात फरक आहे. सामान्य शब्दसमूहाचें सामर्थ्य विशिष्ट प्रसगापुरतेंच असतें. उदाहरणार्थ, काहीं युद्धगीते, युद्धप्रसगातील सेनानायकानें सैनिकात उत्साह वाढविण्याकरिता उच्चारिलेलीं वाक्यें, आप्तविरहप्रसगीं विरहीजनाचें सात्वन करण्याकरिता बोललेले उपदेशपर शब्द, इत्यादि शब्दसमूहातील सामर्थ्य अगर शक्ति क्षणिक परिणामकारक असते. परतु *मत्रशब्दास्थित मत्रशक्ति निरतर टिकणारी असते.*

काहीं शब्दोच्चार असेहि आहेत कीं, त्याच्या उच्चाराबरोबर काहीं एक प्रकाराचा परिणाम श्रोत्याच्या मनावर नेहमीं होईल. 'खडे रहो' असें म्हटल्यावर ऐकणारीं मनुष्यें उभीं राहतील. परतु या उदाहरणातसुद्धा श्रोत्याच्या मनोनुकूलतेची जरूर आहे व भाषा समजण्याचीही जरूरी आहे म्हणजे हें कार्य एकदेशीय होईल. परतु मत्रोच्चारित शब्दसमूहातील शक्ति अनन्यसाधारण आहे. ऋषिवराच्या मत्राची भाषा ऋषिप्रदष्ट मनुष्यास अगर मान्त्रिकासही न समजो, अगर त्याचा त्या

वृश्चिकमंत्रावर विश्वासही नसो, अर्थात त्याची मनोनुकूलताही असो वा नसो, परंतु मांत्रिकानें मंत्राचा उच्चार केल्याबरोबर वृश्चिकदष्ट मनुष्याची विषबाधा नष्ट होते ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. यावरून मंत्रातील अक्षरसमूहाच्या उच्चाराचा परिणाम चिरसिद्ध आहे असें दिसून येतें. मंत्रोच्चार झाल्याबरोबर मंत्रशक्ति प्रकाशमय आहे असे दिसतें. मंत्रातील अक्षरसमूह अगर शब्दसमूह याचा काहींच स्पष्ट अर्थ समजून येत असो वा नसो, परंतु त्या मंत्रोच्चारापासून अतिमानुष शक्ति उत्पन्न होते, हें मात्र खास होय. या *अतिमानुष चिरसिद्ध शक्तीलाच आपण सिद्धि अगर चमत्कार म्हणतों.*

## ३. मंत्र-सिद्धि व चमत्कार

सिद्धि व चमत्कार होतात हे काहीं अबाधित नियमांनीच होतात *आपणास ते नियम अज्ञात असतात, म्हणून आपण त्यास चमत्कार अगर सिद्धि म्हणतों.* पन्नास वर्षांपूर्वी आज अंतराळातील विद्युत्शक्तीनें सिद्ध होणाऱ्या दूरश्रवण व दूरदर्शन ह्या गोष्टी चमत्कारातच गणल्या जात असत व त्या अजूनही तशाच मानिल्या जातात. योगी मनोवहा नाडीच्या साहाय्यानें हृदयक्रिया अगर नाडीची गति वगैरे बंद करितात,[१] हाही आजच्या सृष्टिविज्ञान शास्त्रज्ञांना चमत्कार वाटतो परंतु योगी लोकांना ही एक सहजसाध्य क्रिया असते, व मनोवहा नाडीच्या साहाय्यानें ही क्रिया होते, म्हणून त्यास हा चमत्कार वाटत नाहीं. आपल्या स्थूल सृष्टीच्या पलीकडे सूक्ष्म सृष्टि आहे, प्राण्यांना स्थूल शरीराप्रमाणेंच सूक्ष्म शरीर आहे, याची सत्यता ज्यांना पटली नाहीं,

---

१. आपल्या मनोवहा नाडीवर ताबा चालवून सर्कसवाले प्रो. एकनाथमूर्ति किंवा ताराबाई ह्यांच्या तळहातावर बंदुकीनें गोळी मारली असताही ती शरीरात न जातां चपटी होऊन खालीं पडे! हें दृश्य पाहिलेलें आहे. याचें नाव रक्त वाहिन्या बंद करण्याची सिद्धि!

श्रीगायत्रीमंत्राचीं पुरश्चरणें करून श्रीरामरायाचा सगुण साक्षात्कार करून घेतला होता.

आणवादि मलाचा आत्मज्ञानानें नाश करून चैतन्य म्हणजे प्रकाशरूप असा जो परशिव त्याची प्राप्ति होते. यांत प्रकाशरूपाचाच विशेष असल्यानें त्यास शांभवयोग किंवा शांभवउपाय असें म्हटलें आहे. त्रिपुरसुंदरीरूप भुवन हा परशिव आहे. यांत प्रकाशरूप शिवाचें ध्यान सांगितलें आहे.

मंत्रशास्त्रांत अर्थात तंत्रमार्गांत वारंवार असें सांगितलें आहे कीं, 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' पूजेकरितां समोर ठेवलेलें प्रतीक ही एक निराळी देवता आहे असें नाहीं. *पूजा सुरू करण्यापूर्वीं व पूजा समाप्त झाल्यावर* प्रतीक तें प्रतीकच होय. पूजकानें पूजा सुरू करण्यापूर्वीं प्रतीकामध्यें प्राणप्रतिष्ठा करावी लागते व ती करितांना "द्वारेण ब्रह्मरंध्रस्य नासारंध्रात् विनिर्गत। पुष्पांजलौ समाहूय्य॥ व "आत्मसंस्थं महाशुद्ध त्वामहं परमेश्वर। *आरण्यमिव हव्याश मूर्तौवा आवाहयाम्यहं।" असें म्हणून मूर्तीचे ठिकाणीं* आपल्या आत्मतत्त्वाची स्थापना करावी लागते, हीच प्राणप्रतिष्ठा होय. यावरून *तंत्रशास्त्राची महती, क्रियाप्रवणता व तदंगभूत होणारी प्रत्यक्ष अनुभवाची प्राप्ति या गोष्टी सिद्ध होतात,* प्राणप्रतिष्ठा केल्याशिवायही मूर्तीमध्यें देवतेची जागृती होते. कॅप्टन् बखले (लाहोर) यांचेकडे श्री गणपतीची मूर्ति होती, तिचा असा अनुभव होता. याप्रमाणे कांहीं मंत्राचाही अनुभव आहे

शक्ति म्हणजे पराशक्ति, म्हणजे *पूर्णाहत* विश्वस्फुरण करणारी शक्ति, जी मंत्रवीर्याला प्रकट करिते, अशी सत्ता ती ही. या योगांत त्रिपुरसुंदरीच्या मंत्राचें विशेषत्व आहे व मी त्रिपुरसुंदरीरूप आहें अशी भावना दृढ केल्यानें हे जगत् त्रिपुरसुंदरीरूप आहे असें भासतें व दिसतें म्हणून तसें सिद्ध होतें म्हणजे आरशांत ज्याप्रमाणें नाना प्रकारचीं चित्रें दाखविलीं तरी तीं चित्रें आरशावर कांहींच परिणामकारक होत नाहींत, त्याप्रमाणें हें

जगत् त्रिपुरसुंदरीरूप आरशातील चित्राप्रमाणें परशिवाच्या प्रकाशरूपावर चित्रित झालें असलें तरीही परशिवावर त्याचा काहींच परिणाम न होता तो प्रकाशरूपच असतो व राहतो. सारांश असें हें जगत् परशिवाच्या प्रकाशात दृश्य होतें म्हणजे तें परशिवरूप आहे, म्हणजे त्रिपुरसुंदरीरूपच आहे अशा प्रकाराची भावना जागृत ठेवणें हाच शाक्तयोग किंवा शक्तियोग असें म्हटले आहे. यात त्रिपुरसुंदरीचें ध्यान सांगितलें आहे.

तंत्रमार्गांत पुनर्जन्मतत्त्व अबाधितपणें मानण्यात येतें. केवळ परंपरा व अंधानुकरण या बाबी या मार्गांत नाहींत व पूर्वी हें तत्त्व मानिलें गेलें म्हणून तें मानावें असा त्या तंत्रमार्गाचा हव्यास पण नाहीं. एखाद्या देशाचा नकाशा जसा पुढें ठेवावा व त्यावरून मार्ग क्रमीत इष्ट स्थळीं जाण्याची रूपरेषा आखावी, त्याप्रमाणें साधना करणाऱ्या साधकासमोर साधनेचे क्रम मांडून त्या क्रमांकाप्रमाणें ह्या जन्मात जितके क्रमांक संपले, त्या पुढील क्रमांक आक्रमीत जाण्याकरिता पुढील जन्म आहे असें साधकास पटवून देण्यात येतें. पंढरपुरास जाण्यास निघालेला यात्रेकरू जसा मुक्काम करीत करीत शेवटीं पंढरपुरीस (षट्चक्र भेद करीत करीत सहस्रारचक्रातील पंढरपुरीस) जाऊन पोंचतो, तशी साधना करणारा साधक दरकूच दर मुक्काम करीत ह्या जन्मात मणिपूरचक्रातील विष्णुपदाला पोंचला तर पुढील जन्मात विष्णुपदापासून निघून अखंडैक्यरस परमशिवपदाला पोंचेल अशी साधकाची निष्ठा कायम करण्यात गुरूचा हातखंडा व्यवहार असतो. तंत्रमार्गांत समाजधर्म व साधनधर्म असे दोन भेद आहेत समाजधर्माप्रमाणें तंत्रमार्गांत जातीबंधनें व जन्मबंधनें मानितात. पण साधनधर्मांत जातिविशिष्टता अथवा पुरुष स्त्री अशी लिंगविशिष्टता मानीत नाहींत. लेखकास असें वाटतें कीं, वारकरी सांप्रदाय प्रवर्तकांनीं हीच प्रथा अमलात आणली असावी. तंत्रमार्गांत जशी उपासना तशी वारकरी सांप्रदायात भजन, कीर्तन व निरूपण ह्या गोष्टी होत. निरूपणाच्या वेळीं, भजनाच्या वेळीं, या नगर प्रदक्षिणेचे वेळीं, वारकरी सांप्रदायात

स्त्रिया शूद्र यात भेद नसतो. एकमेकाचें एकमेक पादवदन करितात, त्यावेळीं एखाद्या फडावरील मुख्य निरूपणकारही, पादवदन करावयाची व्यक्ति कोणीही असो, त्या व्यक्तीचे पादवंदन करण्यास कचरत नाहीं. पढरपूरच्या यात्रेंत ही गोष्ट प्रामुख्यानें दिसते.

## २. मत्र व त्यांतील शब्द

येथपर्यंत तत्रमार्गाची व्याप्ति कशी आहे हे वर्णन केलें. तत्रमार्ग दर्शविणारीं तत्रें व आगम या सर्वांत अनुस्यूत असणारें मत्रशास्त्र व तदगभूत यत्रें व मूर्ति याचेंकडे आता वळू मत्र आणि शास्त्र या शब्दाची व्याख्या पूर्वीं आलेली आहे म्हणून मत्राबद्दल विचार करिताना मत्रातील व मत्रशब्दसमूहातील शब्द व इतर शब्दसमूहातील शब्द यातील शब्दशक्तीचा फरक पाहणे आवश्यक आहे. मत्रघटित शब्दसमूहच इतर शब्द व शब्दसमूह यातील कार्य करण्याचें सामर्थ्य यात फरक आहे सामान्य शब्दसमूहाचे सामर्थ्य विशिष्ट प्रसगापुरतेंच असतें. उदाहरणार्थ, काहीं युद्धगीतें, युद्धप्रसगातील सेनानायकानें सैनिकात उत्साह वाढविण्याकरिता उच्चारिलेलीं वाक्यें, आप्तविरहप्रसगीं विरहीजनाचें सात्वन करण्याकरिता बोललेले उपदेशपर शब्द, इत्यादि शब्दसमूहातील सामर्थ्य अगर शक्ति क्षणिक परिणामकारक असते परतु *मत्रशब्दस्थित मत्रशक्ति निरतर टिकणारी असते.*

काहीं शब्दोचार असेहि आहेत कीं, त्याच्या उच्चाराबरोबर काहीं एक प्रकाराचा परिणाम श्रोत्याच्या मनावर नेहमीं होईल 'खडे रहो' असें म्हटल्यावर ऐकणारीं मनुष्यें उभीं राहतील. परतु या उदाहरणातसुद्धा श्रोत्याच्या मनोनुकूलतेची जरूर आहे व भाषा समजण्याचीही जरूरी आहे म्हणजे हे कार्य एकदेशीय होईल. परतु मत्रोच्चारित शब्दसमूहातील शक्ति अनन्यसाधारण आहे वृश्चिकाच्या मत्राची भाषा वृश्चिकदष्ट मनुष्यास अगर मात्रिकासही न समजो, अगर त्याचा त्या

वृश्चिकमंत्रावर विश्वासही नसो, अर्थात त्याची मनोनुकूलताही असो वा नसो, परतु मांत्रिकानें मंत्राचा उच्चार केल्याबरोबर वृश्चिकदष्ट मनुष्याची विषबाधा नष्ट होते ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. यावरून मंत्रातील अक्षरसमूहाच्या उच्चाराचा परिणाम चिरसिद्ध आहे असें दिसून येतें मंत्रोच्चार झाल्याबरोबर मंत्रशक्ति प्रकाशमय आहे असें दिसतें. मंत्रातील अक्षरसमूह अगर शब्दसमूह याचा कांहींच स्पष्ट अर्थ समजून येत असो वा नसो, परतु त्या मंत्रोच्चारापासून अतिमानुप शक्ति उत्पन्न होते, हे मात्र खास होय. या *अतिमानुप चिरसिद्ध शक्तीलाच आपण सिद्धि अगर चमत्कार म्हणतों.*

## ३. मंत्र-सिद्धि व चमत्कार

सिद्धि व चमत्कार होतात हे कांहीं अबाधित नियमानींच होतात. *आपणास ते नियम अज्ञात असतात, म्हणून आपण त्यास चमत्कार अगर सिद्धि म्हणतों.* पन्नास वर्षांपूर्वी आज अतराळातील विद्युत्शक्तीनें सिद्ध होणाऱ्या दूरश्रवण व दूरदर्शन ह्या गोष्टी चमत्कारातच गणल्या जात असत. व त्या अजूनही तशाच मानिल्या जातात. योगी मनोवहा नाडीच्या साहाय्यानें हृदयक्रिया अगर नाडीची गति वगैरे बंद करितात,[१] हाही आजच्या सृष्टिविज्ञान शास्त्रज्ञाना चमत्कार वाटतो. परतु योगी लोकाना ही एक सहजसाध्य क्रिया असते, व मनोवहा नाडीच्या साहाय्यानें ही क्रिया होते, म्हणून त्यास हा चमत्कार वाटत नाहीं आपल्या स्थूल सृष्टीच्या पलीकडे सूक्ष्म सृष्टि आहे, प्राण्याना स्थूल शरीराप्रमाणेंच सूक्ष्म शरीर आहे, याची सत्यता ज्याना पटली नाहीं,

---

१. आपल्या मनोवहा नाडीवर ताबा चालवून सर्कसवाले प्रो एकनाथमूर्ति किंवा ताराबाई ह्याच्या तळहातावर बदुकीनें गोळी मारली असताही ती शरारात न जाता चपटी होऊन खालीं पडे! हें दृश्य पाहिलेलें आहे. याचें नाव रक्त वाहिन्या बंद करण्याची सिद्धि!

त्याना सृष्टींतील सूक्ष्मदेहधारी जीवाकडून अगर देवाकडून जीं कार्ये होतात, तीं चमत्काररूप वाटतात. पुण्यातील आहिताग्नि वे. शा. स. राजवाडे याचेकडे रा. रा जोशी या आडनावाच्या मांत्रिकानें वीरमंत्राच्या साधनानें वीरदेवता प्रसन्न करून त्या देवतेकडून श्रीगुरुदत्त असे म्हटल्याबरोबर अगदीं गरम पेढे आणविले ही गोष्ट पुण्य-नगरांत सर्वश्रुत आहे. ही मंत्रसिद्धि व घटना इतरास चमत्कार वाटतात, परंतु त्या मांत्रिकास ही सहजसाध्य गोष्ट आहे असे वाटते.

## ४. मंत्रसिद्धि

मंत्रसिद्ध होण्यास म्हणजेच मंत्राची सिद्धि होण्यास त्या मंत्राचें पुरश्चरण केलें पाहिजे गायत्रीमंत्राच्या पुरश्चरणविधीचें एक स्वतंत्र पुस्तकच आहे, म्हणून त्याची पुनरुक्ति येथें नको. याशिवाय वैदिक मंत्राचें पुरश्चरण-विधान मागील स्तभात आलेलें आहे. तथापि आगमोक्त मंत्र व शाबर मंत्र याच्या पुरश्चरणाची विधानें प्रत्येक मंत्राकरिता निरनिराळीं सांगितलीं आहेत. तथापि सर्व मंत्राना लागू होणारें असें पुरश्चरणविधान देण्यात येत आहे तें असें—

प्रथम ब्रह्मकूर्चविधीनें[1] प्रायश्चित्त घेऊन पुरश्चरण सुरू करण्यापूर्वीं एक लक्ष प्रणवाचा जप करावा. तो असा, "प्रणवस्य ब्रह्माऋषि । गायत्रीच्छंद । परमात्मा देवता। सकलदोष निवारणार्थे सकलमंत्रसिद्ध्येच प्रणवस्यैकलक्ष जपे विनियोग ।" नंतर होम करून नंतर दहा हजार गायत्रीमंत्राचा जप करावा व्याहृतींसह गायत्री मंत्राच्या चतुर्विंशति अक्षरानंतर प्रणव

---

१. ब्रह्मकूर्च विधि ठराविक जातीचे व रंगाचे ठराविक सव्वेइतके दर्भ एक प्रकारचे विशेष कार्यासाठी योग्य अशीं घटक द्रव्यें असणारे घेऊन त्याचा जुडका किंवा कुंचा बांधून ठराविक मंत्र उच्चारून तयार केलेल्या पाण्याच्या मार्जनादि द्वारा उपयोग करणें यास ब्रह्मकूर्च विधि म्हणतात.

(गो. प्र भा )

म्हणावा. सामान्यत: सर्व ब्राह्मण गायत्रीमंत्र म्हणताना मंत्राच्या शेवटीं प्रणवाचा उच्चार करीत नाहीत, हे अयुक्त व अविधिपूर्वक जपाराधन होतें, पंचभूतात्मक देहातील पंचतत्त्वाचा म्हणजे पृथ्वीचा आपांत, आपाचा तेजांत, लय करून वासनामय पापपुरुषाचें कुंभकांत चिंतन करून, त्याचा लय करून रेचकानें तो वासनामय पापपुरुष बाहेर टाकावा. नंतर प्राणप्रतिष्ठा, अन्तर्मातृका, बहिर्मातृका न्यास करून षट्चक्रांतील देवताची मानसोपचार पूजा करावी. (षट्चक्राचे चित्र, देवता, बीजें, इत्यादि प्रकार पुढें परिशिष्टात अजपाजप विभागांत नमूद केलेली आहेत.) नंतर पुरुषसूक्त व श्रीसूक्त यांनीं अंगन्यास व करन्यास करावे, नंतर ज्या मंत्राचें पुरश्चरण करावयाचें तो मंत्र वीस अक्षरांपेक्षा कमी अक्षरांचा असल्यास त्या मंत्राच्या अक्षरागणिक एक हजार जप करावा, व वीस अक्षरांपेक्षा अधिक असल्यास दहा हजार जप करावा. "कलौ चतुर्गुण प्रोक्त" या न्यायानें त्या प्रत्येक मंत्राचा चौपट जप करावा. नंतर जो जप पूर्ण झाला, त्याचें दशांश हवन, तद्दशांश तर्पण व तद्दशांश मार्जन व त्याचे दशांश ब्राह्मणभोजन करावें. हवन दशांश करावयाचें त्याचें द्रव्य घृतमिश्रित तिलाचें असावें. ब्राह्मणभोजन करण्यास असमर्थ असल्यास मूळ जपाइतका जप करावा व पांच ब्राह्मणास भोजन घालावें. एवढें तरी करावेंच. इतक्यानें इष्टदेवता प्रसन्न होईल व इष्ट हेतु साध्य होईल. नच झाल्यास स्वमस्थांत होईल. नंतर पुन्हां इष्टमंत्राचे मागें व पुढें 'अ' उच्चार करून पुढें प्रत्येक मातृका घेऊन आ, इ, ई, इत्यादि १०८ जप करावा. अवश्य सिद्धि होईल. वैदिक मंत्राची सिद्धि प्राप्त करून घेण्याचा दुसरा विधि असा आहे – मंत्रपूर्वचर्यार्थानें प्रायश्चित्त घ्यावें. ग्राम्य पशूंचा शब्द ऐकू न येईल, अशा नदीकांठीं एका गावाबाहेर झोपडी करावी कुशाजिन, कुशाम्बर, कुशासन, कुशपवित्रीनी घेऊन गोदुग्धाहार करावा व गायत्रीमंत्राचा पांच लक्ष जप करावा. नंतर इष्ट मंत्राचा जप करावा. वैदिकमंत्र सिद्ध होईल. किंवा सूर्यग्रहणांत यथाक्रमानें गायत्रीचा जप

करावा व नतर दशाश हवन करावें अशा चार ग्रहणाचा जप पुरा झाला म्हणजे इष्टमत्राचा जप करावा, नतर इष्ट मत्राचा जप, होम, तर्पण व ब्राह्मणभोजन ही कार्ये झाली पाहिजेत. नतरच तो मत्र सिद्ध होईल. हे दोन्ही क्रम अनुभविक आहेत.

मत्र सिद्ध झाल्याची चिन्हें अशी आहेत. सुवासिनी, चद्र, सूर्य, गगानदी, युद्धात जय, गज, मयूर, हस, कमळें, दीप, अश्व, पुष्पें, पर्वत हे पदार्थ स्वप्नात दिसले तर मत्र सिद्ध झाला असें समजावें, तसेंच,

चित्तप्रसादो मनसश्च तुष्टिः अल्पाशिता स्वप्नपराङ्मुखत्वं ।
स्वप्नेषु यानाद्युपलंभनं तु सिद्धस्य चिन्हानि भवन्ति सद्यः ॥
—परशुराम कल्पसूत्रम्

जोतिः पश्यति सर्वत्र शरीरं वा प्रकाशयुक् ।
निजं शरीरमथवा देवतामयमेव हि । —भैरवी तत्र

मंत्राराधनसक्तस्य प्रथमं वासरत्रयम् ।
तृतीयवत्सराद्दूर्ध्वं राजानश्च महीभृतः ॥
प्रार्थयन्तेऽनुरोधेन गर्विता अपि मानिनः ।
नवमाद्वत्सराद्दूर्ध्वं स्वयं सिध्यति मंत्रराट् ॥
नानाश्चर्याणि हृदये मंत्रसिद्धिमयानिच ।
रात्रौ च दिवसा लोकं स सूर्यं क्षणमीक्षते ॥
पूर्णेंदुसदृशः कान्त्या गमने विहगोपमः ।
विष्णुत्रयोऽपि अल्पत्वं भवेन्निद्राजयस्तथा ॥
(नारदपचरात्र)

नाना प्रकारची गीतवाद्यें श्रवणेंद्रियास अनुभविता येतात. कापूर, कस्तुरी, केशरादिकाचे गध अनुभवास येतात व दुसऱ्यासही ते गध देता येतात. साधक तेजानें कातिमान व बलवान् होतो

सिद्धेस्तु त्रीणि चिन्हानि दाता भोक्ताद्य याचकः । (बौधायन)

देवा नित्यं नमोऽस्मै विदधति फणिनो नैव दंशन्ति पुत्राः।
सम्पन्नाः स्युः सपुत्रास्तनुविपदि परं धाम विष्णोः स भूयात्॥
(प्रपंचसार)

वरीलप्रमाणें मंत्रसिद्धि झाल्याचीं ५ चिन्हें थोडक्यांत वर्णन करण्यांत आलीं आहेत.

## ५. मंत्र-शक्ति

इतर वाक्यसमूह व मंत्रघटित शब्द यांमध्यें फरक असा आहे कीं, इतर वाक्यसमूहांतील शक्ति शब्दोच्चाराबरोबर उदय पावून आपलें कार्य करिते. तें कार्य संपलें कीं, ती शक्तिही अस्तंगत होते. मंत्रोच्चाराची अवस्था तशी नाहीं. *मंत्रोच्चाराची शक्ति नेहमी जागृत असते. ती अस्तंगत होत नाहीं, ती क्षयहीन व अविनाशी आहे.* जड आणि चैतन्य, जीव आणि ब्रह्म यांमध्यें जसा फरक आहे, तसाच फरक इतर शब्दसमूह व मंत्रघटित शब्दसमूह यांमध्यें आहे. *ज्याच्या मननानें चतुर्विध पुरुषार्थ साध्य होतात व त्रिविध पातकें नाश पावतात तो मंत्र असें गायत्री तंत्रांत सांगितलें आहे.*

वस्तुतंत्र गुणधर्मांचें प्रकटीकरण जिच्या योगानें होतें ती शक्ति होय. वस्तुतः शक्ति या शब्दानें मनुष्याच्या मनावर काय परिणाम होतो, अगर शक्ति म्हणजे काय या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न करूं लागल्यास शक्तीचे परिणाम काय होतात ही गोष्ट मानवी बुद्धि सांगेल. परंतु शक्ति म्हणजे काय, शक्ति या पदार्थानें व्यक्त होणाऱ्या व्यापारांची मीमांसा काय हें सांगतां येणार नाहीं. चंद्रप्रकाशानें समुद्रांतील पाणी आकर्षण केलें जातें ही चंद्रप्रकाशाची शक्ति होय. समुद्राच्या लाटांमुळें मोठमोठीं जहाजें बुडून जातात. अगर किनाऱ्यावर फेकलीं जातात. भूकंप होऊन शहरेंचीं शहरें नाश पावतात व पृथ्वीवरील समुद्राचे जागीं जमीन व जमिनीचे जागीं समुद्र उत्पन्न होतात. या प्रकारचीं स्थित्यंतरें होणें

हें त्या शक्तीचे परिणाम होत. या परिणामावरून शक्तीची कल्पना येते. ही गोष्ट स्थूल सृष्टीबद्दल जशी अनुभवास येते, तशीच सूक्ष्म सृष्टि म्हणजे विद्युत्, या पदार्थाचे परिणाम दृश्य व अदृश्य पदार्थांवर होतात. यावरून विद्युत्मध्ये असलेल्या आकर्षणास विद्युदाकर्षणशक्ति म्हणता येतें. या दृश्य पदार्थास सत् या श्रेणींत घालितां येईल. परंतु चेतन पदार्थांवर, म्हणजे चैतन्ययुक्त स्थूल देहधारी प्राणी व सूक्ष्म देहधारी प्राणी यांचेवर आकर्षण होण्यास चैतन्यरूपी श्रेणीचाच आश्रय केला पाहिजे. चैतन्य कोटींतील प्राण्याच्या ठिकाणीं ज्ञानाचा समावेश असतो. सृष्टजड पदार्थांतील आकर्षण जसें आपल्या प्रत्ययास येतें, तसें सृष्टचैतन्य पदार्थांतील गूढ असलेलें आकर्षणही आपल्या प्रत्ययास येतें. जसें एखाद्या लांडग्यानें एखाद्या शेळीला स्पर्श केला तर लांडग्याच्या अंगीं असलेल्या आकर्षणानें ती शेळी लांडग्याकडे आकर्षिली जाते. असें झालें म्हणजे व्यवहारांतील 'हुरळली शेळी व लागली लांडग्याचे पाठीस' या म्हणीप्रमाणे चैतन्ययुक्त प्राण्यांतील आकर्षण शक्ति आपल्या अनुभवास येते. अजगर नामक प्राण्याचे ठायीं अशीच आकर्षणशक्ति असते. एकदा एक मनुष्य झाडावर चढलेला होता व त्या झाडाखालीं एक अजगर वेटाळे घालून त्या मनुष्याकडे पहात बसला. तेव्हा त्या अजगराच्या दृष्टिपाताच्या ठायीं आकर्षण-सामर्थ्य होतें असे आढळून आलें. कारण त्या झाडापलीकडील दुसऱ्या झाडावर दुसरे लोक चढून त्या अडकलेल्या मनुष्यास दुसऱ्या झाडावर घेण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु तो म्हणे, मला त्या झाडावरून हालण्याची इच्छाच होत नाहीं. नंतर बरेच लोकांनी जमाव करून त्या अजगरास ठार मारलें, तेव्हा झाडावरील मनुष्य खालीं आला व बचावला. असेंच पूर्व संस्कारानीं प्राप्त झालेलें आकर्षण-सामर्थ्य एखाद्या मनुष्याच्या अंगीं जन्मसिद्धच असते किंवा मंत्रशक्तीनें प्राप्त होते. एका फकीरानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें एका युरोपियन अधिकाऱ्याच्या

वायकोस आपले पाठीमागें हिंदण्यास लावले होतें. असे अनेक प्रकार घ्योत्पत्तीस येतात.

अशाच प्रकारच्या मंत्रसामर्थ्यानें अदृश्य जीव म्हणजे भूतें अगर वीर, गंधर्व, वेताळ यास आपले आज्ञाधारक बनविता येतें. दक्षिण हैद्राबादेतील एक मांत्रिक कै. वा. गंगाधरशास्त्री तोरो, यांनी सोलापूर येथे आपल्या मुलाच्या लग्नात पंचवीस पुणेरी पगड्या आणविल्या व लग्नातील वऱ्हाडी मंडळींस दिल्या. *त्या पगडया कशा आल्या असे विचारिता* त्यांनी सांगितलें कीं, मंत्रसामर्थ्यानें प्रसन्न झालेली देवता हें कार्य घडवून आणते. गोळीगुडा (हैद्राबाद) येथील रामकृष्णपंत बाबासाहेब रजतकर, हेही असेंच एक उदाहरण आहे. याप्रमाणें मुंजा व वेताळ यांच्या साधनानेंही अशा गोष्टी साध्य होतात. अशाच मंत्रसामर्थ्यानें देवताप्रसादही होतो. लेखकाचे माहितींत असे दोन गृहस्थ आहेत कीं, त्यांनी मंत्रसामर्थ्यानें वेताळ, वीर हनूमंत यांची प्रीति संपादन केली. वेताळ देवतेने पाहिजे तेथील जड वस्तू आणून दिल्या. वीर हनुमंतानी भक्ताला वायुगति दिली. रोगहरण करण्याचें सामर्थ्य दिलें. एका साधकास श्रीरामरायाचें दर्शन करवून दिलें. असें जें *आकर्षणसामर्थ्य तीच मंत्रशक्ति होय.*

अशा मंत्रशक्तीचे वाच्यशक्ति आणि वाचकशक्ति असे दोन भेद आहेत. मंत्राची प्रतिपाद्य देवता म्हणजे मंत्ररूप देवता ही वाच्यशक्ति होय व मंत्रानीं वर्णन केलेली देवता म्हणजे मूर्तिमयी देवता ही वाचकशक्ति होय. मंत्रमयी देवता हीच दुर्गा मंत्राची निर्गुणरूप अधिष्ठात्री देवता दुर्गा होय व दुर्गामूर्ति ही दुर्गामंत्राची वाचकशक्ति देवता होय. विष्णु सहस्रनामांत परमात्मा श्रीकृष्ण ही प्रतिपाद्य वाच्य देवता व देवकीनंदन ही अधिष्ठात्री वाचक व मूर्त देवता होय. पुष्पांत जसें *बीज गूढरूपानें वास्तव्य करतें ("द्विधा दैवतयोरपि न भेदलेशोऽस्ति* वेद्-वेदकयो ") बीजांत जसें फळ गूढरूपानें वास करितें तशी

वाचकशक्तींत वाच्यशक्ति गूढरूपानें राहते "वाच्यवाचकभेदेन भवान् एव जगन्मय" असें अध्यात्मरामायणात वाच्यवाचक शक्तीचें रूप वर्णन केलें आहे. आतां वाचकशक्ति म्हणजे सगुणरूप होय. त्याची पूजा केल्याशिवाय वाच्यशक्तीचें म्हणजे निर्गुणस्वरूपाचें अनुभविक ज्ञान होणार नाहीं. वाच्यशक्ति हा मंत्राचा प्राण आहे. परंतु *वाचकशक्तीची साधना केल्याखेरीज मंत्रांतील प्राण जागृत होणार नाहीं* व *मंत्रसिद्धी होणार नाही.* वाचकशक्तीच्या ध्यानावाहनादि *पूजाप्रकारांशिवाय मंत्रात चैतन्य प्रगट होणार नाही,* म्हणजे तो मंत्र जागृत होणार नाहीं (कोल्हापूरपासून २० मैलावर 'बाहुबली' चा उंच पुतळा बसवून प्राणप्रतिष्ठादि होत असताना २०–१०–१९६६ पासून सतत तीन आठवडे दुपारीं आकाशातून केशरमिश्रित चंदनाचा अभिषेक होत असे. हें दृश्य शेंकडों लोकांनीं पाहिल्याचें प्रसिद्ध झालें होतें ! हा चमत्कारच नसून मंत्रशक्त्योद्भूत ईश्वरी शक्ति जागृत असल्याचें प्रात्यक्षिक आहे. विज्ञानवाद्यांना याचें उत्तर देणें जड. गो प्र भा) *सुप्त मंत्राच्या साधनानें म्हणजे केवळ मंत्रपठणानें साधनसिद्धि प्राप्त होण्याची आशा करणें म्हणजे मृत बालकाला अंकावर घेऊन त्याच्याकडून हास्य-सल्लापादि* सुख प्राप्त करून घेण्याची आशा करण्यासारखें खपुष्पवत् *निरर्थक* होय.

## ६. मंत्रयोग

मंत्र व मंत्रशक्ति या दोन भागाबद्दल निवेचन झाल्यावर योग म्हणजे मंत्रशास्त्रातील मंत्रयोगाचें वर्णन करणें ही गोष्ट क्रमप्राप्तच आहे

या ठिकाणीं वस्तुत तांत्रिक दृष्टीनें योगाचे जे भाग पडतात त्याबद्दल वर्णन करावयाचें आहे मंत्रशास्त्रातील मंत्रयोगसाधनेकरिता प्रतीकोपासना *मूलाधार घेतल्यामुळें या योगात प्रतीकाच्या ठायीं आत्मशक्तीचा न्यास* करून, म्हणजे आपल्या सहस्रारचक्रात वसत असलेल्या परमात्मतत्त्वाचें ध्यान करून, प्रतीकाच्या म्हणजे इष्टदेवतेच्या चर अगर स्थापित

मूर्तीच्या ठायीं पूजाकाल पूर्णपणें संपेपर्यंत त्या आमकलारूप ध्यानगतमूर्तीचा प्रवेश झालेला आहे. अशी भावना करून त्या प्रतीकाची षोडशोपचार अगर द्वात्रिंशदुपचारपूर्वक पूजा करावी लागते.

ह्या योगाचे प्रकार दोन आहेत '—एक शक्त्युपाययोग व दुसरा शाम्भवोपाययोग. शक्त्युपाय योगात इष्टदेवतेचीं प्रतीकें व भावना या गोष्टी प्रामुख्यानें येतात. शाम्भवोपाय योगात शक्तीची मनोमय भावना प्रत्यक्षतेंत आणावयाची असते. परंतु त्या साधनात आकाराचा अवलंब केला नसल्यानें शक्तिद्योतक देवतेची प्रत्यक्षता होत नाहीं व त्यामुळें साधक नेहमीं आपण कोणत्या भूमिकेवर आहों याबद्दल संशयग्रस्तच असतो. म्हणून प्रथमतः शक्त्योपाय योगाचें अवलंबन करावें व नंतर शाम्भवोपाय योगाकडे धाव घेतली तरच साधक मायाबंधनापासून मुक्त होईल अशी मंत्रशास्त्रात ग्वाही दिलेली आहे.

आणवादि मलाचा आत्मज्ञानानें नाश करून चैतन्य म्हणजे प्रकाशरूप असा जो परशिव त्याची प्राप्ति होते. यात प्रकाशरूपचाच विशेष संबंध असल्यानें त्यास शाम्भवयोग किंवा शाम्भवोपाययोग असें म्हटलें आहे. हा परशिव त्रिपुरसुंदरीयुक्त आहे ध्यानाकरिता व्यक्तता असली पाहिजे, परंतु त्रिपुरसुंदरीरूपानें व्यक्तता आली तरी परशिवाचें वैशिष्ट्य असल्यानें यात प्रकाशरूप परशिवाचें ध्यानच सांगितलें आहे.

शक्ति म्हणजे पराशक्ति. पूर्णहिंता विश्वस्फुरण करणारी पराशक्ति ती हीच, मंत्रवीर्याला प्रगट करिते अशी सत्ता ती हीच. या योगात त्रिपुरसुंदरी मंत्राचें विशेपत्व मुख्य आहे व मी त्रिपुरसुंदरीरूप आहें अशी भावना दृढ केल्यानें हें जगत् त्रिपुरसुंदरीरूप आहे, म्हणजे आरशात ज्याप्रमाणें नाना प्रकारचीं चित्रें दाखविलीं तरी तीं चित्रें आरशावर कांहींच परिणाम करीत नाहींत, त्याप्रमाणें हें जगत् त्रिपुरसुंदरीरूप आरशातील चित्राप्रमाणें परशिवाच्या प्रकाशरूपावर चित्रित झालें तरी परमशिवाचा कांहींच परिणाम न होतां तो जसा प्रकाशरूपच असतो तसें हें जगत्

परशिवाच्या प्रकाशात दृश्य होते म्हणजे परशिवरूपच आहे, म्हणजे त्रिपुरसुंदरीरूपच आहे, अशी प्रकाश भावना जागृत ठेवणे हाच शक्तियोग किंवा शक्त्युपाययोग होय असें म्हटलें आहे. यात त्रिपुरसुंदरीचें ध्यान सांगितलें आहे

ही शक्त्योपाययोगसाधना म्हणजे प्रतीकोपासना मंत्रशास्त्रात नव्यानेंच आली आहे असे नाहीं आरण्यकालीन ऋषींनी प्रतीकोपासनेचा मार्ग प्रचारात आणला व नंतर तंत्रशास्त्रकालात ह्या उपासनेवर अधिक भर देण्यात येऊन त्या उपासनेच्या संबधानें विविध प्रकार, विविध विधि, व विविध उपचार यांचे एक निराळे 'प्रतीकोत्सव विधान' म्हणून शास्त्रच बनलें,गेलें.

## ७. प्रतीकोपासना व तिचें पूर्वकालीनत्व

मंत्र व यंत्रें यांचेबद्दल विवेचन झालें. 'मंत्रदेवतयो अभेद ' असें जें म्हटलें आहे त्यात देवता म्हणजे देवतामूर्ति यांचेबद्दलही विवरण करणे आवश्यक आहे देवतामूर्ति व देवालयें ही बुद्धधर्म आर्यावर्तांत उदय पावल्यानंतर झाली असा सार्वत्रिक समज आहे व इतिहासतज्ञाचा निश्चयपूर्वक सिद्धांत आहे. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. आगम व तंत्रें हीं वेद व उपनिषद् यांच्याबरोबरच उदयास आलीं असें वर दाखविलें आहे. तसेच भारतीय युद्ध संपल्यानंतर कलियुग सुरू झालें व त्या कलियुगांतील मानवांच्या उद्धारकरितां आगम व तंत्रें विशेषत प्रामुख्यानें पुढें आणिलीं गेलीं. कारण भारतीय युद्धाच्या वेळीं वर्णाश्रमधर्मविहीन इतर देशांतील लोक युद्धप्रसंगीं आले त्यांचे अवशेष आर्यावर्तांतच कायम वस्ती करून राहिले. त्यांच्या पारमार्थिक उन्नतीकरिता आगमाचा उपयोग करण्यात आला असे पूर्वी वर्णन आलेलेंच आहे आगम ग्रंथात मंदिरें कशीं बांधावीं यांचे वर्णन आहे श्रीकृष्णावतारांत श्रीकृष्णांनीं श्रीरुक्मिणीला दिलें पाठविलेल्या प्रणयपत्रिकेवरून ती कुलाचाराप्रमाणें कुलदेवीच्या दर्शनास

आली असता, तिचे हरण केलें असे श्रीमद्भागवतग्रंथात सांगितलें आहे. त्यावरून त्या काळीं देवींचीं मंदिरें होतीं असें सिद्ध होतें. व तसेच श्रीसुभद्रा अभिमन्यूला घेऊन द्वारकेस जात असताना वाटेंत राक्षसाशीं युद्ध करण्याच्या प्रसंगीं अपजय होत आहे असें दिसून येताच तिनें श्रीदुर्गेची प्रार्थना केल्याचा उल्लेख आहे. श्रीरामरायांनीं सेतुबंधनाच्या वेळीं श्रीरामेश्वराची स्थापना केली असा रामायणाचा इतिहास सांगतो. कलियुगारंभीं म्हणजे भारतीय युद्ध समाप्त झाल्यानंतर व श्रीकृष्णाची अवतारसमाप्ति झाल्यानंर तंत्र व आगमकालांत श्रीदुर्गा, गणेश, महेश, विष्णु व सूर्य या देवतांचीं आयतनें असत. द्वापारयुगांतही देवतायनें होतीं व देवतांची पूजा रूढ होती याचे गमक "द्वापरे परिचर्या च" या वचनावरून सिद्ध होत आहे. तसेच "कृतेयद्ध्यायते विष्णु" या वाक्यावरून श्री विष्णूचें ध्यान मूर्तिशिवाय होणार नाहीं. यावरून मूर्तिपूजा, मूर्तिध्यान ह्या गोष्टी होत्याच.

प्रतीकें, प्रतिमा व मूर्ति यांची पूजा वेदकालापासून चालू आहे. वेदकाळीं अग्निपूजा विशेषत्वानें ब्राह्मणवर्णात असे. परंतु त्या त्या काळीं केवळ ब्राह्मणवर्णच अस्तित्वात होता हे म्हणणें केवळ आग्रहाचें आहे. समाजात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या जाति व हे वर्ण होतेच. तेव्हा ब्राह्मणवर्णाशिवाय इतर वर्णांच्या पारमार्थिक उन्नतीकरिता तंत्रागमाचा प्रचार असेच. हें 'वेदागमानाचार प्रथम परिकल्पते' या वाक्यावरून स्पष्ट दिसून येतें. तसेच ऋग्वेदान्तर्गत रुद्राध्यायातील "या ते रुद्रशिवा तनूरघोरापापकाशिनी" "यामिषुं गिरिशन्त हस्ते बिभर्ष्यस्तवे" "विज्यं धनुः कपर्दिनो विशल्यो बाणवाँ उत" इत्यादि वचनावरून हस्तांनी बाण धरणें ही क्रिया शिवाची मूर्ति असल्याशिवाय शक्य नाहीं. "द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च। उभय वा एतत्प्रजापतिः, परिमितश्चापरिमितश्च" ब्रह्माचीं रूपें दोन—एक मूर्त व एक अमूर्त. "उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना" या वाक्यानें रूपकल्पना ब्रह्मानें केलेली, उपासकानें केलेली

नव्हे, म्हणजे उपासकाच्या सोईकरिता ब्रह्मानें निरनिराळीं रूपें धारण केलीं 'आयो धर्मणि प्रथम ससादत ततो वपूंषि कृणुते पुरूणि' (अथर्ववेद) 'नम फिङ्ग् शिलाय च' या रुद्रोक्त वचनावरून व एह्यश्मानमतिष्ठाश्मा भवतु ते तनु (अथर्व) या वचनाचा असा अर्थ आहे कीं, परमेश्वर सृष्ट्यारंभीं धर्मस्थापनेकरिता निरनिराळीं 'वपूंषि' शरीरें धारण करिता झाला. व हे परमात्मन् ह्या पाषाणमय मूर्तींत तू प्रवेश कर.

मूर्तिपूजा पूर्वकालापासून अमलात आहे हें दर्शित करणारी खालील वचनेंही देण्यात येत आहेत.

देवतानां हरादीनां पुष्पादिनार्चनं । (गोविंदराज)
अतः प्रतिमास्वेवैतत्पूजनविधानम् । (मेघातिथि)
देवतानामर्चनं पुष्पाद्यैः । (सर्वज्ञनारायण)
प्रतिमादिषु हरिहरादिदेवपूजनम् । (कुल्लूक)
यद्यार्चावानश्येद्वा प्रपतेत प्रभज्येद्वा सहसेद्वा प्रचलेद्वा ।
(ऐतरेय ब्राह्मण)

'देवतायतनानि कम्पन्ते, देवप्रतिमा हसन्ति, रुदन्ति, स्विद्यन्त्युन्मीलयन्ति ।' (षड्विंश ब्राह्मण-सामवेद) ह्या प्रमाणानीं वेदकालापासून देवतागारें, देवतायतनें व मूर्तिपूजा याचा उपक्रम होता, हें सिद्ध होते. मन्त्रसिद्धीकरिता मन्त्राच्या अंगापैकीं मन्त्रनिदर्शित देवताचीं ध्यानें हे मुख्य अंग सांगितलें आहे. मन्त्राचीं मुख्य अंगें ऋषि, छंद, देवता, विनियोग, न्यास, ध्यान, जप, होम, इत्यादि आहेत. त्यापैकीं आधुनिक काळात मूर्तिपूजा वैदिक कीं अवैदिक याबद्दल बराच ऊहापोह होत असल्यानें मूर्तिपूजा व देवतायतनें हीं वेदकालापासून प्रचलित आहेत हें सिद्ध करण्याकरिता त्याबद्दल इतकें विस्तारानें लिहिणें आवश्यक झालें, प्रतिमेमध्यें देवतासन्निधि कशी असते त्याबद्दल श्लोक खालीं देण्यात येत आहे.

गवां सर्वांगजं क्षीरं स्रवते स्तनपुटात् यथा ।
अभिरूप्याद्य विंबस्य पूजायाश्च विशेषत. ॥

तथा सर्वगतो देवः प्रतिमादिषु राजते ।
साधकस्य च विश्वासात् देवतासन्निधिर्भवेत् ॥
गवां सर्पिः शरीरस्थं न करोत्यंगपोषणम् ।
निसृतं कर्मसंयुक्तं पुनस्तासांतदौषधम् ॥
एवं सहि शरीरस्थ सर्पिवत् परमेश्वरः ।
विनाचोपासनादेव न करोति हितं नृपु ॥

## ८. मंत्रांचे प्रकार व उपयोग

आता मंत्राच्या जातीचा म्हणजे प्रकाराचा विचार कर्तव्य आहे मंत्र तीन प्रकारचे आहेत. [1]बीजमंत्र, मूळमंत्र व मालामंत्र असे ते प्रकार होत. वेदग्रंथात वेदाच्या आरंभीं असलेल्या स्वरानीं 'ऐं' बीज तयार झालें. ऋग्वेदाचा आरंभ 'अग्निमीडे' या मंत्रानें होतो, त्या ऋचेंतील 'अ' हा स्वर घ्यावा. नंतर यजुर्वेदातील 'ईषेत्वोर्जेत्वा' या ऋचेतील 'ई' हा स्वर घ्यावा व सामवेदातील अग्न आयाहि या पहिल्या ऋचेतील 'अ' हा स्वर घ्यावा व अथर्वणवेदातील पहिली ऋचा 'शन्नो देवीरभिष्टय' या ऋचेंतील अनुस्वार घ्यावा याप्रमाणें अ+इ+अ अनुस्वार या प्रमाणे 'ऐं' बीज

---

१. समष्टि प्रकृतीच्या द्वितीय स्पंदनातून भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें अष्टधा प्रकृति उत्पन्न झाली तीमधून तदनुरूप अशीं अष्ट बीजें उत्पन्न झालीं. मंत्र शास्त्रीय ग्रंथात त्याचें वर्णन पुढें दिल्याप्रमाणें आहे. 'बीजमन्त्रय पूर्वे ततोऽष्टौ परिकीर्तित गुरुबीज शक्तिबीज रमाबीजं ततोभवेत ॥ १ ॥ कामबीज योगबीज तेजोबीजमथापरे । शांतिबीजं च रक्षा च प्रोक्ता चैषा प्रधानता ॥ २ ॥ भावार्थ–प्रथमचे तीन बीजमंत्र व नंतर आठ बीजमंत्र उत्पन्न झाले ते असे : (१) गुरुबीज · आ, ए, व मकार मिळून गुरुबीज. (२) शक्ति बीज हकार, रकार, ईकार, व मकार मिळून शक्तिबीज. (३) रमाबीज शकार, रकार, ईकार व मकार मिळून रमा बीज. (४) कामबीज क, ल, ई व मकार मिळून कामबीज. (५) योगबीज क, ए, ई व मकार मिळून योग बीज. (६) तेजो बीज टकार, रकार, ईकार व मकार मिळून तेजोबीज (७) शांतिबीज सकार,

तयार होतें. तसेच "यदीं शृणोति अलकं श्रृणोति। नहि प्रवेद सुकृतस्य पथा।" (ऋग्वेद) या ऋचेंत 'ई' हा स्वर व लकार व ककार रहित अ हा स्वर मिळविला तर 'ऐं' बीज होतें असा ऋग्वेदात ऐं बीजाचा उद्धार सांगितला आहे. याप्रमाणे ॐ, ईं, क्लीं, ब्लूं असे चार बीजमंत्र वेदात सांगितलेले आहेत. बाकीचे बीजमंत्र उपनिषद् भागात आलेले आहेत. मंत्रशास्त्राचा जणू काय आत्मा असा जो अथर्वण वेद आहे, त्यामध्येही अनेक बीजमंत्र व मूलमंत्राचे उद्धार दिलेले आहेत. श्री. गणपति अथर्वशीर्षांत 'गं' या एकाक्षरी गणेशमंत्राचा "ॐ गं ॐ" असा उद्धार दिलेला आहे व श्री. देव्यथर्वशीर्षांत "कामो योनिः कमला वज्रपाणिर्गुहा हसा मातरिश्वाभ्रमिंद्र पुनर्गुहा सकला मायया पृथकूचैपा विश्वमातादिविद्यों।" असा श्रीविद्या मंत्राचा उद्धार दिलेला आहे.

या ऋचेंत "वियदीकारसयुक्तं वीतिहोत्रसमन्वितं अर्धेंदुलसितं देव्या बीजं सर्वार्थसाधकं" असा 'ह्रीं' बीजाचा उद्धार दिलेला आहे. तसाच 'वाङ्मायाब्रह्मभूस्तस्मात् षष्ठं वक्त्रसमन्वितं सूर्योंवाम श्रोत्रबिंदु संयुक्तष्टात् 'त्रितीयकः नारायणेन संमिश्रो वायुश्चाधरयुक्तः विच्चे नवार्णकोणस्यात्'

---

तकार, रकार, ईकार व मकार मिळून त्रातीबीज. (८) रक्षाबीज : क्षकार, लकार, ईकार व मकार मिळून रक्षाबीज. प्रत्येक बीजात ईकार व मकार हीं दोन बीजें आहेतच हें लक्षात ठेवावें (मंत्रकल्पद्रुम–गो. प्र. भा.)

याशिवाय उपासनाभेदानें वरील बीजमंत्राशिवाय कृष्णबीज, रामबीज, शिवबीज, गणपतीबीज, इत्यादि निरनिराळे बीजमंत्र आहेत. तसेच कांहीं मंत्र बीज शाखा व पल्लव यांनीं संपुटित झालेले असतात. तशा संपुटित मंत्राचा प्रभाव मोठा असून त्याचें फलही प्रभावी असतें. जास्त माहिती ग्रंथाच्या उत्तरार्धांत येणारच आहे तथापि एक उदाहरणानें स्पष्ट करणें बरें : "ॐ ह्रीं कृष्णाय नमः या मंत्रात 'ॐ' हा प्रणव, 'ह्रीं' हें बीज व 'कृष्णाय' हा शब्द 'शाखा' आणि 'नमः' हा शब्द पल्लव आहे. या संपुटीकरणानें मंत्राचें मोठें गूढ रहस्य भरलेलें आहे. (गो. प्र. भा.)

या वाक्यानें नवार्णमंत्राचा म्हणजे 'ऐं ऱ्हीं क्लीं चामुंडायै विच्चे' या मंत्राचा उद्धार दिलेला आहे. "चमु वियदादिरूपा सेना रातीति लातीति चामुंडा" अथवा, "चमु अदने चामु अदनीय पदार्थान् डाति लातीति" "चाना मुंडमिव स्थिता, चाना बुद्धीना मुंडमिव स्थिता चामुंडा." "विद्या मोचयित्री विच्चा–नामक देवी नाम–कर्नाटकभाषाया" 'वित् ज्ञान च आनंद' इ ईश्वरत्व ज्ञान व आनंद याचें ईश्वरत्व जिचे ठायीं आहे ती 'विच्चा' होय या शिवाय भगवतीच्या चक्रदेवतामध्ये "अमोघा चैव विच्चा च तथा च भगमालिनी" अशा प्रकारचा 'विच्चा' शब्दाचा अर्थ आहे त्या शब्दाचें संबोधन रूप 'विच्चे' असें होतें असा नवार्ण मंत्राचा उद्धार सांगितला आहे यांप्रमाणे नारसिंहमंत्र, नृसिंहतापनी उपनिषदात व राममंत्र रामतापनी उपनिषदात सांगितला आहे व अशा अनेक उपनिषदामध्यें निरनिराळ्या देवतांचे मंत्र व त्यांचे उद्धार दिलेले आहेत या ठिकाणीं *उद्धार म्हणजे तो मंत्र कसा तयार होतो याचें विवेचन होय.* अशा मंत्रपरिभाषेनें तयार झालेल्या मंत्राचा विनियोगही त्या त्या उपनिषदातून दिलेला आहे तसेंच उपनिषदात ॐकार या बीजाचा एक कोटि जप केला तर ज्ञानप्राप्ती होते असें सांगितलेलें आहे शिवाय यज्ञीय क्रियेमध्यें ती क्रिया बरोबर झाली याबद्दल प्रतिवचन देण्याकडे ॐकाराचा उपयोग होतो या शिवाय इतर सर्व मंत्र आगम, यामल, तंत्र इत्यादि ग्रंथात दिलेले आहेत

आगमोक्त सर्व बीजाचा व बीजमंत्राचा अर्थ लौकिकी व्याकरणज्ञाना *करणें कठीण पडत तथापि श्रीशिवाना आपल्या अधिकारचरणीनें बीजाचा* अर्थ कसा करावा हें समजण्याकरिता 'बीजकोष' व 'वर्णकोष' केलेले आहेत त्यावरून त्या बीजाचा विनियोग निरनिराळी फलसिद्धि साध्य करण्याकडे कसा होतो हही त्यांनी सांगितलेलें आहे तथापि *इष्टफलप्राप्ती होण्यास ते बीजमंत्र गुरूपदिष्ट मार्गानेंच प्राप्त झाले पाहिजेत. केवळ ग्रंथाध्ययनानें किंवा पुस्तकावरून जप केल्यास त्या बीजमंत्राची सिद्धि*

*होणार नाही. बीजमंत्र, मूलमंत्र अगर मालामंत्र यांतील शक्ति गुरूंनीं जागृत केलेली असते, अगर परंपरेनें गुरूस ती प्राप्त झालेली असते.* त्यामुळें गुरूनीं उपदेश केल्याबरोबर त्यांनीं जागृत केलेल्या मंत्रशक्तीचा प्रादुर्भाव शिष्याचे ठायीं झालेला दिसून येतो.

निरनिराळे बीजमंत्र निरनिराळ्या देवतांचे साध्य मंत्र असतात. 'ग ऱ्हीं श्रीं क्लीं दु हू' हीं गणेश, माया, लक्ष्मी, काली, दुर्गा, एकाक्षरी छिन्नमस्ता व 'धू' धूमावती या देवतांचीं बीजें आहेत. 'हुफट्' याच्या योगानें मंत्राचें रक्षण होतें. 'स्वाहा स्वधा' हे पल्लव होत. मंत्राच्या शेवटीं 'वषट्' पद असलें तर वश्यता सिद्धि होते व 'फट्' हें पद असलें तर शत्रूचें उच्चाटन होतें. हु बीज द्वेष दाखविणारें, 'खें' बीज मारण प्रयोगात 'स्वाहा' संतुष्टता संपादनाकरिता, नम पदपुष्टी संपादनास व 'वौषट्' संपत्ति मिळण्याकरिता मंत्राचे शेवटीं योजितात. ही गोष्ट खालीं दिलेल्या वचनानें सिद्ध होते.

**'वषट् वश्ये फडुच्चाटे हुं द्वेषे खें च मारणे ।**
**स्वाहा तुष्टयै नमः पुष्टयै वौषट् संपत्तिहेतवे' ॥**

सोरमंत्र हे पुमान् मंत्र होत. सोममंत्र हे स्त्रीमंत्र होत. आणि दोन्हींचे समवायी मंत्र हे नपुंसक मंत्र होत. याप्रमाणे मंत्राचे तीन भेद आहेत. 'हुफट्' हे शब्द शेवटीं असतील ते पुमान्मंत्र होत. 'स्वाहा' 'स्वधा' हे शब्द ज्या मंत्राच्या शेवटीं असतील ते स्त्रीमंत्र होत व 'नम ' ज्या मंत्राच्या शेवटी असेल ते नपुंसक मंत्र होत. याचें विशेष स्पष्टीकरण पुढील श्लोकात दिलेलें आहे.

**वषडन्ताः फडन्ताश्च पुमांसो मनवः स्मृताः ।**
**वौषट् स्वाहान्तिका नार्यो हुं नमोन्ता नपुंसकाः ॥**
**वश्योच्चाटनरोधेषु पुमांसः सिद्धिदायकाः ।**
**क्षुद्रकर्मरुजां नाशे स्त्रीमंत्राः शीघ्रसिद्धिदाः ॥**
**अभिचारे स्मृताः क्लीबा, एवं ते मनवः स्मृताः ।**

मंत्रापैकीं पुमान् मंत्राचा विनियोग वश्यकर्म, उच्चाटन कर्म, रोधन कर्म, या कर्मांकडे होतो. स्त्रीमंत्राचा विनियोग रोगशांती करण्याकडे होतो, व क्लीब मंत्राचा विनियोग अभिचार कर्माकडे होतो. मंत्रातील अक्षर-संख्येप्रमाणे बीजमंत्र, पिंडमंत्र, कर्तरिमंत्र, असे मंत्राचे दुसरे भेद आहेत, असे नित्यातंत्रात सांगितले आहे. बाल्यावस्थेंत बीजमंत्राचे पुरश्चरण करावें तारुण्यात पिंडमंत्र, कर्तरिमंत्र, अगर मूलमंत्र याचे पुरश्चरण करावें व वृद्धावस्थेंत मालामंत्राचा जप करावा म्हणजे त्या मंत्राची सिद्धि होते *दशार्ण म्हणजे दहा अक्षरापर्यंतचे मंत्र मूलमंत्र किंवा बीजमंत्र होत, वीस अक्षराचे पिंडमंत्र किंवा कर्तरीमंत्र व वीसापेक्षा अधिक अक्षरें असलेले मालामंत्र होत.*

**मायाबीजं ब्राह्मण' स्यात् श्रीबीज क्षत्रियः स्मृतम् । ॥**
**कामबीज भवेत् वैश्य' वाग्भवं शूद्र ईरितम् ॥**
**चतुर्बीजैः परित्यक्तो मंत्र पौलस्त्यसंज्ञकः ॥**
**चतुर्बीज ब्राह्मणाना क्षत्रियाणा त्रिबीजक ॥**
**बीजद्वयं तु वैश्यानां शूद्राणा त्वेकबीजकं ॥**

*वरील श्लोकात बीजाच्या जाती सांगितल्या आहेत* 'ह्रीं' बीज हें ब्राह्मणाकरिता उपयोगात आणावें 'श्रीं' बीज हें क्षत्रियासाठीं उपयोगात आणावें, 'क्लीं' बीज हे वैश्यासाठीं उपयोगात आणावें व 'ऐं' बीजाचा *उपयोग शूद्राकरिता करावा* चतुर्बीजरहित *मंत्राना 'पौलस्त्य मंत्र' म्हण-तात* चतुर्बीजमंत्र ब्राह्मणाकरिता उपयोजावे, त्रिबीज मंत्र क्षत्रियाना सांगावे, द्विबीज मंत्र वैश्यवर्णास सांगावे व एकबीज मंत्र शूद्राना सांगावा *पौलस्त्य मंत्र अवर्णां, यवन, शक, शबर, इत्यादिकांकरिता योजावा*

काहीं विद्या अशा आहेत की, त्या (स्मशानात सिद्ध होणाऱ्या) वाम मार्गाशिवाय सिद्ध होत नाहीत असे मंत्र तारा, काली, छिन्नमस्ता व गुह्यकाली ह्यांचे होत तसेच सुंदरी, लक्ष्मी, भुवनेश्वरी, भैरवी, बगलामुखी हे मंत्र वाममार्ग व दक्षिणमार्ग अशा दोन्ही मार्गांनी साध्य होतात ज्या

मंत्राची आराधना करावयाची त्याचे तर्पण व हवन केलेंच पाहिजे. हवन न केल्यास मंत्रोदिष्ट इष्टफल साध्य होत नाहीं. असें म्हटलें आहे कीं—

**आराधितस्य मंत्रस्य न कुर्यात्तर्पणं यदि ।**
**हरत्यर्धशरीरं सः इत्युक्तं किल शंभुना ॥**
**मंत्रस्य तर्पणं कृत्वा हवनं न करोतिचेत् ।**
**मंत्रसिद्धिर्न भवति सत्यं सत्यं शिवोदितम् ॥**

तथापि हे नियम सकाम कर्म करणाऱ्या जनालाही लागू आहेत त्याबद्दल असें वाक्य आहे कीं—

**साधकानां बुभुक्षूनां विधिर्नियतियंत्रित. ।**
**मुमुक्षूनां तत्त्वविदां स एव च निरर्गलः ॥**

उमामहेश्वर मंत्र, दक्षिणामूर्ति हयग्रीव, वाराह अष्टाक्षर मंत्र, प्रणवपूर्वक वासुदेव मंत्र, प्रणवपूर्वक लक्ष्मीनारायण मंत्र, हे मंत्र पहिल्या तीन वर्णांस द्यावे. नारसिंह, पाशुपत, सुदर्शन, हे मंत्र क्षत्रिय व वैश्य वर्णांच्या मनुष्यास द्यावे. अग्निमंत्र, सूर्यमंत्र, तारामंत्र हे तीन वर्णांस द्यावे. अनुष्टुप छंदाचे शक्तिमंत्र, विंध्यावासिनी मंत्र हे मंत्र आदि वर्णांस द्यावे. मातंगिनी, उग्रतारा, कालिका, श्यामला, छिन्नमस्ता व बाला हे मंत्र सर्व वर्णांस द्यावे. हरिद्रागणपतिमंत्र सर्व सिद्धीप्रद आहे. व तो त्रैवर्णिकास द्यावा. त्रिपुरा मंत्र, बटुक मंत्र हे मंत्र सर्व वर्णांस द्यावे व विशेषत स्त्रियास द्यावे. हु फट् अतीं असलेले मंत्र सकर वर्णांना द्यावे असें कुब्जा तंत्रात सांगितलें आहे.

खालीं दिलेले मंत्र कलियुगात सिद्धमंत्र आहेत .—

**त्र्यर्णं एकाक्षरोऽनुष्टुप् त्रिविधो नरकेसरी ।**
**एकाक्षरोर्जुनोनुष्टुप द्विविधस्तुरगाननः ॥**
**चिंतामणिः क्षेत्रपालो भैरवो यक्षनायकः ।**
**गोपालो गजवक्त्रश्च चेटका यक्षिणी तथा ॥**
**मातंगी सुंदरी श्यामा तारा कर्णपिशाचिनी ।**
**शबर्येकजटा वामा काली नीलसरस्वती ॥**

त्रिपुरा कालरात्रिश्च कलाविष्टप्रदा इथे ।
पुरा शापविहीनं च वर्तते मंत्रपंचकं ।
श्री विद्या सालुकंचैव नृसिंहार्कवराहकं ॥ १ ॥

(त्र्यक्षरी) ह्रीं क्षों न्हो ॐ क्षौं ॐ वाला मंत्र (त्र्यर्ण) श्रीं, ह्रीं, क्लीं, बत्तीस अक्षराचा तीन प्रकारचा मंत्र, नरसिंह मंत्र, फ्रों (कार्तवीर्य मंत्र) दोन प्रकारचा, गणेशमंत्र क्ष्म्र्यों, (चिंतामणि), क्षेत्रपाल (क्ष), भैरव, यक्षराज (कुबेरमंत्र), गोपाल मंत्र, गणेशमंत्र, (हरिद्रागणेश), वट यक्षिणी मंत्र, मातंगी, सुंदरी, श्यामा, तारामंत्र, कर्णपिशाचिनी मंत्र, शबरी, एकजटा, वामा, काली, नीलसरस्वती, त्रिपुरा, कालरात्रि हे मंत्र *कलियुगात सिद्ध आहेत.* श्रीविद्या, शरभमंत्र, नृसिंहमंत्र, सूर्यमंत्र वराहमंत्र हे पाच मंत्र *शापविहीन आहेत.* ह्या मंत्रांस सिद्धारिचक्रानें सिद्धसाध्य साध्य–साध्य वगैरे पाहण्याची आवश्यकता नसते.

याशिवाय खालीं लिहिलेले मंत्र कलियुगात अनुष्ठानास योग्य आहेत असे मंत्रसूरी सांगतात.

तारा तारयति क्लेशान् राज्यं तु भुवनेश्वरी ।
मातंगी राक्षसी सा तु भीति हरति नित्यशः ॥
शारिका शं ददात्येव समतिं लोकपूजिता ।
राज्ञी राज्यं राजवश्यं मेडा भयविनाशिनी ॥
धनं ज्वालामुखी देवी भक्तेभ्यश्च प्रयच्छति ।
एता देव्या इष्टदात्र्या जपहोमार्चनादिभिः ॥

---

१ नृसिंहराम विष्णुश्च शंकरश्चाम्बिका तथा गजाननो गुरुश्चैव एतैते सिद्धमन्त्रा ॥१॥
अनेक सिद्ध मंत्राची यादी 'शारदातिलक' या ग्रंथात आहे. सिद्धमंत्रास सजीवनादि क्रियाची गरज नाहीं–तसेच 'श्रीराम, जयराम, जयजयराम, 'श्री दुर्गे, जय दुर्गे जयजय दुर्गे, किंवा 'श्रीगुरु जयगुरु, जयजयगुरु' असा त्रिपाद सिद्ध मंत्रांचें सिद्धादि–चक्र–शोधन नको. न्यासही नकोत.
–संप्रदाय सुरतरू अ. २२

मुक्तिं ददाति त्रिपुरा लक्ष्मीं लक्ष्मीं ददाति च
विद्यां ददाति वाग्देवी प्रत्येकं जन्मजन्मनि ॥

वरील श्लोकांत प्रत्येक *मंत्राची फलश्रुति* सांगितली आहे. तो अर्थ उत्तान असल्यानें त्याचें भाषांतर लिहिण्यांत येत नाही.

## ९. सिद्धारिचक्र–अकडमचक्र–घातचक्र

आतां मंत्र सिद्ध होण्याकरितां सिद्धारिचक्राप्रमाणें[1] जो मंत्र आपणास सिद्ध होणारा असेल तो शोधून काढावा लागतो. तसेंच कोणता मंत्र ऋणी आहे व धनी आहे हे ऋणी–धनी चक्रावरून पहावें लागतें. तसेंच कुलाकुल चक्राप्रमाणेंही मंत्र कोणता सिद्ध होईल याचाही विचार करावा लागतो. तसेंच मंत्रग्रहणाकरितां शुद्ध तिथी, वार, मास, नक्षत्र वगैरे पहावें लागतें परंतु *त्या गोष्टी मंत्र देणारे गुरु पहात असतात*, म्हणून त्याचा उहापोह येथें करीत नाही. जी यंत्रें पुढें देण्यांत येत आहेत त्याप्रमाणें पाहून कोणीही मंत्रजप करूं नये *गुरूशिवाय असा*

---

१. *निरनिराळ्या कामनासिद्धींसाठीं, सिद्धींचे निरनिराळे मंत्र असतात.* देव देवताही निरनिराळ्या असतात; किंबहुना एकाच देवतेचे कामनाभेदाप्रमाणें मंत्रही भिन्न भिन्न असतात. यामुळें कोणता मंत्र कोणती कामना सिद्ध होण्यासाठीं म्हणजे पूर्ण होण्यासाठीं कोणता मंत्र योग्य आहे, हें ठरविण्याच्या पद्धतीला '*सिद्धारि-चक्र-शोधन*' असें म्हणतात. त्याचप्रमाणें मंत्र घेणाऱ्या जीवाच्या जन्मतिथि, नक्षत्र व नाव ह्याचाही मंत्र फलप्राप्तीच्या दृष्टीनें विचार करणें अवश्य असतें. हें ज्या ज्योतिश्चक्रावरून समजतें, त्याला 'अकडम चक्र' असें म्हणतात, यांत घातचक्रही येतेंच, तसेंच त्या व्यक्तीच्या जन्म कुंडलींतील, द्वितीय, नवम, दशम व पंचम इत्यादि स्थानांतील ग्रहयोगाचा विचार करणेंही जरूर असतें. या सर्व गोष्टींचा विचार करून मगच मंत्र देणें व घेणें हिताचें असतें. पण ह्या सर्व गोष्टींची जबाबदारी मंत्रदात्या गुरूवरच असते, ती कशी तें पहा :

कामनेप्रमाणें देवदेवता ह्यांच्या मंत्राचे सिद्धमंत्र, साध्यमंत्र, सुसिद्ध मंत्र

प्रयत्न केल्यास तो निष्फळ होईल. (गुरू का हवा याचे विवेचन पूर्वी केलेले आहे)

यानंतर मंत्राची विशेष माहिती देण्याचा विचार आहे. मंत्रमहोदधि, मंत्रमहार्णव व इतर आगम यामधून लक्षावधि मंत्र लिहिलेले आहेत. ते मंत्र देण्याचा हव्यास करण्याचे कारण नाहीं. या लेखात असेच मंत्र देण्याचें ठरविलें आहे कीं, जे मंत्र सिद्ध केलेले काहीं सज्जन आज हयातही आहेत

## १०. मंत्रसिद्धिसाधना

सर्व मंत्र सिद्ध करण्याकरिता श्रीगायत्रीमंत्राचा जप सांगितला आहे. वास्तविक श्रीगायत्रीमंत्र पूर्वी दिलेल्या यजुर्वेदातील मंत्रात यावयास पाहिजे होता. परंतु श्रीगायत्रीमंत्राची महति सर्व वैदिक मंत्रात अग्रगण्यतेने वर्णिलेली आहे व सर्व आगम ग्रंथात प्रामुख्यानें तसेंच तंत्रशास्त्रात त्या मंत्राच्या संबंधानें विशेष विधान सांगितलें असल्यानें, श्रीगायत्रीमंत्राच्या महत्त्वाबद्दल प्रथम लिहिण्याचे ठरविलें आहे.

---

आणि अरिमंत्र असे प्रकार आहेत, सिद्धमंत्र कालांतरानें फल देतात, 'साध्य मंत्र' जपहोमानंतरच फलप्रद होतात. सुसिद्ध मंत्र त्वरित फल देतात, पण अरिमंत्र (शत्रुत्ववाले) जापकाचा नाश करणारे होतात.

मंत्र ऋणी असावा व जापक धनी असावा लागतो, हें कार्य अकडमचक्र व घातचक्र यावरून ठरविता येते. ही माहिती ज्या गुरूला माहीत असेल. त्यापासूनच आपल्याला जरूर असेल त्या कार्याबद्दलचा जप घ्यावा मंत्र देणारानेंसुद्धा हा विचार करूनच मंत्र द्यावा सिद्धारिचक्र–शोधनाची भानगड चुकविण्यासाठीं सामर्थ्यसंपन्न गुरु किंवा सत्पुरुष आत्मतेजानें शिष्याचें 'दीक्षानाव'च निराळें ठेवितात तसें केल्यानें शिष्याचा नवीन जन्म होतो असे शास्त्र आहे. जसें विवेकानंद, रामतीर्थ, श्रीवासुदेवानंद सरस्वती, श्री पांडुरंगाश्रम, ब्रह्मचैतन्य, सिद्धारूढ इत्यादि 'परशुराम कल्प सूत्र' या 'मंत्रमहोदधि' या ग्रंथात वरील चक्रें व तत्रें याची परिहारकांची सविस्तर माहिती दिलेली आहे. (गो. प्र भा.)

यंत्राबद्दल माहिती लिहिताना प्रत्येक मंत्राचे यंत्र अगर मूर्ति असावी, त्या यंत्रावर देवतेचें आवाहन करून देवतेचे पूजन केलें असता देवताप्रसाद लवकर होतो, असे पुढें लिहिले आहे.

तंत्रग्रथात देवताआवाहन प्रथमतः यंत्रावर करावें व देवतेचें ध्यान करून आवाहित देवतेची देवता — यंत्रावर पूजा करावी असे सांगितलें आहे. सगुणोपासन अगर साकारोपासन याचें अस्तित्व पहिल्यापासून आहे, परंतु मानवांमधील मनोदौर्बल्यामुळे ध्यानावाहित देवतेचें ध्यान पूजासमाप्तीपर्यंत एकाग्रतेने न राहिल्यानें ध्यानावस्थित देवतेच्या ध्यान-सदृश मृण्मय, वालुकामय अगर पाषाणमय देवताही मूर्तिपूजा — कर्माकरिता प्रचारात ठेवल्या होत्या. *पण यावरून यंत्रमय पूजेचा एक कालखंड व मूर्तिमय पूजेचा एक कालखंड असावा असें अनुमान काढण्याचें कारण नाहीं.* मानवसमाजाची बौद्धिक उन्नति होत आहे, असें आज आपण म्हणतो, परंतु खरी स्थिति अशी आहे कीं, आजही पृथ्वीतलावर असे मानववंश कीं, जे वन्यपशूंच्या मांसावरच केवळ आपली क्षुधाशान्ति करीत आहेत. म्हणून एवढे म्हणता येईल कीं, मानववंशात निरनिराळ्या काहीं कमीअधिक प्रमाणानें मानवी संस्कृति कमीअधिक होत असते. तंत्रपूर्वकाळीं अग्निपूजा व सूर्यपूजा तंत्र या नावानें नव्हे, परंतु तत्वानें तंत्रवर्णित यंत्र व प्रतिमापूजा थोड्या अधिक प्रमाणानें अस्तित्वात असलीच पाहिजे. आजच्या कलियुगाच्या कालखंडात केवळ अग्नि उपासना करणारे 'अग्निमुखा वै देवा' असें म्हणून अग्निकुंडात समिधाहुती व आज्याहुती देणारे अग्निहोत्री आहेतच. गृह्याग्नि ठेवणारे व अमावास्येला इष्टी करणारे आहेतच. अग्न्युपासक पारसीक (पारशी) आहेत. केवळ मंत्रपाठक आहेत व केवळ मूर्तिपूजकही आहेत.

श्रीकोल्हापुरनिवासिनी महालक्ष्मीचे सन्निध श्रीयंत्राची स्थापना आहे. *श्रीतुळजाभवानीची चरमूर्ति आहे व त्या मूर्तीच्या पायाखालीं श्रीयंत्र आहे.* हरिद्वार येथें श्रीगायत्रीदेवीचें खालीं गायत्रीयंत्र आहे. काशी येथें

अन्नपूर्णेच्या मंदिरात उजव्या बाजूस शिवलिंगावर श्रीयंत्र आहे. याप्रमाणे गुप्त अगर प्रगट रूपानें प्रत्येक प्रसिद्ध पीठदेवताचे जवळ अगर पायाशीं श्रीयंत्राची अगर त्या विशिष्ट देवतेच्या यंत्राची स्थापना केलेली आहे, असें दिसून येतें.

गायत्रीमंत्राची उपासना व जप करिताना गायत्रीयंत्र पुढें ठेऊन त्याची षोडशोपचारें पूजा करावी. श्रीभगवत्पूज्यपाद आद्य शंकराचार्यांनी श्रीगायत्रीपुरश्चरणाचें विधान लिहिलें आहे. त्यातील यंत्र निराळ्या प्रकारचें आहे. कारण निरनिराळ्या संप्रदायात निरनिराळी योजना असते.

मंत्र सिद्ध होण्यास ब्रह्मचर्य[1], शुचिर्भूतपणा[2], व इंद्रियनिग्रह या गोष्टी मुख्य आहेत. तन, मन, धनेंकरून देवताराधना आवश्यक आहे. मंत्र-सिद्धि होण्याचेपूर्वी तीन घटनाकाळ असतात. पहिल्या काळ्यात उपद्रव होतात अशा काळात न डगमगता मंत्राराधना सुरू ठेवावी हा पहिला घटनाकाळ होय. या काळात अजपाजपविधान[3] चालू ठेवावें व मूळमंत्राचा उद्देश लक्ष्यात ठेऊन जप करावा. दुसऱ्या काळात दृष्टांत होतात व तिसऱ्या काळात मन आनंदभरित होतें. जप पूर्ण झाल्यावर तर्पण व होमहवन करणें आवश्यक आहे. होमहवनानें देवता संतुष्ट होते व

---

१. योगशास्त्रात मंत्रयोग व सिद्धि ह्यासाठीं सोळा अंगें सांगितलीं आहेत. तीं अशीं.—भक्ति, शुद्धि, आसन, पंचांगसेवन, आचार, धारणा, दिव्यदेश सेवन, प्राणक्रिया, मुद्रा, तर्पण, हवन, बलि, याग, जप, ध्यान, समाधि त्याचे स्पष्टीकरण 'नामचिंतामणि ३ री आवृत्ति शके १८९० यांत पहा!

२. ब्रह्मचर्य म्हणजे काम–प्रेरणेशीं संबंध असणाऱ्या वृत्तीला ताब्यात ठेवणें असाच नसून आपल्या कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रिय या मार्फत शक्तीचा नित्य जो व्यय होतो. तो अडवून त्या त्या शक्तीचा संचय करणें, असा अर्थ अभिप्रेत आहे (गो. प्र. भा.)

३. याच पुस्तकात पुढे दिली आहे. तसेच याच ग्रंथकाराच्या 'सार्वजनिक प्रार्थना' या पुस्तिकेंत सविस्तर माहिती आहे (गो. प्र. भा)

त्यामुळें मंत्रसिद्धि तत्काळ होते. होमहवनांबद्दल अधिक जपाचा प्रतिविधि सांगितला आहे; परंतु त्या प्रतिविधीनें इष्ट कार्य सिद्ध होतेंच असें नाहीं.

## ११. मंत्रांचे संस्कार

सर्व प्रकारच्या मंत्राबद्दल माहिती दिल्यानंतर आतां संस्कार या मुद्याबद्दल विवरण करणें क्रमप्राप्त आहे. 'सम्यक्-करणं संस्करणम्' असा या शब्दाचा विग्रह करितां येईल. कोणत्याही पदार्थाला पूर्वस्थितींतून उच्चस्थितींत आणणें, हा त्या पदार्थावर झालेला संस्कार होय, किंवा कोणत्याही वस्तूतील न्यूनता काढून टाकण्याची क्रिया हा त्या वस्तूवरील संस्कार होय. कोणत्याही निर्जीव अगर सजीव वस्तूच्या ठिकाणीं *असलेल्या गुप्त शक्तींचा विकास, व त्यांचे ठायीं त्या विकासाचें स्थिरीकरण अथवा गुप्त गुणाचा आविर्भाव व त्यांचें संवर्धन ज्या क्रियांनीं अगर क्रियासंभारांनीं होतात त्यांस 'संस्कार' म्हणावें.*

दोन पैशांचे किमतीचा हिऱ्याचा दगड घेऊन त्यावर संस्कार केल्यानें त्याची किंमत दोन लाख होते. एका संगमरवरी दगडाची जी मूर्ति पेशवाईंत, भिवा सुतार यानें तयार केली, व मुंबई येथील श्रीमाधवबागेंत जिची स्थापना झाली, त्या मूर्तीसारखी मूर्ती हिंदुस्थानांत मिळत नाहीं. अशी ही मूर्ती सर्व आस्तिक- नास्तिक मनुष्यांस पूजार्ह झालेली आहे. भिवा सुतारानें सूक्ष्म हत्यारांच्या संस्कारांनीं तयार केलेली ती मूर्ति आज सर्व जनतेस पूज्य व आदरणीय झाली आहे, याचें कारण संस्कारच होय. लेखनाचे साहित्यांतील लोखंडी टांक घ्या. लोखंड खाणींतून निघाल्यापासून दाह, छेद, *ताडन-पाटन इत्यादि अनेक संस्कार झाल्यावर तो टांक* लेखनास पात्र होतो. हा टांकाचा दांडा लांकडाचा आहे. त्या लांकडावरही अनेक संस्कार झाल्यावर त्याचा उपयोग लिहिण्याचे कामीं होतो. ज्या कागदावर लिहिणें चालू आहे, त्या कागदाच्या मूळ स्वरूपावर किती तरी संस्कार झाल्यानंतरच तो लेखनक्षम होतो. याप्रमाणें कोणतीही

जड वस्तु सस्काररहित असता अभ्यवहार्य असते परतु सस्कार झाल्याबरोबर त्या वस्तूला निराळेच स्वरूप प्राप्त होते ज्या इमारतींत बसून हा लेख लिहिण्यात येत आहे, ती इमारत, दगड, लाकूड, लोखड, चुना या उपकरणानी झालेली आहे, परतु हे पदार्थ जसेच्या तसेच इमारतीला उपयोगात आणले नाहींत त्या प्रत्येक पदार्थाला काहींना काही तरी सस्कार झालेलाच आहे

उद्यानात दिसणारी नितातरमणीय वृक्षराजी व त्या वृक्षराजीपैकीं एकाच वृक्षास दिसणारी निरनिराळ्या रगाचीं पुष्पें ह्या गोष्टी सस्कारा शिवाय होत नाहीत, तबला, सतार, जलतरग, पेटी अशा प्रकारचीं श्रुतिमनोहर वाद्यें तयार होतात त्यास तयार करण्यास किती तरी लोकाचे सस्कार कारणीभूत झालेले आहेत, याची यादीच तयार करावी लागेल. नाना प्रकारचें खाद्य, पेय, चोष्य पदार्थ मूळभूत जिनसावर सस्कार झाल्याशिवाय त्याचा विनियोग मनुष्याच्या भोजनादि व्यवहाराकडे होऊच शकत नाही पदार्थांवर ज्या प्रमाणानें सस्कार झालेले असतात त्या मानानें त्या पदार्थांची किंमत वाढत जाते सस्कार न झालेले लोख डाच्या खाणींतून निघालेले दगड गाडयाच्या अगर पाट्याच्या भावानें विकतात. त्याच लोखडी दगडावर थोडा सस्कार होऊन लोखडी खाब, पत्रे, नळ्या, याची विक्री शेरानें अथवा मणानें होते. घडयाळाच्या कमानी ह्यापेक्षाही महाग मिळतात, व शिवण्याच्या पोलादी सुया त्याहींपेक्षा महाग असतात, व लोखडाचें लोहभस्म दहा रुपये तोळा विकले जाते. रुपयास पाच तोळे मिळणारे अभ्रक त्यावर जसजसे सस्कार जास्त होतील तसतशी त्याची किंमत वाढत जाते सहस्रपुटी अभ्रकास शभर दोनशे रुपये तोळा किंमत येते याप्रमाणे पाणी दिलेल्या तरवारीची किंमत वाढत जाते, त्याचें कारण सस्कारच होय.

पशु पक्षी यावरही सस्कार झाल्यानतर त्याची किंमत वाढत जाते साधी कुत्री चार आठ आण्यास मिळतात, परतु काहीं जातीचीं कुत्री

हजार रुपये किंमतीला विकली जातात. जितक्या लावी उचीचा घोडा शंभर रुपयास विकतो, तितक्या लावी उचीचा घोडा संस्कारानंतर हजार रुपये किमतीस विकण्यात येतो, पेशवाईंत रिसाल्यातील घोडीं पन्नास अगर शंभर रुपयास विकत मिळत. परंतु जर्दाचित्या म्हणून जो घोडा शिकवून तयार करण्यात आला होता, त्याची किंमत एक लाख रुपये झाली होती?

पशुपक्ष्यादि सजीव प्राणी व काष्ठादि जड पदार्थ यावरसंस्कार करण्यास मंत्राची अपेक्षा असतेच असें नाहीं. परंतु मनुष्याच्या संस्कारांना मंत्राची अपेक्षा असते. काष्ठावर संस्कार करण्यास सुताराची जरुरी आहे, तशीच रंधा, पटाशी, गुण्या, करवत, तासणी वगैरे हत्याराचीही आवश्यकता असते. सोनारास सोन्यारुप्याचे दागिने घडविण्यास सुताराच्या हत्यारापेक्षा सूक्ष्म हत्यारें लागतात. व जवाहिऱ्यास सोनाराच्या हत्यारापेक्षाही सूक्ष्म हत्यारें लागतात. आता चिंचपेटी करावयाची असल्यास किंवा एखादा वज्रटीकेसारखा दागिना करावयाचा असल्यास किंवा हिऱ्यास पैलू पाडावयाचे असल्यास सुतार व लाकूड, सोनार व सोनें आणि हिरा व जव्हेरी असूनच इष्ट कार्य होणार नाहीं, तर त्या प्रत्येक कलावंताचीं हत्यारें असलीं पाहिजेत, तरच इष्ट कार्य होईल. त्याचप्रमाणे मनुष्यप्राण्यावर संस्कार करावयाचे असल्यास मनुष्याची बुद्धि जशी सूक्ष्म रूपरंगविहीन व अमेय आहे, तशीच त्या मानवी बुद्धीवर संस्कार करावयाचे असल्यास त्याकरिता लागणारी हत्यारेंही सूक्ष्मतर रूपरंगविहीन व अमेय असलीं पाहिजेत, व त्या कलावंताचें सुसंस्कृत मन हेही एक साधन असले पाहिजे अशीं हत्यारें म्हणजे मंत्र होत प्राथमिक शिक्षणाची सुरवात करायचे वेळीं नमः सिद्धं (ओनामासीधं) हा मंत्र वेड्यावाकड्या उच्चारानीं शिकवावा लागतो

> वैदिकैः कर्मभिः पुण्यैर्निषेकादिर्द्विजन्मना ।
> कार्यः शरीरसंस्कारः पावनः प्रेत्य चेह च ॥

ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्यास्त्रयो द्विजाः ।
निषेकाद्याः स्मशानान्ताः तेषां वै मंत्रत क्रियाः ॥
गर्भे कर्मत्रयं कुर्याज्जायमाने तथा दश ।
ततः कर्मत्रयं चेति संस्काराः षोडशाः स्मृताः ॥
षडेव जन्मसंस्काराः प्रोक्ताः स्त्रीशूद्रयोरपि ।
चांडालादिषु चत्वारि मन्त्याः प्रोक्तास्त एव ते ॥

मेरुतन्त्र, परशुरामतंत्र.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य याना अवश्य असे गर्भाधानादि सोळा प्रकारचे संस्कार आहेत. ते सर्व वैदिक मंत्रानी करावे असा शास्त्रकाराचा आदेश आहे वरील अवतरणात '*ब्रह्मक्षत्रियविट्शूद्र*' असे शब्द आहेत, त्यात शूद्र असा शब्दही आहे. स्त्रिया व शूद्र याना वेदाधिकार नसल्याने 'शूद्रोप्येव विधि कार्यो विना मंत्रेण संस्कृत ' स्त्री, शूद्र, द्विज-वधू याचे संस्कार पुराणोक्त मंत्रानी करावे असे लिहिले आहे व त्रैवर्णिक स्त्रियांच्या संस्कारासंबधी असें लिहिलें आहे कीं, "तूष्णीमेता क्रिया विवाहस्तु समंत्रक " (व्यवहार मयूख). जी स्त्रीजाती गर्भांत असताना तिचे तीन संस्कार वैदिक पद्धतीने होत असतात (गर्भ स्त्री अथवा पुरुष आहे हे समजणे शक्य नसल्यानें) ती जन्म झाल्याबरोबर पुढील वैदिक संस्कारास अपात्र ठरते. व स्त्रीचे उपनयन म्हणजे 'पाणिग्राहो विधि स्त्रीणामौपनायनिक पर ' विवाहविधीच होय असे ठरलें, व स्त्रियांनी व्रतवैकल्ये करावयाचीं असता श्रुतिस्मृतिफलप्राप्त्यर्थं असें न म्हणता पुराणोक्त असें म्हणावें असा दंडक आहे. विवाहविधींत सुद्धा स्त्रियानीं म्हणावयाचे वैदिक मंत्र उपाध्यायच म्हणतात, ते स्त्रियांनी म्हणण्यास प्रतिबंध नाहीं पण त्याना ते मंत्र शिकवीतच नाहींत

विवाह झाल्याबरोबर एखाद्या गृहस्थाने अग्निहोत्र घेतल्यास त्याचे पत्नीस वेदमंत्र म्हणावे लागतात त्या दृष्टीनेंही स्त्रीजातीला थोडातरी वेदाधिकार आहे वेदमंत्रानीं संस्कार करण्याचा प्रतिबंध असला, तरीं

आगमग्रंथात आगमोक्त विधीनें स्त्रीशूद्रादिकांचे व अनिशूद्रांचे सुद्धा संस्कार करण्याचे विधी सांगितले आहेत.

वैदिक संस्कार एकदर अठ्ठेचाळीस आहेत.

ऋतुगमन, गर्भाधान, पुंसवन, सीमंत, विष्णुबलि, जातकर्म, उत्थान, नामकरण, अन्नप्राशन, प्रवासागमन, पिंडवर्धन, चोडक, उपनयन, पारायण व्रतबंधविसर्ग, उपाकर्म, समावर्तन, विवाह, हे १८ शारीरसंबंधीं संस्कार झाले. १९ पंचमहायज्ञ (ब्रह्म-देव-पितृ-भूत-मनुष्य-यज्ञ), २० स्थालीपाक, २१ आग्रयण, २२ अष्टका, २३ पिंडपितृयज्ञ, २४ मासिकश्राद्ध, २५ चैत्री, २६ अश्वयुजी, २७ अग्न्याधेय, २८ अग्निहोत्र, २९ दर्शपूर्णमास ३० आग्रयणेष्टि, ३१ चातुर्मास्य, ३२ निरूढ पशुबंध, ३३ सौत्रामणी, ३४ अग्निष्टोम, ३५ ,. ३६ उक्थ्य, ३७ षोडशी, ३८ वाजपेय, ३९ अतिरात्र व ४० आप्तोर्याम. गौतमधर्मसूत्रात आणखी आठ संस्कार सांगितले आहेत. १ भूतमात्रावर दया, २ क्षमा, ३ अनसूया, ४ शौच (अन्तर्बाह्य) ५ अनायास, ६ मांगल्य, ७ अकार्पण्य, ८ अस्पृहा, असे अठ्ठेचाळीस संस्कार आहेत.

या ४८ संस्कारांपैकीं गर्भाधान[1], उपनयन, समावर्तन, विवाह, व अंत्येष्टि असे पाच संस्कार व उपनयन व विवाहाचे वेळीं बाकीचे अकरा, असे १६ संस्कार आज सनातन धर्मावलंबी समाजात चालू आहेत वा मानिले जातात. हे संस्कार आज कोणासही नको आहेत. अशा प्रकारच्या षोडश संस्कारांपैकीं आज उपनयन, समावर्तन, विवाह, गर्भाधान व अंत्येष्टि हे पाच संस्कार तरी आस्थेवाईक व सनातन धर्मावलंबी लोकांनीं कायम ठेवण्याचा प्रयत्न करावा.

---

१. मुलींची लग्नवयोमर्यादा वाढल्यामुळे गर्भादान हा संस्कार क्वचित्‌च होतो. त्या ऐवजीं क्वचित् 'आडगुळे' हा विधि करतात. करणारे योग्य ब्राह्मण (भटजी) न मिळाल्यामुळें अंत्येष्टि हा संस्कारपण 'भडाग्नि' देऊन यथातथाच होतो! (गो. प्र. भा.)

हे वरील संस्कार[१] नित्य आहेत व हे संस्कार पुरे करण्याकरिता उपनयन व विवाह संस्काराचे वेळीं उर्वरित संस्कार—लोपाबद्दल प्रायश्चित्त म्हणून गोनिष्क्रयदानें सांगितलीं आहेत. नैमित्तिक आणि काम्य कर्मे करावयाचीं असल्यास, ज्या मंत्राचे विनियोग सांगितले आहेत, त्या मंत्राची सिद्धि प्राप्त व्हावी म्हणून निराळे संस्कार[२] सांगितले आहेत. त्याचें वर्णन पुढें दिले आहे

इष्ट फलप्राप्त्यर्थ मंत्रसिद्धि प्राप्त व्हावी म्हणून ऋग्विधानात सांगितलें आहे कीं, साधकानें पापदोषनिवृत्तीकरिता चांद्रायण व्रतें करावीं.

---

२. संस्कार : मंत्र सिद्ध होण्यासाठीं त्यावर संस्कार करून त्यात चैतन्य आणावें लागतें. ते संस्कार दहा असे आहेत :
मंत्रार्थं मंत्रचैतन्यं योनिमुद्रां न वेत्ति यः । शतकोटिजपेनापि तस्य विद्या न सिद्ध्यति ॥१॥ असें सरस्वती तंत्रात आहे. ते दहा संस्कार जनन, जीवन, ताडन, बोधन, अभिषेक, विमलीकरण, आप्यायन, तर्पण, दीपन, गुप्ति. गुरूनें हें सर्व शिष्याला सांगून करवून घ्यावयाचे व मग च शिष्यानें त्याचा जप करावयाचा असतो ते संस्कार असे (१) योग शास्त्रोक्त मातृकाद्वारा, मंत्राच्या वर्णांचा उद्धार करणें म्हणजे जनन (२) मंत्रवर्णांच्या पंक्ति क्रमानें लिहून त्यातील प्रत्येक वर्ण प्रणवानें संपुटित करणें (निदान १० वेळा तरी) म्हणजे जीवन (३) मंत्रवर्ण पृथक् लिहून 'वं' मंत्रानें चंदनानें निदान १० वेळ तरी ताडन करावें (४) मंत्रवर्णांच्या संख्येप्रमाणें 'र' बीजानें लाल फुलानीं मंत्राचें हवन करणें म्हणजे बोधन संस्कार झाला (५) मंत्रवर्ण लिहून मंत्रसंख्येनुसार 'र' बीजानें मंत्राचें प्रत्येक अक्षर रक्तकरवीर पुष्पानें मंत्रित करून विधीप्रमाणें अश्वत्थ पल्लवानें मंत्राच्या वर्णसंख्येनुसार सिंचन करणें म्हणजे विमलीकरण झालें. (७) मलत्रय नाशनासाठीं 'ॐ ऱ्हौं' या ज्योतिर्मंत्रानें सुवर्ण, दर्भ वा पुष्पें ह्यानें विधिपूर्वक 'आप्यायन' करणें (८) तसेंच ज्योतिर्मंत्रानें मंत्राचें तर्पण करणें. (९) 'ॐ ह्रीं श्रीं' ह्या अनुक्रमें तार–माया व श्री ह्या मंत्रानें मूळ मंत्राचें दीपन करावें (१०) मंत्र गुप्त ठेवणें ह्याला गुप्ति म्हणतात. (गो प्र. भा)

एकेन शुद्धिमाप्नोति द्वाभ्यां पापैः प्रमुच्यते।
त्रिभिः सिध्यन्ति मंत्राश्च मुच्यते चोपपातकैः।
अष्टभिर्देवताः साक्षात् पश्यते वरदास्तथा
छंदांसि दशभिर्ज्ञात्वा सर्वान् कामान् समश्नुते।

या चांद्रायण व्रताखेरीज कृच्छ्रचांद्रायण, प्राजापत्यविधि, सांतपन, महासांतपन, शिशुसांतपन, पराकृच्छ्र, असे आणखी प्रायश्चित्ताचे प्रकार आहेत अशीं दहा चांद्रायणव्रतें झाल्यावर सात सात दिवसांप्रमाणें यावकरूण, पिण्याक व तक्र हें सेवन करून त्वक्, असृक्, पिशित, अस्थि, मेद, मज्जा आणि वीर्य या सात पदार्थांची शुद्धि एकुणपन्नास दिवसांत करावी व नंतर 'प्राणायामैर्देहदोषान् मनोवाक्कायसंभवान्' प्राणायामांनी मानसिक, वाचिक, शारीरिक दोषांचा नाश करावा. व नंतर 'मंत्राणां सिद्धिकामार्थी पुरश्चरणमाचरेत्' यानंतर मंत्रसिद्धीकरितां पुरश्चरण करावें

## १२. वैदिक मंत्रांचें पुरश्चरणविधान

पंचांगोपासनेनेष्टदेवता प्रीतिदानतः।
पुरश्चति भक्तस्य तत्पुरश्चरणं प्रिये॥

पंचांग उपासना (कवच, पंजर, न्यास, ध्यान, आणि मंत्रजप) करून इष्टदेवता प्रसन्न करून घेणें हेंच पुरश्चरण आहे पुरश्चरणाचा अर्थ पूर्व क्रिया अर्थात् देवीपाशीं मागणें मागण्यापूर्वी जी क्रिया करावी लागते, तीच होय परंतु व्यवहारात कोणापासूनहि कांहीं मिळावें अशी इच्छा धरली तर त्या व्यक्तीची थोडीबहुत सेवा प्रथम करावी लागतेच, देवतेकडून कार्य साधना व्हावी म्हणून देवीची सांग उपासना करून प्रथम त्या देवतेची कृपा संपादन करावी लागते त्यानंतरची जी कांहीं इच्छा-मागणें असेल तें निवेदन करावें लागतें

सांगो जपो महादेवी पुरश्चर्येति गीयते (यामल)
कृतेन येन (पुरश्चरणेन) लभते साधको वाञ्छितं फलं
(पुरश्चरणचंद्रिका)
पुरश्चरणहीनस्य मंत्रसिद्धिर्नजायते (वीरचूडामणि)
पंचांगोऽयं महायागः पुरश्चरण संज्ञकः (विष्वक्सेन)

पुरश्चरण पचाग म्हणजे जप, होम, तर्पण, मार्जन, ब्राह्मणभोजन. पुरश्चरण सुरू करण्यापूर्वी चाद्रायण व्रत करावें. चाद्रायण व्रत म्हणजे मासारभात भोजन. १५ घासाच्या भोजनाचा अभ्यास करावा लागेल. नतर शुद्धप्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत एक एक घास कमी करणे. पौर्णिमेला एक घासाचेंच भोजन करणे आणि वद्य प्रतिपदेपासून एकेक घास वाढवीत जाणें. हविष्यान्नाच्या पदार्थांचे भोजन असावें अगर एकान्न भोजन उचित आहे. नतर वद्य चतुर्दशी मगळवार युक्त असेल तर ती घ्यावी व शुद्ध अष्टमीस जप समाप्त करावा नतर जपाचे दशाश हवन. त्याचे दशाश तर्पण. त्याचे दशाश मार्जन व त्याचे दशाश ब्राह्मणभोजन. याप्रमाणें 'कलोचतुर्गुण प्रोक्त' या वाक्याप्रमाणे चार वेळ अशीच क्रिया करावी.

'विनाच समय देवी न ददाति फल क्वचित्,' फळ मिळाले नाही तर निराश होऊ नये. तस्मात् काल प्रतीक्षेत. आपल्या पूर्वजन्माचीं बधनें प्रतिबधक होत असतात. असे चार वेळ पुन्हा चार वेळ असें सोळा वेळ करावें. कार्य होईल हे निश्चित, 'अत्युत्कटै पुण्यै फल भवति तत्क्षणात्' कार्यसिद्धि होते. मागील जन्माचे प्रतिबध फेडले जातात.'

साधारणत वैदिक मत्राच्या सिद्धीकरिता वर लिहिलेल्या विधानापेक्षा

---

१. जीवहीनो यथा देहः सर्व कर्मसु न क्षम ।
पुरश्चरण हीनोऽपि तथा मत्र प्रकीर्तित ।
तस्मात्तादौ स्वयं कुर्यात्तु वा कारयेत बुध (योगिनी हृदये)
आदौ पुरश्क्रिया कुर्यात् चरित फलसिद्धये (काली तंत्रे)
कष्ट्या तु पुरश्चर्या यो यत्कर्म समाचरेत् ।
तत्स्यैवाभिचाराय जायते नात्र सशय ।

सुलभ व कमी कष्टसाध्य अशी एक योजना खाली देण्यात येत आहे–

प्रथमत ब्रह्मकूर्च विधीने प्रायश्चित्त घेऊन त्रिकाल-स्नान करावें. बिल्ववृक्षाखाली एका माणसाला बसता येण्यासारखी झोपडी करावी, तेथें पाच लक्ष प्रणवाचा जप करावा. दुग्धाहार अगर एकाल नक्त भोजन करावें. वस्त्र दर्भमय अगर तागाचें अगर केळीच्या दोराचें असावें शिखा व यज्ञोपवीतास दर्भ बांधावा. मौन असावें, व जपसंख्या नियमित असावी. ग्राम्य पशूंचा शब्द ऐकू येऊ नये. पाच लक्ष जप झाल्यावर पन्नास हजार तर्पण, व पाच हजार घृताक्त तिलाच्या द्रव्याचा होम करावा. ब्राह्मणभोजन शक्य नसल्यास पाच हजार प्रणवाचा जप करावा. असें शक्य न झाल्यास, वरील सर्व नियम पाळून सूर्यग्रहणात जप करावा. जितका जप होईल, त्याचे दशांश तर्पण, दशांश हवन, व दशांश ब्राह्मणभोजन करावें. नतर 'भूर्भुव स्व' या व्याहृतींचें तीन लक्ष पुरश्चरण करावें. पुरश्चरणास आरंभ करिताना तीनशें व्याहृतींनी अभिमंत्रित

---

तस्मादादौ पुरश्चर्यां कृत्वा कर्मणि साधयेत् (आदि यामले)
पचागोऽय महायाग पुरश्चरणसज्ञक ।
अस्य पचाग यागस्य कला हन्ति षोडपीम् । (वैष्वकसेन्याम्)
मत्रो राजा पुरश्चर्या राज्यसपत्तिरीरिता ।
संपत्त्यातु विना राजा शोभते न महेश्वरी ।
सपत्तिमूलमेतद्धि सर्वमेन प्रकीर्तितम् । (तत्रसार)

गजांतलक्ष्मी प्राप्त व्हावी म्हणून श्री विद्यारण्य स्वामींनीं तपश्चर्या केली. पण ती फलदायी झाली नाहीं ! यामुळें त्यांनीं सन्यास घेतला–संन्यास घेता क्षणींच देवी साक्षात् प्रकट झाली व लगेच त्यांच्यापुढें होनाची धार ओतली ! 'आता मी संन्यासी झालों. मला द्रव्य नको' असें सांगत असतानाही त्यांच्या-पुढें होनाचा पाऊस पडत राहिला !! यावरून बोध दोन प्रकारचा निघतो. तो असा– एकतर जन्मांतरित अडथळे नाहींसे व्हावे लागतात. काळवेळ यावीच लागते ! तरच फलित मिळतें. दुसरा बोध म्हणजे क्रिया झाली की त्याची प्रतिक्रिया झाल्याशिवाय रहात नाहीं. ज्या मत्राची उपासना केली गेली त्याचा परिणाम घडतोच. आघात–प्रत्याघात हीं स्पंदनेंच. (गो. प्र. भा.)

जलानें स्नान करावें, त्यानंतर तीन लक्ष गायत्री मंत्रानें गायत्रीपुरश्चरण करावें. अशीं तीन गायत्री-पुरश्चरणें झाल्यावर वैदिक मंत्राचें पुरश्चरण मागील स्तंभांत सांगितल्याप्रमाणें करावें. म्हणजे वैदिक मंत्रोक्त हेतु साध्य होतात व त्यांच्या देवता प्रसन्न होतात.

प्रथम[1] ब्रह्मकूर्चविधी करून गायत्री मंत्राचा एक लक्ष जप करावा. पुण्यनदीच्या पात्रांत नाभिमात्र उदकांत उषःकालीं स्नानानंतर उभें राहून मध्यान्हापर्यंत इष्टमंत्र जपावा. परान्न घेऊं नये. मौन धारण करावें. दोन प्रहरीं वेदाध्ययन करावें. अशा प्रकारानें तीन वर्षें जप केल्यास वैदिक मंत्राची सिद्धि होते. वैदिक मंत्रांसही शापमोचन, उत्कलीन, संजीवन वगैरे करावें लागतें.

आतांपर्यंत मंत्र घेणारास लागणाऱ्या संस्कारांचा उहापोह केला. यापुढें मंत्राच्या संस्काराबद्दल विवेचन करावयाचें आहे. ..

विधि— जननं जीवनं पश्चात् ताडनं बोधनं तथा।
अथाभिषेको विमलीकरणाप्यायने पुनः।
तर्पणं दीपनं गुप्तिर्दशैता मंत्रसंस्क्रियाः।



जननं : गोरोचनानें भूर्जपत्रावर मंत्र लिहून त्याचेभोंवतीं बाजूस दिल्याप्रमाणें त्रिकोण काढावा. पश्चिम कोणापासून त्याचे सात भाग करावे. याप्रमाणें ईशान्यादि कोणाच्या नऊ घरया पडतात, त्यावर नऊ व चार मातृका लिहाव्या. अकारापासून हकारापर्यन्त

---

१. ब्रह्मकूर्चविधि – दारिक आनीने व लांबीचे दर्भ घेउन त्याचा कुंचल्यासारखा जुडगा बांधून त्यानें मार्जनादि क्रिया करणें.

ईशान्येपासून पश्चिमेपर्यन्त लिहाव्या. त्या भूर्जपत्रावर देवीचे आवाहन करावें व चंदनादिकांनी पूजा करावी.

**दीपनं** : 'हंस+इष्टमंत्र+सोहं' याप्रमाणे सहस्र जप करावा.

**बोधनं** : 'हंस+इष्टमंत्र+हंस', याचा पांच हजार जप करावा.

**ताडनं** : 'फट्+इष्टमंत्र+फट्', याचा एक हजार जप करावा.

**अभिषेक** : 'ऐं हंस ॐ' हा मंत्र प्रथम, नंतर इष्ट मंत्र व नंतर 'ऐं हंस ॐ' हा मंत्र भूर्जपत्रावर लिहून अभिषेक करावा.

**विमलीकरणं** : 'ॐ त्रौं वषट्+इष्टमंत्र+वषट् त्रौं ॐ' याचा एक हजार जप करावा.

**जीवनं** : 'स्वधा+वषट्+इष्टमंत्र+वषट+स्वधा' याचा सहस्र जप करावा.

**तर्पणं** : दुग्ध, घृत व जल यांनी त्या भूर्जपत्रावर लिहिलेल्या मंत्रावर एक हजार तर्पण करावें

**गोपनं** : 'ह्रीं+इष्टमंत्र+ह्रीं याप्रमाणें एकहजार जप करावा.

**आप्यायनं** : 'ह्सौ+इष्टमंत्र+सोहं' यानी एक हजार जप करावा. (नित्योत्सव[1])

गायत्र्यादि मंत्राना साधकांनी शाप दिलेले आहेत. प्रत्यक्ष गायत्री-मंत्र जपकर्त्याला ब्रह्मशाप, विश्वामित्रशाप, वसिष्ठशाप, शुक्रशाप असे चार शाप आहेत याचे निवारण 'ब्रह्मशापात् विमुक्तो भव' याप्रमाणे शापविमुक्ती करावी तसेंच आणखी एक विधान आहे. ते असे—सर्व

---

१. सरस्वती तंत्रांत हेच विधि थोडयाफार फरकानें दिलेले आहेत. शाप म्हणजे मंत्रशुद्धि—म्हणजे ज्या उपयानें तो मंत्र बंधनरहित होईल तो उपाय. याचा अर्थ त्या मंत्रासंबंधाचें आपलें अज्ञान नाहींसे करणें. राम, शंकर, सावित्री इत्यादि देव-देवतांनीं मंत्राना शाप दिले आहेत. देवी भागवतांत संध्येंतील गायत्री मंत्राला दिलेल्या शापनिवृत्तीसाठीं 'देवी गायत्री—विरिंची वसिष्ठ—विश्वामित्र—वरुणशापेभ्यो मुक्ता भव.' एवढा त्रोटक मंत्र दिला आहे. (गो. प्र. भा.)

गायत्रीमंत्र म्हणावा, नंतर 'त्र्यंबकं यजामहे' हा मंत्र म्हणावा, नंतर 'जातवेदसे सुनवाम' हा मंत्र म्हणावा. असा गायत्र्यादि सप्तकोटि महामंत्राच्या शापविमोचनाचा विधि आहे. नंतर सर्व व्याहृतींसहित गायत्री मंत्रानंतर 'जातवेदसे' हा मंत्र व नंतर 'त्र्यंबकं' हा मंत्र म्हणावयाचा. ह्या विधीनें मंत्राचें उत्कीलन (खीळ काटणे) साध्य होतें नंतर सर्व गायत्रीमंत्र व 'परोरजसे सावदो' हा चतुर्थपाद व 'हंसः सोहं' हा मंत्र व नंतर त्या संबंध मंत्राचा विलोम करावा. या पुढील प्रकार गुरुकडून समजून घ्यावा.

**मंत्रजागृति** : ही मंत्रजागृति गुरूने करावयाची असते अग्निरूप म्हणजे रौद्रमंत्र असल्यास इडानाडी चालू असताना 'ॐ रं' या बीजानी युक्त अशी त्या मंत्राची जागृति करावी. सौम्य मंत्राची जागृति उपरिनिर्दिष्ट बीजांनी युक्तच परंतु पिंगला नाडी चालू असता तो जप करावा. याप्रमाणे प्रबोधकाळीं तो मंत्र जागृत होतो, अथवा 'लं वं' हीं बीजें मंत्राचे मागें-पुढें लावून मंत्रातील प्रत्येक अक्षराला बिंदु लावून, (जसें अं-आं-कं इत्यादि) मंत्र जपावा, किंवा केवळ मंत्राक्षरांना विसर्ग लावून त्रिकाल मंत्र जप करावा. याप्रमाणे विधान केलें तर मंत्र जागृत होतो.

(मेरुतंत्र.)

## इतर मंत्रांचे शापोद्धार व पुरश्चरणाचे विधिविधान.

शाबर[१] मंत्राची जागृति म्हणजे संस्कार कसे करावे ह्याचें वर्णन खालीं देण्यात येत आहे—

शाबर मंत्रापैकीं प्रत्येक मंत्राला निरनिराळ्या देवताचे शाप आहेत ह्या मंत्राची जागृति करण्याचे विधि खालीं लिहिल्याप्रमाणें आहेत—

१. शाबर मंत्राचें फार मोठें वाङ्मय सांप्रदायिकांत उपलब्ध असून त्यांतही कांहीं मंत्रांना वैदिक बीजें लावून सिद्ध करणें व वाममार्गी पद्धतीनें क्षणभर मंत्र सिद्ध करणें असे प्रकार आहेत. (गो. प्र. भा.)

१ जागृति : मुमुक्षूनें मंत्रसिद्धीकरिता काश्याचें भांडें भस्मानें शुद्ध करावें. तें भांडे समोर ठेवून रविवारीं रात्रीं स्नान करून प्रत्येक प्रहराचे प्रारंभीं इष्टमंत्राचा एकशेंआठ जप करावा व चतुर्थ प्रहराचा एकशेंआठ जप झाल्यावर खैराची काठी घेऊन त्या भांड्यावर मारून तें भांडें वाजवावें, व 'हे मंत्र जागृतो भव' असें म्हणावें, म्हणजे तो मंत्र जागृत होतो. नंतर सोमवारीं प्रातःकाळीं स्नान संध्यादि कर्में संपल्यावर भैरवाला वडेभाताचा बलि द्यावा. व इतर देवांना नारळ फोडावा.

२. शोधन : मुमुक्षूनें सिद्धासनावर बसून म्हणजे सिद्धासन[१] घालून मूलबंध करावा. नंतर मूलाधाराचे ठिकाणीं चित्स्वरूप कुंडलिनीचें ध्यान करावें, व शिष्यास जो मंत्र द्यावयाचा तो मंत्र दोषरहित झाला आहे, अशी भावना करून आपल्या गुरूचें चिंतन करावें, व नंतर मूलाधारापासून सुषुम्ना मार्गांत इष्टमंत्राच्या अक्षरांचें चिंतन करावें, व जाता जाता मणिपूर, अनाहत, विशुद्धि व आज्ञाचक्रें यांचा भेद करीत करीत ब्रह्मरंध्रांत जाऊन सोममंडळांतील अमृतानें मंत्रवर्णांवर सिंचन करावें. नंतर तो मंत्र ऋष्या-[२]दिन्यासपूर्वक एक हजार आठ वेळा जपावा, अशा प्रकारानें तो मंत्र शापविमुक्त झाल्यानंतर त्या मंत्राचा उपदेश करावा. वाचिक

---

१. आसनें, बंध, कुंडलिनी इत्यादि योगशास्त्रीय प्रक्रियेची माहिती तज्ज्ञ गुरूकडून घेऊन त्यांचे देखरेखीखालीं अनुभवून मगच आचरण करावें हें चांगलें. (गो. प्र. भा.)

२. न्यास बीजन्यास, मातृकान्यास, करन्यास, अंगन्यास, ऋषि इत्यादि अनेक प्रकारचे न्यास असून गुरुचरित्रांत (अध्याय ३६) त्यांचें स्पष्टीकरण दिलेलें आहे. 'पूजातत्त्व व यज्ञतत्त्व' ह्या दोन उत्तम बंगाली सत्पुरुषाच्या ग्रंथांत विधानासह न्यास व मुद्रा ह्यांचें स्पष्टीकरण केलें आहे त्याचें हिंदी भाषांतर अलीकडे डॉ. गोपिनाथ कविराज यांनीं केलें आहे. तसेंच गायत्री मंत्राच्या प्रत्येक अक्षर त्यांचीं तत्त्वें, त्याचे न्यास मुद्रा हीं दण्डीस्वामींच्या 'मानवता पूर्तिसाधना'त पृष्ठ १६१ यांत पहा. (गो. प्र. भा.)

शापाच्या नाशाकरिता व पूर्वजन्मसंभूत पापाच्या शमनार्थ आणखी एक संजनन (संजीवन) नावाचा विधि सांगितला आहे.

३. **संजनन** : चंदनाच्या अथवा आम्रवृक्षाच्या पाटावर कस्तुरी व केशर यांच्या गंधानें पंचकोणात्मक यंत्र लिहावें व एकावन मातृकारूपी सरस्वतीचें आवाहन करावें (एकावन मातृका–अक्षरें वा वर्ण लिहून) यथाविधि श्रीसरस्वतीची श्रीसरस्वतीबीजानें (ऐं) षोडशोपचार पूजा करून, इष्टमंत्राचा एकशेंआठ वेळा जप करावा. नंतर गुरूनीं सांगितल्याप्रमाणें पात्रस्थित लिखित मंत्रातील विसर्ग, स्वर, व्यंजन, बिंदु आदि अक्षरें पूजा केलेल्या पाटावरून आपल्या दृष्टीनें व भावनेनें आपल्या मनात ध्यानानें आणावीं, ह्याला मंत्राचें संजनन म्हणतात.

४. **जीवन** : मंत्राच्या आदि व अंतीं प्रणव योजून त्याचा एकशें-आठ जप करावा.

५. **ताडन** : भूर्जपत्रावर इष्टमंत्र गोरोचन व केशर यांनीं लिहून काढावा, व 'य' या वायुबीजानें म्हणजेच बीजाचा उच्चार करून बिल्वयष्टीनें भूर्जपत्रावर लिहिलेल्या मंत्राक्षरांतील प्रत्येक अक्षरावर शंभर वेळा ताडन करावें. याप्रमाणे कुंठित झालेले शाबरमंत्र ताडनानें सिद्धि-दायक होतात.

६. **बोधन** : पूर्वीं वर्णन केलेल्या पाटावर इष्टमंत्राचीं अक्षरें लिहावीं आणि मंत्राक्षरांइतकीं करवीरकुसुमें आणून, वन्हिबीजाचा (र) उच्चार प्रत्येक मंत्राक्षराबरोबर करून एक एक फूल त्या पाटावर वहावें ह्या क्रियेला बोधन म्हणतात.

७. **अभिषेक** : पूर्वीप्रमाणें पाटावर पूर्वी सांगितलेल्या द्रव्यांनीं अष्टदल कमल काढावें त्या कमलाच्या कर्णिकावर मालतीच्या कळीनें मंत्रांत जितकीं अक्षरें असतील तितक्या वेळा मंत्रातील एक एक अक्षर लिहावें. नंतर पिंपळाचीं पानें घेऊन त्यांनीं मंत्राचा उच्चार करितांना शेवटीं 'नमः' असें म्हणून त्या मंत्रावर सिंचन करावें अशा एकशेंआठ

वेळा सुगंधि द्रव्यांनी मंत्रावर अभिषेक केला तर त्या विधीस अभिषेक असें म्हणतात.

८. **विमलीकरण** : मूलाधारातील अग्निमंडलांत 'ॐ ह्रौं' या मंत्रानें इष्टमंत्र दग्ध झालेला आहे, असें चिंतन करावें. मंत्रामध्यें आणव, कार्मिक आणि मायिक असे तीन[1] प्रकारचे मल असतात. वरील ज्योतिर्मंत्रानें म्हणजे 'ॐ ह्रौं' या मंत्रानें हे मल दग्ध झाले आहेत असें चिंतन करावें, ह्या विधीला विमलीकरण म्हणतात.

९. **आप्यायन** : पूर्वीप्रमाणें पाटावर कुंकुमादि द्रव्यांनी इष्टमंत्र लिहून काढावा. ताम्रादिपात्रांत कर्पूरवासित जल भरावें व त्यांत इष्टमंत्र १०८ वेळा कुशपुंजानें (दर्भांनीं) वरील पाटावर व ताम्रपात्रावर मंत्राक्षराच्या संख्येच्या प्रमाणानें प्रत्येक मंत्राक्षर तीन वेळा म्हणून प्रोक्षण करावें.

१०. **तर्पणम्** : पूर्वी लिहिल्याप्रमाणें ताम्रपात्रांत कस्तूरी कुंकुमादि युक्त जलानें मंत्र लिहावा. दुसऱ्या भांड्यांत कर्पूरवासित जल घेऊन मंत्रान्तीं 'तर्पयामि नमः' असें म्हणून १०८ वेळा तर्पण करावें.

११. **दीपनं** : 'ॐ ह्रीं श्रीं' हीं बीजें लावून इष्टमंत्र १०८ वेळा जपावा.

१२. **गोपनं** : मंत्र गुरूकडून घेतल्यावर तो कोणास सांगू नये. हे गोपन होय

असे हे बारा संस्कार झाले यानंतर जप, होम, तर्पण, ब्राह्मणभोजन असे चार मिळून मंत्राचे सोळा संस्कार झाले.

---

१. तीन प्रकारचे मल : पुरुषोद्भूत मलास 'कार्म्मण'मल स्त्री उद्भूत मलास (दोषास) 'मायिक'मल व दोघांपासूनच्या मलास 'आनव' मल म्हणतात. हे मल बाधक असतात, म्हणून ते दोष नष्ट होण्यासाठीं 'ॐ ह्रौं'' ह्या ज्योतिर्मंत्रानें मूळ मंत्राच्या वर्णांना सुवर्ण, दर्भ किंवा पुष्प या जलानें सिंचन करावयाचें. (सरस्वती-तंत्र—गो. प्र भा)

## मंत्रशक्ति जागृतीचा परिचय

मागील स्तभात मत्रशक्ति जागृत करण्याचें विधान व जागृत झाल्याचीं चिन्हे याचे वर्णन झाल्यावर पुराणकालीं मानवाच्या ठिकाणीं मत्रशक्ति जागृत असल्यानें त्या शक्तीचे उपयोग कसे झाले या मुद्याकडे वळू रामायणकालीं श्रीविश्वामित्रऋषींनी रामलक्ष्मण यास 'बलातिबला' विद्या दिली. *अगस्ति ऋषींनी श्रीरामास व लक्ष्मणास शिवपञ्चाक्षरी मत्रदीक्षा दिली* व वसिष्ठाना श्रीविद्येचा मत्र दिला व मत्रसिद्धिही दिली लोपामुद्रेनें सीता देवीस अष्टादशाक्षरी विद्या दिली. पोलस्त्यऋषींनी मत्रवेत्त्या रावणास श्रीविद्याउपदेश केला, व इद्रजितास अग्निविद्या दिली व या विद्याचे त्याना उपयोगही झाले महाभारतकालीं द्रोणाचार्यांनी मत्रशक्तीपैकीं मत्रविद्या, व अस्त्रविद्या साध्य केली होती, ही गोष्ट प्रसिद्धच आहे मत्रविद्या, अस्त्रविद्या व शस्त्रविद्या अवगत असूनही द्रुपद राजाकडून त्याला मान मिळाला नाहीं व गुरुकुल स्थापन करून ज्ञानदान करण्याचे सोडून धृतराष्ट्राकडे त्यास जावें लागले धृतराष्ट्र व पडू याचीं मुलें कदुकक्रीडा करीत असता त्याचा कदुक एका विहिरींत पडला मुलाना वाईट वाटले. परतु त्या ठिकाणीं सहजासहजीं श्रीद्रोणाचार्य आले व त्यानी आपल्या मत्रसामर्थ्यानें कदुक काढून दिला त्यावेळीं मुलानी घरीं जाऊन ही बातमी श्रीभीष्माचार्यांस सागितली तेव्हा हा ब्राह्मण कोण असा शोध काढून ते श्रीद्रोणाचार्य होते हे पाहून आपल्या नातवास मत्रास्त्र व अस्त्रविद्या शिकविण्याकरिता श्रीद्रोणाचार्यांस ठेऊन घेतलें हा भारतकालीन मत्रविद्येचा परिणाम आहे *गुरुगृहीं मुलास पाठविण्याच्या ऐवजी घरीच शिक्षक ठेवण्याची प्रथा श्रीभीष्माचार्यांनी पाडली. ही गोष्टच ब्राह्मणांच्या तेजोभगाला कारणीभूत झाली व क्षत्रियानांही ही प्रथा विनाशकारक झाली.* कारण कौरव मडळी गुरुगृहीं राहून विद्या न शिकल्यानें उद्दट व अहतामय झाले पाडवही तसेच झाले असते पण

संकटपरंपरेने घेरल्याने व श्रीकृष्णाचा आश्रय असल्यानें ते इतक्या अल्पपणाच्या नीच वृत्तीस पोचले नाहींत. हें थोडें विषयांतर झालें. परंतु त्यास नाइलाज आहे. कारण ब्राह्मणवर्गाच्या मंत्रविद्येच्या ऱ्हासाचा तो पाया आहे म्हणून त्याबद्दल लिहिणें आवश्यक वाटलें.

श्रीधर्मराजानी सूर्योपासना करून सूर्यमंत्र साध्य केला होता. त्याचें फळ एकदा स्वयंपाक करून थालीमध्ये ठेवल्यावर सायंकाळपर्यंत कितीही मनुष्य भोजनास आले तरी त्यास तें अन्न पुरत असे. श्रीभीमाना नवनागाचें बळ याच मंत्रशक्तीनेंच प्राप्त झाले होतें. श्रीअर्जुनाने पाशुपत विद्या साध्य केली होती. नकुळसहदेव यानीही पशुविद्या साध्य केली होती. भीष्माचार्यांना मंत्रविद्या व अस्त्रविद्या परशुरामानीं दिली. कर्णानें सूर्यदेवतेची आराधना करून कवच संपादन केलें होतें. हें कवच म्हणजे कांहीं स्थूल सृष्टींतील शरीरत्राण नव्हे, तर *सूर्यकवचाची मंत्रशक्तीच होय*. दुर्योधनानें नाभिविद्या साध्य केली होती. भारतीय युद्ध संपल्यावर दुर्योधन एका तळ्यात जाऊन बसला त्याला शोधण्याकरिता श्रीकृष्ण आणि श्रीभीम आले व त्याला पाहिल्याबरोबर श्रीभीम तळ्यात उडी टाकू लागला तेव्हा श्रीकृष्णानी सांगितलें कीं दुर्योधनाला नाभिविद्या अवगत आहे. तळ्यात तू गेलास तर त्या विद्येच्या योगानें तुझा नाश होईल. पुढें श्रीभीमानें तीरावरून दुरुत्तरें केल्यानें दुर्योधनाला बाहेर पडण्याचा मोह झाला व तो भीमाकरवीं मारला गेला. असो.

रामायणकालीं ऋषींचे मोठमोठे आश्रम अरण्यात असत. त्याचें संरक्षण व संगोपन राजाकडून होत असे या आश्रमातून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या वर्णांच्या विद्यार्थ्यांस त्यांच्या वर्णानुकूल व्यावहारिक विद्या देण्यात येत असे, व मंत्रविद्या व अस्त्रविद्या, ब्राह्मण व क्षत्रियवर्णांस दिली जात असे पुढें भारतकालात मंत्रविद्यासंपादनार्थ गुरुगृहीं न पाठविता गुरूलाच नोकर ठेवण्याची प्रथा सुरू झाली त्यामुळें ऋषींची ज्ञानदानाची आश्रमसंस्था लयास जाऊ लागली व मंत्रयज्ञसंस्थेंत जसा आथर्वणवेदी

ब्राह्मण असावा असा नियम आहे, त्याप्रमाणेंच पुढें मंत्रशास्त्रज्ञ शुद्धाचरणी आचार्य प्रत्येक राजाच्या पदरीं असावा असा निर्बंध घालण्यात येत असे परतु त्या नतरच्या कालात ही प्रथा बदलली.

भारतीय युद्धात कौरवपाडव याच्या सैन्यात अनार्य म्हणजे वर्णाश्रमधर्मविहीन लोक आले होते. *त्याच्या पाठीमागून पुष्कळ अनार्य लोक भारतवर्षांत कायमचे येऊन राहिले.* आर्य लोकातील *वर्णाश्रमधर्माच्या* कडक बधनाना कटाळलेले आर्यही ह्या अनार्य लोकात सामील होऊन राहू लागले. अशा लोकाचा उद्धार व्हावा म्हणून त्याच्यात आगमोक्त विधीनें सस्कार करण्याचा प्रघात सुरू झाला. कारण त्या लोकाचे सस्कारविधि होऊ शकले नाहींत. याबद्दल उहापोह मागें आलाच आहे. भागवतात एकादश स्कधात जनक व नवयोगी याचा सवाद आलेला आहे. *त्या नव योग्यांनी नवनाथ या रूपानें दहाव्या शतकात अवतार* घेतले व त्यानीं ह्या आगमोक्त धर्माचा प्रचार केला ह्या नवनाथानीं धर्मप्रसाराकरिता सस्कृत, हिंदी, मराठी, कानडी, बगाली, अरबी, ह्या भाषातून ग्रथरचना करून नाथपथ स्थापन केला.

नाथपथातील कडक बधनाना कटाळून किंवा वैदिक मत्रसस्थेंतील पशुहिंसा नापसत झाल्यानें जैन साप्रदाय वैदिक परपरेंतून बाहेर पडला. नागार्जुनासारखे शबर मत्रसिद्धि सपादन केलेले सिद्ध होऊन गेले नागार्जुन हा पूर्वींचा ब्राह्मण होता, परतु मत्रसिद्धीच्या सपादनाकरिता तो जैन साप्रदायात गेला व मत्रसिद्धि सपादन केल्यानर पुन्हा प्रायश्चित्त घेऊन ब्राह्मण धर्मानें वागू लागला आगममार्गांत अथवा तत्रमार्गांत प्रसिद्ध असलेले तारा, बगला, धूमावती असे मत्र नागार्जुनानें सिद्ध केले होते. मत्रसिद्धीनें आकाशगमन म्हणजे अतराळातून वायुवेगानें जाता येणे ही सिद्धि त्यानीं सपादन केली होती आगममार्गांत किंवा तत्रमार्गांत पातजल योगाच्याच क्रिया प्रकारानें वर्णन केलेल्या आहेत अशा पातजल योगातील अष्टमहासिद्धि जैनाचार्यांनी साध्य केल्या होत्या, असे दाखले

जैन ग्रंथातून उपलब्ध आहेत. मणि व औषधी, या साधनांनीहि सिद्धि प्राप्त होतात. जैन ग्रंथातून व नागार्जुनप्रणित ग्रंथातून औषधी-मणी व मंत्र यांचे वर्णन विस्तारानें केलेलें आढळतें. विद्या ही सर्वांपासून घ्यावी असा नियम आहे. म्हणून न्याय, व्याकरण, अलंकार इत्यादि जैनग्रंथ वैदिक लोकांनी म्हणजे वर्णाश्रम धर्मपालन करणाऱ्यांनीही शिरसावंद्य मानले. अतएव जैन सांप्रदायाची जी उन्नति झाली ती मंत्र सिद्धीनेंच झाली. *जैन सांप्रदायातील विद्यालयांत ज्ञानसंपादन करून कुमारिलभट्टांनी* जैनांच्या मंत्रविद्येवर ताण करून सुधन्वा राजाच्या दरबारात जैन पंडिताशीं वाद करून त्यास जिंकलें. परंतु पुन्हा जैन-मंत्रवेत्त्यांनी एका *घटात नाग ठेवून तो बंद केला व त्या घटातील वस्तू कुमारिलभट्टांनी* सांगितली तर आम्ही हरलो अशी पैज घातली त्यावेळी कुमारिलभट्टांनी मंत्रसामर्थ्यानें प्राप्त झालेल्या अतींद्रिय ज्ञानानें घटांत नाग आहे व त्यावर शेषशाई भगवान आहे असें सांगितले व घट उघडून पाहताच शेषशाई भगवानाची मूर्ती शेषावर दिसली त्यामुळें जैन पंडिताचा पराभव झाला. *मंत्रविद्येनेंच आर्यधर्माचा विजय झाला.*

जैन सांप्रदायामागून गौतमबुद्धाच्या बौद्धधर्माचा प्रसार झाला बौद्ध-धर्माचा प्रसार आर्यावर्तांतच नव्हे तर चीन, जपान, आसाम, सीलोन, *मलाया, मेक्सिको, वगैरे सर्व देशात झाला. बौद्ध सांप्रदायात हीनयान* व महायान असे भेद पडले. या दोन्ही पंथभेदांत मंत्राचें महत्त्व होतें व आहे. चीन देशात आर्यावर्तांतूनच एक पद्मसंभव नामक बौद्धधर्मी ब्राह्मण गेला व त्याने महायान पंथातील मंत्रयोगाची तत्कालीन चिनी लोकांस दीक्षा दिली. *त्या* महायान सांप्रदायात नीलसरस्वती, पद्मावती, गौरी व *धूमावती ह्या विद्यांचा प्रचार फार झाला.* तिबेटातील *लामागुरु हे या* महायान सांप्रदायातील गुरु होत. पाश्चिमात्य लोक तिबेटात राहून लामागुरूंचे चेले होऊन त्यांचेकडूनच मंत्रविद्या व तदंगभूत कमी दर्जाचे चमत्कार करावयास शिकून येतात. 'थियोडोर इलियान' यानें (इन

सीक्रेट तिबेट) 'तिबेटातील गुह्यमार्ग' या विषयावर ग्रंथ लिहिला आहे. त्यात त्याने आजही दर तासास पधरा मैल भूमीला स्पर्श न करिता प्रवास करणारे लाग गम पास (Long gam pass) या नावाच्या साधूचा अनुभव दिला आहे. आजमितीसही तिबेटात मत्रविद्येची गुह्य साधनें चालू आहेत असें ऐकिवात आहे. व त्या साधनाच्या योगानेच आजकाल पर्यंत तिबेट व तिबेटातील लामा हे प्रसिद्धीस पावलेले आहेत. आज तिबेट देश चीनच्या अकित आहे तरी तेथें मत्रविद्येत प्रवीण लामा आहेत.[१]

जैन व बौद्ध साप्रदायात मत्रविद्येची किती महती होती हे वरील वर्णनावरून दिसून येतें. नाथसाप्रदायातील सिद्ध पुरुषानी मत्रसिद्धीनें पुष्कळ चमत्कार केले. याचे वर्णन नवनाथभक्तिसार ह्या मराठी ग्रथात आले आहे. त्याचे पुन्हा येथें चर्वितचर्वण करण्यात येत नाहा. मत्रसिद्धीचा उपयोग नवनाथाना पुष्कळ केलेला आहे एवढें खरें. नाथ साप्रदायाचे आखाडे उत्तर हिंदुस्थानात हिमालयाच्या पायथ्याशीं अथवा नेपाळ-भूतानसारख्या हिमालयातील गिरिकदरात उपलब्ध आहेत व त्या आखाड्यातील गुरूचे ठायी अद्यापही मत्रविद्या जागृत आहे. तसे आखाडे (नाथपथीयाचे) भारतवर्षांतील दक्षिण भारतवर्षांत दिसून येत नाहीत. म्हणजे नाथसाप्रदायातील मत्रविद्येचा दक्षिणभारतात लोप झालेला आहे. श्रीगोरखनाथाचे मराठी व सस्कृत भाषेंत योग या विषयावर काहीं ग्रथ आहेत, परतु महाराष्ट्रदेशात गोरक्षाचा आखाडा कोठेच उपलब्ध

१. तिबेटी लामा विपुल् शरीर धारण करून हवे तिकडे भ्रमण करणारे, सूक्ष्म शरीराने पचभौतिक देहातून बाहेर पडून कार्य करून येणार बरेच लामा आहेत. त्यापैकीं T Lobsang Rampa (वय सुमारें ६०० श व त्याचे गुरु Dondrup Rampa वय सुमार १७०० श) हे जिवत असून ते विश्व सचारा आहेत असें T Lobsang Rampa ह्याच्या अनेक इग्रजी ग्रथां वरून दिसत सध्या भारतात असलेले तिबटी लामा ह्या गूढमत्रविद्येत फार पुढे गलेले आहेत. (गो. प्र. भा.)

नाहीं. श्रीत्र्यंबकेश्वराचे ब्रह्मगिरीचे पर्वतावर एक गोरक्षाची गुहा दाखविण्यात येते. व पर्वताचे पायथ्याशीं एक लहान आखाडाही आहे. परंतु त्या आखाड्यात मंत्रसिद्धीची परंपरा दिसत नाहीं.

महाराष्ट्रात नाथसांप्रदाय, श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीनिवृत्तिमहाराज यांचेपासून प्रचारात आहे. परंतु निवृत्तिनाथांनी अथवा श्रीज्ञानेश्वरांनीं मंत्रविद्येची माहिती कोणास दिली नसावी व दिली असल्यास ती परंपरा लुप्त झाली आहे. लेखकाचे ऐकिवात असें आहे कीं, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत मराठी भाषेंत मंत्र सांगितले आहेत. व पारा साध्य करण्याची क्रिया, व औषधी वनस्पतींच्या साह्यानें ताम्र्यापासून सुवर्ण बनविण्याची क्रिया सकेतानें सांगितली आहे. तथापि क्रियेच्या उद्‌बोधक अशा कांही ओव्या लेखकास मिळाल्या आहेत. परंतु त्यांचे वर्णन करणें हा या ग्रंथाचा उद्देश नसल्यानें त्या येथें देण्यात येत नाहींत. परंतु वर लिहिल्याप्रमाणें ज्ञानेश्वरींतील मंत्रविद्या व क्रिया यांची परंपरा नष्ट झाल्यानें मंत्रविद्या व क्रियेची विधानें नष्ट झालीं आहेत. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात इच्छापूर्ति साध्य करण्याचा एक मंत्र आहे असें लेखकास समजलें आहे.

एकंदरींत महाराष्ट्रात नाथसांप्रदायिक मंडळींत भजनपरंपरा चालू आहे व मंत्रविद्या बरीक त्यास अवगत नाहीं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या अभंगात भागवतातील द्वादशाक्षरी मंत्राचा अनुवाद करून तो मंत्र जपावा असें नमूद केलें आहे व ज्ञानेश्वरीचा प्रत्यक्ष उपदेश झालेले आळंदीक्षेत्रात समाधिस्थ झालेले श्रीनरसिंहसरस्वतीमहाराज यांचे शिष्य श्रीअण्णासाहेबमहाराज आपदेव, आपदेवपुरा, नागपूर यांचेकडून लेखकास श्री वैष्णवी महाविद्या नावाचा महामंत्र मिळालेला आहे व श्रीज्ञाननाथ, सत्यामलनाथ, गुप्तनाथ, (ताईमहाराज देशपांडे) व चित्रकूट मठस्थ कै. वा. योगाभ्यानंद श्रीमाधवनाथ महाराजांकडून ते देवलोकीं गेल्यावर ऋग्वेदांतील मन्युसूक्त म्हणत जा असा संदेश मिळाला आहे परंतु वैष्णवी

महाविद्या व मन्युसूक्ताचें विधान त्यास आयुष्याच्या चरम भागात मिळाल्यामुळे ती विद्या मिळूनही निरर्थक झाली आहे. सागावयाची गोष्ट ही की, आज नाथसाप्रदायिकापैकीं मत्रसिद्धि झालेले पुरुष क्वचितच पाहण्यात येतात

श्रीनाथसाप्रदायाचा महमदी धर्मांतील लोकावर व विशेषत. महमदी धर्मांतील सुफी पथावर इतका पगडा बसला कीं सुफी पथी लोक गहिनीनाथाना गैबी अवलिया, मत्स्येंद्रनाथाना बावा मलग (मुबई कल्याण-जवळील डोगरावर हें स्थान आहे, तेथील पुजारी वशपरपरा केतकर या आडनावाचे कल्याण येथील ब्राह्मण आहेत.) व इतर नवनाथाना निरनिराळीं नावें देऊन त्याच्या भजनीं लागलेले होते व आहेत. गहिनीनाथानीं व गोरखनाथानीं महमदीय शिष्याकरिता हिंदी व अरबी भाषेंत मत्र केलेले आहेत व ते मत्र महमदीय फकीर मडळींत जागृत आहेत. आजकाल पुणे, सातारा, सोलापूर, मुबई, वाई इत्यादि ठिकाणीं महमदीय फकीर, मराठे लोक व त्याच्या बायाबापड्या यास उसण, पोटदुखीसारख्या रोगाच्या वेदनापासून बरे करिताना रस्त्यातून दिसतात व कायमचा उपाय करण्याकरिता रोग्याना दर्ग्यावर बोलावून पुढें मुसलमान करून घेण्याची युक्ती करितात. अशा वेळीं नाथसप्रदायी मत्रसिद्ध पुरुष पुढें येऊन त्यानीं आपला साप्रदाय वाढविला पाहिजे व अशा प्रकारानें परधर्मीयाचें हिंदुधर्मावरील आक्रमण बद केलें पाहिजे

महमदीयाच्या स्वाऱ्या भारतवर्षावर होऊ लागल्या त्यावेळपर्यंत उत्तर हिंदुस्थानात प्रत्येक रजपूत सस्थानिकाच्या दरबारात राजपुरोहित असे तो मत्र सिद्ध केलेला, सिद्धमात्रिक असावा लागे महमद घोरी व रज-पुताच्या लढाया चालल्या असता कनोजचा राजा पृथ्वीराज चव्हाण व महमद घोरीची लढाई सुरू झाली. राजाचा मामा, राजा जयचद राठोड हा महमद घोरीला मिळाला होता. तेव्हा राजाच्या पुरोहितानें एक बाण मत्रून दिला व सागितलें कीं महमद घोरीवर हा बाण मारल्यास

तर तो ह्या बाणानें मरेल. परंतु त्या राजानें तो बाण राजा जयचंदावर मारला व तो मेला. नंतर महंमद घोरीनें त्या राजाचा पराभव केला व दिल्लीची हिंदुपदपादशाही बुडाली. राजपुरोहितानें सांगितलेलें राजानें ऐकिलें असतें तर हिंदुपदपादशाही लवकर लयास गेली नसती. सांगण्याचा हेतु की, त्या वेळेपर्यंत राजपुरोहितामध्यें मंत्रसिद्ध पुरुष असत.

१८५७ सालच्या बंडाच्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांतील एक संस्थानिक बंडांत सामील झाले नाहींत व इंग्रजासही मिळाले नाहींत. राजधानी सोडून निघून गेले. त्यावेळीं तेथें वैद्य आडनावाच्या अथर्ववेदी ब्राह्मणाचें घराणें मंत्रसिद्धीकरितां प्रख्यात होतें. त्या संस्थानाचे अधिपति राजधानी सोडून गेले असें पाहून इंग्रजाचें सैन्य त्या संस्थानिकाची राजधानी सर करण्याकरितां निघालें. त्या प्रसंगीं तेथील राणीसाहेबांनीं वैद्य नांवाच्या ब्राह्मणाकडे निरोप पाठविला. राज्य बुडण्याची वेळ आली तेव्हां आपल्या मंत्रसिद्धीचा उपयोग करून राज्यरक्षण करा. तेव्हां त्या सिद्ध मांत्रिकानी 'धूमावती महाविद्येचा' प्रयोग केला त्या प्रयोगाचा परिणाम असा झाला कीं, इंग्रजाच्या सैन्यांत धूर भरमसाट पसरला व धुरामुळें सर्व सैनिक हतबल झाले व राजधानी सर करण्याचा विचार सोडून इंग्रजी सैन्य परत गेलें. त्या वैद्य घराण्यातील तिसऱ्या पिढीचें गृहस्थ आज तेथें हयात आहेत. परंतु ती विद्या त्याचेजवळ सिद्ध नाहीं. अशी ऐकीव माहिती लेखकास मिळाली आहे.

पिसाळलेल्या कुत्र्याचा, विंचवाच्या दंशाचा, नागाच्या दंशाचा परिहार करणारे मंत्र हल्लींही अनुभवांत येतात. पिसाळलेल्या कुत्र्याच्या मंत्राचे ज्ञाते गृहस्थ लेखकास माहीत आहेत दर शनिवारीं भिजवलेल्या पिठाचे दोन गोळे दोघास घ्यावयाचे दोघे म्हणजे एक मांत्रिक व दुसरा विषबाधा झालेला इसम. नंतर ते दोन्ही गोळे हातांत घेऊन मांत्रिक मंत्र म्हणत असतो. पंधरा मिनिटांनीं ते गोळे उकलले तर त्या दोघांच्याही डोळ्यांतून पिसाळलेल्या कुत्र्याच्या रंगाचे केस निघतात. असा विधी चार

शनिवार केला तर तो पिसाळलेल्या कुत्र्याचा दश बरा होतो असेच विंचवाचे व नागाचे मात्रिक लेखकास माहीत आहेत

## मंत्रसिद्धि नष्ट झाल्याचे स्वरूप

याप्रमाणे मत्रसिद्धीपासून काय परिणाम झाले व होतात हे वर्णन वर केले. आता प्रस्तुत काळी मत्रसिद्ध पुरुष नसल्याने विशेषत ब्राह्मण-वर्गाची किती हीन स्थिति झाली आहे हे सागण्याचे कारण नाही वैदिक ब्राह्मणास यजमानाच्या घरीं पाटभाडीं करण्यापासून मुलास सांभाळण्याचे व मुलास दूध पाजण्याचींही कर्मे करावीं लागतात व गुरुजी, आचार्य या नावाच्या ऐवजीं, भटजी, भटो, अशीं नावे त्यास पडली आहेत ! व वैदिक ब्राह्मणानीही आपला दर्जा ठेवला नाही वेद पढून नव्हे तर हव्यकव्य नित्य नैमित्तिक कर्मे करण्यापुरतेंच ज्ञान सपादन करून भिक्षुकीचा धदा सुरू करण्यात येतो. सस्कृत भाषा येत नसल्याने श्राद्धादि सकल्पाचे वेळी विभक्तिप्रत्ययही बरोबर लावता न आल्यान अल्पसस्कृत शिकलेले यजमान त्याची थट्टा करितात व ती थट्टा त्यास सहन करावी लागते गगेवरून स्नान करून जाणाऱ्या ब्राह्मणास आज असा प्रसग आला आहे कीं, मला शिवू नको असे म्हणण्याची त्याला शक्ति राहिली नाही कारण वेदविद्या पूर्ण न झाल्यान व वैदिक किंवा पौराणिक अथवा आगमोक्त मत्र त्यानें सिद्ध केलेले नसल्यानें त्याच्या ठायीं ब्राह्मणतेज राहतच नाही जोडे विकण्याचा धदा ब्राह्मण करावयास लागले दूध, तेल, तूप आदि रसविक्री करावयास लागले अशा वेळी इतरानी ब्राह्मणास दोष दिला तर त्यात इतर वर्गाचा काय दोष आहे? वैदिक ब्राह्मणाचीं मुले आग्लविद्या शिकावयास लागलीं व वरिष्ठाची हाजी हाजी करावयास लागलीं ! इतकी अवनत दशा ब्राह्मणवर्गास प्राप्त झाली आहे !

अशा रीतीनें ब्राह्मणवर्गास परमावधीची नीच दशा प्राप्त झाली असताना ब्राह्मणवर्गानें (तो ब्राह्मण गृहस्थ असो किंवा वैदिक अथवा भिक्षुक असो)

सिंहावलोकन करण्याची वेळ प्राप्त झाली आहे. आज असा काल आला आहे की ब्राह्मणवर्गाला ब्राह्मण्य नकोसें झालें आहे. उदरभरणाकरितां ब्राह्मणवर्ग नोकरीशिवाय इतर व्यवसाय करण्यास तयार नाहीं. सदाचार सुटत चालले आहेत. ब्राह्मण इराणी चहावाल्याच्या दुकानीं जाऊन चहा पिऊं लागले आहेत. गृहस्थ म्हणून जो वर्ग तो फारच बहकला आहे. संध्या सर्वस्वी लोपत चालली आहे. मौजीबंधन हा एक चैनीचा विधि होऊन बसला आहे. मौजीबंधन झाल्यावेळेपासूनच संध्या भटजी करतील असें मुलें म्हणूं लागलीं आहेत. शिखानष्टांप्रमाणें शिखेला रजा मिळाली आहे. यज्ञोपवीतही नष्ट होत चाललें आहे. ब्राह्मणवर्गांत जन्म झाला याचा त्या ब्राह्मणपुत्रांनां विषाद व दुःख वाटूं लागलें आहे. अशा प्रकारची अवनति होत असल्यानें आर्यसंस्कृतीचे तारूं फुटण्याच्या पंथास लागले आहे.

असे अवनतीचे काळ पूर्वीही येऊन गेले. श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या वेळीं त्यांचे उद्‌गार असे आहेत. किती एक दावलमलकास भजती, ब्राह्मण ब्राह्मण्यापासून भ्रष्टले, अशा वेळीं श्रीसमर्थादि साधुसंतांच्या परिश्रमानें बिघडलेली घडी पुन्हां बसली. परंतु हल्लीचा काळ त्या समर्थ काळापेक्षांही कठीण आहे. पाश्चिमात्यांच्या शिक्षणानें वेदांवर व वर्णाश्रम धर्मावर श्रद्धा राहिली नाहीं. वाडवडिलांबद्दल पूज्य बुद्धि नष्ट झाली आहे. अर्थ पुरुषार्थ व काम पुरुषार्थ यांखेरीज दुसरे पुरुषार्थच दिसेनासे झाले. नानाप्रकारचीं व्यसनें सुरू झालीं व नाना प्रकारचे रोग सुरू झाले. पंचवीस वर्षांची मुलगी वृद्धावस्थेस पोचली व पंचवीस वर्षांच्या पुरुषास चाळिशी आली !

असो. अशाही परिस्थितींतून आपली संस्कृति टिकविण्याची बुद्धि सुचली तरी संस्कृतीपुनरुज्जीवनाचें कार्य साध्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. श्रीभगवान् रामप्रभूना ही दीन दशा दिसत नाहीं असें नाहीं. आपण ब्राह्मणवर्णीयांनीं प्रयत्न करावयास पाहिजे. ब्राह्मण हे सर्व वर्णांच्या गुरुस्थानीं आहेत. त्यांनींच मनावर घेतल्यास वर्णाश्रम-धर्माची मोडलेली

घडी पुन्हा बसेल. इतर वर्णीयांनी ब्राह्मणवर्णास मान द्यावा अशी इच्छा ब्राह्मणाच्या ठायीं असल्यास त्यांनी गुरुपदास योग्य असेंच आचरण ठेवलें पाहिजे. 'आचारः प्रभवो धर्मः धर्मस्य प्रभुरच्युत.' कृपा व्हावी अशी इच्छा असल्यास त्यांनी रामगीतेंत, 'आदौ स्ववर्णाश्रमवर्णिता. क्रिया कृत्वा' असें सांगितलें आहे. त्याप्रमाणें वर्णाश्रमधर्मांप्रमाणें वागण्यास लागावें. व मंत्रसिद्धि प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नास लागावें.

प्रस्तुतच्या धर्मच्युतीच्या काळ्यातही सत्पुरुषश्रेष्ठ आहेत. त्यांच्याकडे जाऊन परंपरा समजावून घेऊन त्याप्रमाणें आचरण करावें. अजूनही शुद्धबीजाचे ब्राह्मण हयात आहेत. त्यांचेकडे जाऊन परिप्रश्नेन सेवया मंत्रसिद्धि कशी प्राप्त होईल तें विचारावें व ते सांगतील तसें आचरण करावें. ब्राह्मणवर्णांतही अद्यापि शुद्ध बीजाचे ब्राह्मण बालक आहेत. त्यांनी इतरांचे अंधानुकरण न करून शुद्ध आचरणानें मंत्रसिद्धि प्राप्त करून घ्यावी. अशी ब्राह्मणसमाजात सद्बुद्धि उत्पन्न झाल्यास आजकालची अधार्मिकता खास नाहींशी होईल व ब्राह्मणवर्गास पूर्वीचें गुरुत्वाचें स्थान मिळेल.

□ □

**अमृत-मंजिरी**

१ तज्जपस्तदर्थभावनम्.
२ देवदेवता मंत्रांमध्येंच असतात. मंत्रोच्चार होताच त्या प्रकट होतात. त्यांना आवाहन केल्यास त्या येतात तशा आलेल्या देवदेवता विशिष्ट फोटोग्राफीनें दिसतात.
३ जपकार्वे काम संपल्यावर आवाहित देवतांचें विसर्जन करणें जरूरच. तसें न केल्यास त्या येईनाशा होतात.
४ सिद्धि हा नियमबद्ध कपनसिद्ध प्रक्रियेचा परिणाम आहे
५ प्रत्येक गुरु तारक असतोच असें नाहीं, पण गुरुभाव मात्र तारक असतोच.
६. मंत्रजपानें मनुष्याची आकर्षणशक्ति वाढते.

# ४ भारतीय गुरुसंस्था व परंपरा

## गुरु व त्यांचे प्रकार

वर लिहिल्याप्रमाणे मंत्राचे संस्कार झाले. तसेच तत्पूर्वी मनुष्याच्या संस्काराबद्दलही वर्णन केले. मागील स्तभातून वेदमंत्र, आगममंत्र, शाबर-मंत्र व पुराणमंत्र निवेदन केले आहेत व केवळ मंत्र न देता हल्लींच्या काळात काही सत्पुरुषाच्या सहवासानें मंत्रशक्ति जागृत असलेल्या मंत्राचे व त्या सत्पुरुषाचे त्यांच्या परवानगीने नामनिर्देश केले आहेत. मनुष्याच्या संस्काराचे वर्णन करिताना संस्काराबद्दल आधुनिक वाचकास मस्कार घडवून आणण्याची अशक्यताच उभी राहील. तथापि ज्याला मंत्रसामर्थ्य संपादनाची खरी जिज्ञासा उत्पन्न होईल त्याला ते संस्कार कठीण वाटणार नाहींत. या बाबतींत गुरूची आवश्यकता आहे म्हणून गुरु व गुरुतत्त्व या विषयाकडे वळू.

भगवान् पतंजलींनी सेश्वर सांख्य मीमांसेत "क्लेश कर्मविपाकाशयेर-परामृष्टपुरुषविशेष ईश्वर" अशी सगुण परमात्मतत्त्वाची व्याख्या दिली आहे व 'स सर्वेषा गुरु कालेनानवच्छेदात्' व तोच आदिनारायण अप्रतिष्ट काल्पपरंपरेनें सर्वांचा गुरु आहे. भगवान् गोपालकृष्णांनी धनंजयास गीता सांगताना 'बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन। तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप।' असें सांगितलें आहे. श्रीआदिनारायणाचा श्रीकृष्ण अवतार हा पूर्णांशाचा आहे, अशी उक्ति आहे. आदि-नारायणरूपी श्रीमहाविष्णूंनी श्रीब्रह्मदेवास वेद आपल्या हृदयातील परा-

वाणीनें सांगितले. पहिला गुरुशिष्यसंबंध असा आहे. तसेंच आगम मंत्र श्रीशंकरांनी पार्वतीला सांगितले. म्हणजे ही मंत्रदीक्षा प्रत्यक्ष होती. तसेंच ब्रह्मदेवांनी नारदांना दीक्षा दिली. ही दीक्षा प्रत्यक्ष म्हणजे श्रवणेंद्रियानें प्राप्त झालेली. गुरुसंप्रदायाची सुरवात अशी झालेली आहे.

'गृणाति उपदिशति धर्मं गिरति (नाशयति) अज्ञानं, यद्वा गीर्यते स्तूयते देवादिभि, इति गुरु ।'

> अविद्या हृदयग्रंथिबन्धमोक्षो यतो भवेत् ।
> तमेव गुरुरित्याहुर्गुरुशब्देन योगिनः ॥
>
> —भगवान् श्रीशंकराचार्य

तंत्रशास्त्रांत गकार म्हणजे सिद्धिदाता, रेफाचा अर्थ पापनाशक आणि उकार म्हणजे विष्णु, म्हणजे सिद्धि देणारा, पापाचा नाश करणारा व मंगलकारक असा जो पुरुष तोच गुरु होय. अथवा गकार म्हणजे ज्ञान, रेफाचा अर्थ तत्त्व प्रकाशक व उकाराचा अर्थ शिवतादात्म्य करणारा विष्णु असा जो पुरुष तो गुरु होय. गुरुचरित्र अध्याय ३६ यांत 'गुरू'च्या अशाच व्याख्या दिलेल्या आहेत.

कूर्मपुराणांत दहा प्रकारच्या गुरूंचें वर्णन आहे—

> उपाध्यायः पिता माता ज्येष्ठो भ्राता महीपतिः ।
> मातुलः श्वशुरश्चैव मातामह .पितामहौ ॥
> वर्णज्येष्ठः पितृव्यश्च सर्वे ते गुरवः स्मृताः ।

उपेत्य अधीयते म्हणजे अध्ययन करवितो तो उपाध्याय होय.

> एकदेशं तु वेदस्य वेदाङ्गान्यपि वा पुनः
> योऽध्यापयति वृत्यर्थं उपाध्यायः स उच्यते

आपल्या जीविकावृत्तीकरितां वेद आणि वेदाङ्गें पढून दुसऱ्यासही

पढवितो तो उपाध्याय गुरु होय व उपनिषदांसह सर्व वेदादिकांचा जो पाठ देतो तो आचार्य होय.

'यस्मात् पुरुपादयं माणवको धर्मानाचिनोति शिक्षते स आचार्यः' आणि जो–

स्वयमाचरते यस्मादाचारं स्थापयत्यपि।
अचिनोति च शास्त्राणि आचार्यस्तेन सोच्यते॥

मुनींच्या संघाचा अधिपति व संघातील मुनींस जो प्रमादाबद्दल प्रायश्चित्त देतो तो आचार्य होय. महर्षि वसिष्ठांनीं म्हटलें आहे कीं—

उपाध्यायान् दशाचार्या आचार्याणां शतं पिता
पितुर्दशगुणं माता गौरवेणातिरिच्यते

उपाध्यायापेक्षां दसपट आचार्य व आचार्यापेक्षां पिता शतपट व पित्यापेक्षा दसपट माता श्रेष्ठ गुरु आहे.

तथापि आपस्तंब धर्मसूत्रात—

शरीरमेव मातापितरौ जनयतां।
आचार्यस्तु सर्वं पुरुषार्थक्षमं रूपं जनयति॥

मातापिता शरीरच देतात; परतु आचार्य पुरुषार्थ–साधन–सामग्री तयार करितो, म्हणून तो वरिष्ठ होय. 'आचार्यः श्रेष्ठो गुरूणा' (गो. धर्मसूत्र)

'प्र तद्वोचेदमृतं नु विद्वान्। गंधर्वोधाम विभृतं गुहासत्।
त्रीणि पदानि विहिता गुहास्य यस्तानि वेद स पितुः पितासत्॥

वेदविद्या धारण करून त्या विद्येचें प्रवचन करितो, जो ब्रह्मगुहेमध्यें आनदमग्न होऊन राहिला आहे, व त्या गुहेतील तीन पदें जो जाणतो तो पित्याचाही गुरु आहे. ब्रह्माची तीन पदें म्हणजे जागृत, स्वप्न, सुषुप्ति, उत्पत्ति, स्थिति, लय, अथवा 'तत्, त्व, असि' अशा त्रिपदाना

जो जाणतो तो ब्रह्मनिर्दिष्ट गुरु[१] होय.

गुरूनें शिष्याचे समोर प्राणायाम करून शिष्याची समाधि लावणें ही वेधदीक्षाच होय. अशी दीक्षा देणारे गुरु खरे गुरु होत. म्हणात अमुक मंत्र सांगितल्याबरोबर दुसरे दिवसापासूनच त्या मन्त्रोदित सिद्धि शिष्यास प्राप्त होणें ही शब्ददीक्षा. अशा प्रकारच्या गुरूची आवश्यकता मंत्रशास्त्रांतील मन्त्रांच्या दीक्षेस जरूर आहे. 'मम हृदये हृदयं ते अस्तु, मम चित्तमान्वेहि, मम वचमेकमना जुषस्व बृहस्पतिस्त्वा नियुनक्तु मह्यं,'

१. ईश्वरच सर्वांचा आदिगुरु : 'तत्र निरतिशय सर्वज्ञ बीजम् । स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात् ।' (पतंजली–योगदर्शन) ईश्वरात सर्वज्ञतेचें बीज असून तो कालानें अनवच्छिन्न आहे–तसे इतर लोक नाहींत. म्हणून ब्रह्मादि देवांचा तोच गुरु. गुरुगीतादि ग्रंथात (१) 'गु' = अंधकार; 'रु' = तमाचा नाशक; (२) गु – मायादि गुण प्रकाशक; 'रु' – मायाजनित भ्रांतीचा नाशक. (३) गु – सगुण प्रतिपादक; रु – निर्गुण प्रतिपादक (४) 'ग'कार सिद्धिदाता, 'र'कार – पापहर्ता – 'उ'कार – शिव. म्हणून ग्+उ, र्+उ = सिद्धिदाता व पापहर्ता शिव." असे अनेक अर्थबोधक श्लोक आहेत. 'गुरु' हें रक्तमांसजनित स्थूल शरीराचें नांव नसून 'गुरु' ज्ञानाधिकरणाचें नांव आहे.

याज्ञवल्क्य स्मृति, (१) मनुस्मृति यात माता, पिता, अन्नदातादि २० प्रकारचे 'गुरु' सांगितले आहेत. रामदासांनीं दा. बोध द. ५ समास (२) यांत मंत्रगुरु, तंत्रगुरु विद्यागुरु, मातागुरु, पितागुरु इत्यादि १७ प्रकारचे गुरु सांगितले आहेत.

उपास्य देवताही 'गुरु' बनतात. जसें:—जनार्दनस्वामी, दासोपंत, नारायणमहाराज जालवणकर, वासुदेवानंद सरस्वति, नारायण महाराज केडगावकर, पुरोहितस्वामी (शं. गजा. पुरोहित–वकील), ह्याना दत्त या उपास्य देवतेनें गुरुपदेश दिला; समर्थ रामदासस्वामींस रामानें, तुकारामाचे गुरु राघवचैतन्य याना प्रत्यक्ष व्यासानीं, रामकृष्ण परमहंसास कालिमातेनेंच उपदेश दिला.–सारांश, साधकाची तयारी झाली कीं गुरु येतातच. व ते उपदेश देतात. (गो. प्र. भा.)

मंत्रदीक्षा देणारे गुरु, प्रकाशात्मक मंत्राक्षराचा उपदेश करितांना 'मम व्रते हृदयं दधामि' माझ्याप्रमाणे तुझ्या ठिकाणी मंत्राक्षरें प्रकाशमय प्रकट होवोत, असें म्हणून शिष्यास मंत्राक्षरांचा उपदेश करितात, तेव्हां शिष्यास तीं मंत्राक्षरें प्रकाशमय दिसू लागतात. वरील दीक्षांच्या प्रकारापैकीं हाही एक प्रकार आहे.

वरील प्रकारचे गुरु हल्लीं क्वचितच उपलब्ध होतात, म्हणून साधकानें निराश होण्याचें कारण नाहीं यासंबंधीं असें वचन आहे की–'यावन्नानुग्रह साक्षात् जायते परमेश्वरात् तावन्न सद्गुरुं सेव्यं सच्छिष्यश्चापि नो भवेत्' मंत्रसिद्धि सगुण परमेश्वराची भक्ति केल्यानेंही होते, व अशी परमेश्वराची भक्ति म्हणजे परमेश्वराच्या अवतारविभूतींची भक्ति होय पंचोपासना म्हणजे पंच देवोपासना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी प्रस्थापित केली. हीं पंचदेवते म्हणजे गणपती, शिव, हरि, भास्कर आणि जगदंबा अशी होत. साधकाच्या आवडीप्रमाणे ह्या पंचदेवतांचे मंत्र ग्रहण करून पुरश्चरण केलें, तर ह्या मंत्रसिद्धीमुळें देवतादर्शन व देवताप्रसाद होतो व त्या प्रसादानें अष्टमहासिद्धि प्राप्त होतात देवता प्रसन्न होऊनच साधकाची इच्छा पूर्ण करितात, असा अनुभव आहे म्हणून श्रीमदाचार्य, मध्वाचार्य, वल्लभाचार्य, राधापंथी स्वामी, नारायणपंथी, श्रीसमर्थ सांप्रदाय, चैतन्य सांप्रदाय, नाथ सांप्रदाय, वारकरी सांप्रदाय या सांप्रदायांपैकीं परंपराशुद्ध गुरूपासून मंत्र घेतला तरी कार्यसिद्धि होते असें आहे

पिच्छिला तंत्रांत असें लिहिलें आहे कीं, गुरु दोन प्रकारचे आहेत. एक दीक्षागुरु व दुसरा शिक्षागुरु. मंत्राची दीक्षा देणारे ते दीक्षागुरु. हे गुरु शुद्ध पूर्वपरंपरेनें प्राप्त झालेल्या मंत्राची दीक्षा देतात. शिक्षागुरु समाधि, ध्यान, धारणा, जप, स्तव, कवच, पुरश्चरण, महापुरश्चरण आणि *साधनेचे निरनिराळे विधि व योग ह्या सर्व गोष्टी शिकवितात. वस्तुत इष्ट* देवतेचा मंत्र ज्याचेपासून प्राप्त झाला त्याची महती जास्त आहे

कुलागमांत गुरूचे सहा प्रकार सांगितले आहेत. प्रेरक, सूचक,

वाचक, दर्शक, बोधक आणि शिक्षक असे ते सहा भेद आहेत. प्रेरक गुरु म्हणजे दीक्षा व साधना यांचे महत्त्व वर्णन करून साधकाच्या मनात मंत्रग्रहणाबद्दल दीक्षा घेण्याची प्रेरणा करितो तो होय, व सूचकगुरु म्हणजे साधना व दीक्षा यांचे निरनिराळे प्रकार वर्णन करितो तो होय.

वाचक गुरु म्हणजे साधनाचे वर्णन करतो तो होय. कोणती साधना व दीक्षा साधकाला योग्य आहे हें सांगतो तो दर्शक गुरु होय. शिक्षक गुरु म्हणजे योग्य दीक्षा व साधना साधकास शिकवितो तो होय. बोधक गुरु म्हणजे दीक्षा व साधना यांच्याबद्दल तात्त्विक दृष्टीने साधकाच्या सदसद्विवेकबुद्धीला विविध प्रमाणांनी पटेल, अशा रीतीनें स्पष्ट करून सांगतो, तो बोधक गुरु होय. ह्या गुरुषट्कांपैकीं शेवटील बोधक गुरु वरिष्ठ आहे. कारण बुद्धीला पटल्याशिवाय मागील पांच प्रकारच्या गुरूंचे कार्य सफल होणार नाही. भृगुऋषी यांनी सर्व ब्रह्मांडांतील ज्ञान संपादन केल्यावर ते आपले पिते वरुण ऋषी यांचेकडे गेले व "अधीहि, भगवन्ब्रह्मेति" अशी त्यांनी पित्याला पृच्छा केली, तेव्हा "अन्नं ब्रह्मेति व्यजानीयात्" म्हणजे अन्नमयकोश हेच ब्रह्म आहे, याचा विचार कर, व तें पटल्याशिवाय येऊं नको, असें त्यांनी सांगितलें. लिहिण्याचा हेतु हा कीं साधना व दीक्षा यांचा तात्त्विक गूढ अर्थ समजल्याशिवाय व बुद्धीला पटल्याशिवाय साधना व दीक्षा यांचें वर्णन ऐकून कांहीं उपयोग होणार नाहीं म्हणून विस्तारानें वर्णन केलें आहे कीं, साधनाशास्त्र सर्वस्वी गुरुदेवावरच अवलंबून आहे.

पांडवप्रतापाच्या पांचव्या अध्यायांत पुढें दिल्याप्रमाणें 'बारा प्रकारचे गुरु आहेत—

१. धातुवादीगुरु : शिष्याकडून तीर्थाटन करवून नाना साधन सांगून शेवटीं ज्ञानप्राप्ति करून देतो.

२. चंदनगुरु : चंदनवृक्ष जसा आपल्या जवळच्या वृक्षांना आपल्यासारखाच चंदन बनवितो. पण (पण दिगम्बेकर व केलें ? वृक्ष

सोडून) तसा अभक्त शिवायकरून आपल्या केवल समागमानेंच हा गुरु भक्तास तारून नेतो.

३. **विचारगुरु :** नित्यानित्यविचारानें शिष्यास ज्ञान करून देऊन पिपीलिकामार्गानें साक्षात्कार करून देतो.

४. **अनुग्रहगुरु :** शिष्यावर कृपानुग्रह करतो. त्याच्या प्रतापानेंच सायास न होता शिष्यास ज्ञान होतें.

५. **परीसगुरु :** परीस ज्याप्रमाणे स्पर्शमात्रेंकरून लोह तें सुवर्ण बनवितो त्याप्रमाणे स्पर्शानें शिष्यास गुरुत्व प्राप्त होते.

६. **कच्छपगुरु :** कूर्म म्हणजे कासवी ज्याप्रमाणें नुसत्या अवलोकनाने पिलाचें पोषण करिते, त्याप्रमाणे हा कृपावलोकनानेंच शिष्याचा उद्धार करतो.

७ **चंद्रगुरु :** चद्र उदय पावताच चद्रकांतास पाझर फुटतो, त्याप्रमाणे याचे अतर द्रवताच दूरचे शिष्यही तरतात.

८. **दर्पणगुरु :** आरशात पाहिल्याबरोबर आपले मुख आपणास दिसतें. त्याप्रमाणें त्याच्या नुसत्या दर्शनाने स्वरूपज्ञान होतें कसलेच आयास पडत नाहीत.

९. **छायानिधिगुरु :** छायानिधि या नावाचा एक मोठा पक्षी आकाशात फिरत असतो. त्याची छाया ज्याच्यावर पडते तो राजा होतो. त्याप्रमाणे ह्या गुरूची छाया ज्याच्यावर पडते तो तत्काळ स्वानद साम्राज्याधिपति होतो.

१०. **नादनिधिगुरु :** नादनिधि नावाचा मणि आहे ज्या धातूचा ध्वनि त्याच्या कानात पडतो त्या सर्व धातू स्वस्थानीं सुवर्ण बनतात. त्याप्रमाणें मुमुक्षूची करुणवाणी त्याच्या कानीं पडताच मुमुक्षूस दिव्य ज्ञान होतें.

११. **क्रौंचपक्षीगुरु :** क्रौंच नावाची पक्षीण समुद्रतीरीं पिलें ठेवून चारा घेण्यासाठीं सहासहा महिने दूरदेशीं फिरावयास जाते. व वारवार

आकाशाकडे डोळे करून पिलाची आठवण करते. त्या योगाने तेथें पिले पुष्ट होतात. त्याचप्रमाणे हा गुरु ज्याची आठवण करितो ते आपापल्या स्थानी असताच तरून जातात.

१२. सूर्यकांतगुरु : सूर्यदर्शनाने सूर्यकांत मण्यात अथवा भिंगात अग्नी पडतो व खाली धरलेला कापूस जळून जातो. (सूर्याची इच्छा नसतानाही) त्याप्रमाणे ह्या गुरूची दृष्टि जिकडे झळकते ते पुरुष तात्काळ विदेहत्व पावतात.

रुद्रयामलात सांगितले आहे कीं, ग्रंथवाचनानेंच व गुरुप्राप्तीशिवाय जपतपादि साधनें केली तर त्याचा विशेष उपयोग होणार नाही अधिकारी गुरूशिवाय इष्टदेवता साधन प्राप्त होणार नाहीं. गुरुतंत्रात सांगितले आहे कीं, "शिवे रुष्टे गुरुस्त्राता गुरौ रुष्टे न कश्चन । तस्मात् शुद्धमना नित्य तमेवाराधयेत् गुरु" श्रीसमर्थ रामदासस्वामींनी नवविधा भक्तीचे वर्णन करिताना अर्चन व पादसेवन गुरूचेंच करावें असें सांगितले आहे. त्याचें रहस्य हेच होय.

वरील उद्धृत केलेल्या मंत्रग्रंथातील वचनावरून गुरुदेव ही व्यक्ति मनुष्य जीवरूप नसून देवतारूप आहे, असा साधकानें निश्चय करावा. गुरुदेव मनुष्यच आहे अशी शंका घेतली तर ज्याअर्थी ब्रह्मरूपी गुरुशक्ति गुरूचे ठिकाणीं जागृत होते, व देवतेच्या ठिकाणीं देवताशक्ति जागृत झालेली साधकास अनुभवास येते त्या अर्थी ती देवताही मृण्मय, दारुका-मय अगर पाषाणमय नसली पाहिजे, व गुरुदेव ही व्यक्ति मनुष्य नसली पाहिजे. म्हणून आपण घेतलेल्या शंका व्यर्थ आहेत, असा निष्कर्ष काढ-ण्यास काही प्रत्यवाय नाही. वस्तुतः गुरुतत्त्व अविभाज्य, सर्वस्पृक् आणि अनंत आहे. ब्रह्म सर्वव्यापी असल्यानें तें मृत्तिका अथवा पाषाणात आहेच आहे. व म्हणून त्यास विशिष्ट स्थाननिष्ठ म्हणता येत नाही. मृत्तिका अगर पाषाण यापुरतीच जर ब्रह्मरूपाची व्याप्ति रहात नाही, तर एका मनुष्याच्या ठिकाणींच केवळ त्याची व्याप्ति कशी राहील? साधकाला

आपल्या साधनाबलानें अचेतन मूर्तीच्या ठिकाणीं ब्रह्मशक्ति जागृत करितां येते. परंतु जो साधक नाहीं, व अधिकारी साधक होण्याची प्रतीक्षा करीत असतो, त्याला मूर्तीच्या ठिकाणीं प्राणशक्ति जागृत आहे, असा अनुभव येणार नाहीं. म्हणून साधकानें मूर्तीच्या ठिकाणीं प्राणशक्तीची जागृति व सुप्तावस्था यांतील फरक समजण्याची शक्ति गुरुसमार्थ्यानें प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. प्राणशक्ति जागृत करण्याची कला ज्याला अवगत आहे, त्याला अचेतन मूर्तीच्या ठिकाणीं प्राणशक्ति प्रगट करितां येते. मग सचेतन साधकाचे ठिकाणीं जागृत करितां येईल यांत काय संशय ? म्हणून शास्त्रकारांनीं अशा प्रकारच्याच सत्पुरुषाला साधकानें गुरु करावा, असें सांगितलें आहे. *शास्त्रनिपुण गुरूंनां प्राण-*शक्तीची जागृति कशी करावी हें शास्त्राधारें शाब्दिक ज्ञानानें सिद्ध करून दाखवितां येईल, परंतु ही शक्ति बाह्यशक्ति होय. म्हणजे असे गुरु शाब्दे निष्णात असल्याची खात्री पटेल, परंतु गुरु 'परेच निष्णातः' म्हणजे अंतःशक्तिसंपन्न असला पाहिजे. म्हणजे त्याला साधकाचे ठिकाणीं अंतःशक्ति प्रत्यक्ष जागृत करितां आली पाहिजे. म्हणजे तो 'शाब्दे परे च निष्णातः' असा असला पाहिजे व त्यालाच गुरुदेव अथवा सद्गुरु ही पदवी देणें इष्ट आहे. शास्त्रांत गुरूबद्दल इतकी चर्चा करून गुरूची इतकी कसोटी पाहाण्याची आवश्यकता ठेविली आहे, त्याचें कारण वेषधारी गुरु, धंदेवाईक गुरु, बोवाबाजी करणारे गुरु, यांच्यापासून साधकाचा बचाव व्हावा हेंच होय.

*कुलागमांत असें सांगितलें कीं,* दिव्यज्ञान व दिव्यशक्तिसंपन्न सत्पुरुषांनीं ज्या साधकाला उपदेश दिला आहे, व दीक्षा दिली आहे, तो साधक दिव्यज्ञान व दिव्यशक्तिसंपन्न होतो. बाह्यशक्तिसंपन्न अथवा शाब्दिकज्ञान-संपन्न असलेला पुरुष, दुसऱ्याला शब्दज्ञान देईल. म्हणजे मंत्र सांगून देईल. परंतु त्याचे ठिकाणीं मंत्रशक्ति जागृत करून देऊं शकणार नाहीं. ज्याला मंत्रशक्ति अवगत आहे तोच दुसऱ्याला ती देऊं शकेल.

विश्वसार तंत्रात सांगितले आहे की, गुरु सर्वशास्त्रज्ञ, मंत्रशक्तिसंपन्न, सुशोभित, सर्वावयवसंपन्न, संयमी, पितृभक्त, वर्णाश्रमधर्मानुकूल वर्तन करणारा, कुलाचारसंपन्न,कुलीन (कुल म्हणजे मुलाधार चक्र व कुलीन म्हणजे मूलाधारादि षट्चक्र-भेदन जाणणारा), शांतचित्त, शिष्याचे जवळ राहणारा (शिष्य व गुरु एकाच प्रांतात राहणारे असावे), शिष्याची चिंता वाहणारा व ब्राह्मण असावा. भुवनेश्वरी तंत्रात सांगितले आहे की, ब्राह्मण हा सर्व वर्णांना दीक्षा देऊ शकतो. ब्राह्मण उपलब्ध नसेल तर सदाचारसंपन्न क्षत्रिय गुरु वैश्य व शूद्र यांना दीक्षा देण्यास पात्र आहे. व वैश्य गुरूंनी शूद्रास दीक्षा देण्यास हरकत नाही. शाक्तरंगिणींत सांगितले आहे की, शूद्राने शूद्रापासून दीक्षा घेऊ नये.

रुद्रयामलांत सांगितले आहे की पतीनें पत्नीस, पित्यानें कन्येस व पुत्रास, भ्रात्यानें भ्रात्यास दीक्षा देऊ नये. परंतु पति अगर पिता सिद्ध-मांत्रिक असला तर त्याने वरील नियमाला अपवाद म्हणून कन्येला व पुत्राला दीक्षा देण्यास हरकत नाही, असें क्रमार्चनचंद्रिका या ग्रंथात सांगितले आहे. सिद्धमांत्रिक याचा अर्थ असा की ज्याला काली, तारा, षोडशी, भुवनेश्वरी, धूमावती, बगला इत्यादि विद्यांचा उपदेश झालेला आहे तो सिद्धमांत्रिक गुरु होय. तसेंच कालीकल्पांत सांगितलेलें आहे की, तीन पिढ्यांपर्यंत वरील मंत्रांपैकीं एक चालू असेल, तर तो सिद्धमंत्र होतो मत्स्यसूक्तांत सांगितले आहे की, ज्येष्ठ पुत्र अगर कोणताही पुत्र जर सदाचार संपन्न व पितृभक्त असेल तर त्याला पित्यानें मंत्रदीक्षा द्यावी.

रुद्रयामलांत सांगितले आहे की स्त्रियाही गुरुपदवीला योग्य आहेत. पण त्या स्त्रियांच्या पितृस्थानी षट्चक्राचा अभ्यास करणारे पुरुष असावे व 'कुलं तु ब्रह्मशक्तिः स्यात् अकुलं ब्रह्म चोच्यते कुलाकुला मतत्त्वज्ञः कुलीन स च कथ्यते' असा कुलीनाची स्त्री व कुल म्हणजे मूलाधारचक्राचे जवळचे चक्र व अकुल म्हणजे सहस्रार चक्र याच्या ज्ञानानें व अभ्यासानें पुनीत झालेली अशी कुलजा व कुलीन, सदाचारशील, पतिव्रता, पवित्र,

इंद्रियनिग्रही, वृद्धांची सेवा करणारी, मंत्रज्ञ, मंत्रार्थज्ञ, व मंत्रजपपरायण व इष्टदेवताप्रसाद मिळालेली, अशा स्त्रियेपासूनही उपदेश घेता येतो. विधवेला उपदेशाविकार नाहीं तथापि स्त्रियांनी पुत्रांना दीक्षा देण्यास हरकत नाहीं, सिद्धमंत्रसंपन्न स्त्रिया असतील तर त्यांनाही मंत्रदीक्षा देता येते पुत्रसंपन्न सती पतिव्रता आपण होऊन मंत्रदीक्षा देते, असें ती म्हणेल, तर त्या मंत्राचें फल आठपट येतें श्रीसमर्थांना स्त्रियास शिष्य करण्याची आज्ञा दिली होती त्याचा आधार तरी याच रुद्रयामलातील वरील वाक्यावर असावा

स्वप्नांत मंत्र मिळाल्यास गुरु करण्याची आवश्यकता नाहीं तरी गुरूपदेशाचा संस्कार करावयास पाहिजे, तो असा स्नान करून आपले पुढें पाटावर तांदूळ पसरून त्यावर ताम्रपात्र (घट) ठेवावें, त्यात आम्रपल्लव ठेवावें व फुलें वहावीं, व त्यावर स्वप्नांत ज्यांना मंत्र दिला त्यांचें आवाहन करावें मग पिंपळाच्या पानावर कुंकुमानें (केशर) तो मंत्र बिल्व किंवा तुळसीच्या काडीनें लिहावा, गुरूचें ध्यान मनांत आणून तो वाचावा, अशा प्रकारचा स्वप्नमंत्राचा विधि योगिनीतंत्रात सांगितला आहे

गुरुवंश अथवा कुलगुरु म्हणजे आपल्या गुरूचे पुत्रपौत्र असतील त्यास आपल्या पुत्रांनीं किंवा पौत्रांना गुरु करावें परंतु त्यांच्या ठिकाणीं गुरूचीं लक्षणें नसतील तर त्यांना गुरु करूं नये

एकदां गुरुपद कोणास दिल्यावर त्यास जर कांहीं रोग झाला, तरी त्यास आदर दाखविण्याचें विसरूं नये परंतु ज्याला असे रोग असतील त्याला गुरुपद देऊंच नये म्हणजे त्याला गुरु करूं नये

मनाप्रमाणें शुद्धाचरणी गुरु मिळत नाहीं असें झालें व योग्य गुरु न मिळाला, तर गुरु करण्याचा विधि पूर्वजन्मस्मृत म्हणजे आपणास आवड जशी असेल त्याप्रमाणें किंवा आपल्या कुळांत जी कुलदेवता चालू असेल त्या देवतेचा मंत्र मंत्रमहोदधी अथवा मंत्रमहार्णव, मेरुतंत्र इत्यादि ग्रंथांतून निवडून काढावा, किंवा कोणाकडून निवडून घ्यावा व मेरुतंत्रातील

विधीप्रमाणे विधि करून, तो मंत्र मंत्रदेवतेकडून आपणाला मिळाला अशी भावना करून मंत्रोपासना करावी. तो विधि असा आहे—

> अथ तांत्रिकमंत्राणां दीक्षां शृणु गुरुं विना ।
> शुक्लपक्षे त्रयोदश्यां चंद्रतारावलान्विते ॥
> गत्वा च दक्षिणामूर्तेः सन्निधौ पूजयेच्च तम् ।
> कलश-स्थापनं कृत्वा तदग्रे तु परिक्षिपेत् ॥
> तालपत्रे लिखित्वाथ मंत्र-देवंच पूजयेत् ।
> देवोगुरुरिति ध्यात्वा मंत्रं व्यस्त तु वाचयेत् ।
> अष्टोत्तरशतं चैव मंत्रग्रहणमुच्यते ।
> एतत्तत्व समाख्यातं गोप्यं मातरि जारवत् ॥
> गुरौ लोभादयो दोषास्तस्मादुद्विजते जनः ॥ —मेरुमंत्र

चंद्रताराबल पाहून त्र्योदशीदिनी दक्षिणामूर्ति (शंकर) मंदिरात जाऊन किंवा जी जी उपास्य देवता असेल तिच्या मंदिरात जाऊन षोडशोपचार पूजा करावी. अथवा श्रीज्ञानराज, श्रीसमर्थ याची पूजा करून त्याचेकडून मंत्र मिळाला, अशी भावना करावी. मंत्र ताडपत्रावर किंवा अश्वत्थपर्णावर लिहून त्याची पूजा करावी. नंतर सूर्यरूप पिंगला नाडीने (उजव्या नाकपुडीतून वाहाणाऱ्या श्वासाने) आपला वासनामय देह दग्ध झाला अशी भावना करावी व चंद्रामृतरूप डाव्या नाकपुडीतून वाहणाऱ्या इडेने अमृतवर्षाव करून देह पुनीत करावा. नंतर उपास्य देवतेचे गुरु म्हणून किंवा श्रीज्ञानराज अथवा श्रीसमर्थ याचें नांव घेऊन तो मंत्र वाचावा, व मंत्र मिळाला अशी भावना करावी. या विधीत समोर माता, वडीलबंधु, पिता, गुरुबंधु अथवा धेनु असावी. असा विधि करून मंत्र घेतल्यानंतर पुढे जर उत्तम सद्गुरु भेटले तर स्वत: घेतलेला मंत्र गुरुकडून उजळून घ्यावा. हा मंत्र ग्रहणविधि गौण होय.

संप्रदाय सुरतरु (श्रीगुळवणीमहाराज)

मंत्रग्रहण करून त्याचे अनुष्ठान करण्याचा हेतु ज्ञानप्राप्ति हा आहे.

मंत्रोदित ज्ञानानें धर्म प्राप्त होतो, इष्टपदार्थ प्राप्त होतात, आणि शेवटीं गुरुकृपेनें विज्ञान प्राप्त झालें म्हणजे त्याच्या योगानें मोक्ष प्राप्त होतो अशा ऐहिक व पारमार्थिक लाभाकरिताच साधक आपल्या इष्टदेवतेची आराधना करितो आणि तपस्येचें व तदगभूत भक्तीचें फळ ज्ञानच आहे श्रीतुकाराममहाराज म्हणतात – "भक्ति ज्ञानाची माउली, भक्तीपासून मुक्ति जहाली"

> मधुलुब्धो यथा भृंगः पुष्पात् पुष्पांतरं व्रजेत्।
> ज्ञानलुब्धस्तथा शिष्यो गुरोर्गुर्वन्तरं व्रजेत्॥

मधूची इच्छा करणारा भ्रमर जसा एका पुष्पापासून दुसऱ्या पुष्पावर जातो त्याप्रमाणें ज्ञानलालसा असणारा शिष्यानें एका गुरुपासून ज्ञान घेतल्यानंतर दुसऱ्या गुरूकडे जावें शिष्याचें हृत्तापहरण करणारे, शिष्यास सिद्धमंत्रविद्या देणारे फारच विरळा "अज्ञानतिमिरांधस्य (शिष्यस्य) ज्ञानांजनशलाकया चक्षुरुन्मीलितं येन स एव गुरुरुच्यते," शिष्याचें अज्ञान घालवून त्यास तृतीय नेत्राचा अनुभव देणारा गुरूच खरा गुरु होय व अशा गुरूजवळ राहून गुरुशुश्रूषया विद्या गुरूची सेवा करून विद्या म्हणजे ब्रह्मविद्या संपादन करावयास पाहिजे

वरीलप्रमाणे गुरूची योग्यता सांगितली त्याचप्रमाणे शिष्याची अथवा, साधकाची योग्यताही सांगितली पाहिजे साधकानें ज्याप्रमाणे गुरूची परीक्षा करावी, तशीच गुरूंनेंही साधकाची परीक्षा करावी वसिष्ठ आणि याज्ञवल्क्याप्रमाणे गुरु पाहिजेत तर शिष्यही श्रीराजारामचंद्र आणि श्रीजनकाप्रमाणे पाहिजेत पूर्वी संस्कार या विषयावर लिहिल्याप्रमाणें शिष्यानें अथवा साधकानें पूर्ण संस्कारयुक्त तयार होऊन योग्य गुरूकडे जावें साधकानें कसें तयार व्हावें व कसें वागावें याबद्दल आता जास्ती उहापोह न करिता व दीक्षेबद्दलही जास्त न लिहिता मंत्रजागृति झाली किंवा नाहीं याचीं लक्षणे नमूद करण्यात येत आहेत दीक्षेबद्दल जास्त माहिती 'दीक्षासर्वस्व' या लेखकाच्या ग्रंथात पहावी

## शिष्याची पात्रता

मंत्रशास्त्राच्या दृष्टीनें मागील भागांत गुरु कसे असावे याचा विचार झाला. आता शिष्याचे ठायीं कोणते आचार व गुण असावे हे थोडक्यांत पुढें दिलें आहे.

*पुरुषांनां ३० वर्षांचे पूर्वी मंत्रसिद्धि लवकर होते. स्त्रियांनां विवाहापूर्वी मंत्रसिद्धि प्राप्त होते. पुरुषांनां ३० ते ५० वर्षांपर्यंत उशिरां होते व ५० ते ६० पर्यंत कष्टसाध्य असते.*

ब्राह्मणानां मंत्रसिद्धि होण्यास ते सदाचारसंपन्न असावे. संध्या *प्रतिदिनीं त्रिकाल करून १०८ गायत्री मंत्राचा जप करावा लागतो.* शिखा यज्ञोपवीत धारण करणारे व मातृपितृभक्त व एकपत्नीव्रती असावे. ब्रह्मचारी असल्यास उत्तमच.

क्षत्रिय व वैश्य संस्कारसंपन्न असावे. मद्य, मांसविवर्जित, स्नान, विष्णुसहस्रनाम, रामरक्षा पाठ करीत असलेले, गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध, एकनाथी भागवत यापैकीं एकाचा तरी पाठ करीत असलेले असावे.

स्तुति, निंदा. वर्ज्य असावी, कायिक, वाचिक व मानसिक शुद्धिसंपन्नता असावी. सत्यवाणी, परदारविवर्जित, परदुःखेन दुःखित, परोपकारनिरत, न्यायानें धनोपार्जन करणारे, कुलदेवता, इष्ट देवता उपासक असावे, गुरूचे ठायीं आदरबुद्धि ठेवणारे, गुरुवचनावर पूर्ण श्रद्धा ठेवणारे व गुरुवचनावर पूर्ण विश्वास ठेवणारे असावे.

कोणी न विचारता बोलणारा व असत्य बोलणारा, आपल्याशींच बोलणारा, असा नसावा, मित भाषण करणारा, बोलताना लहानमोठ्याशीं नम्र भाषण बोलणारा, सदा आनंदी, गुरुसेवेला तत्पर असणारा, इष्ट-देवतेतर देवताची निंदा न करणारा, इंद्रियनिग्रह असणारा, सत्य, न्याय, दया, इत्यादि रक्षण करणारा असा असावा.

मंत्रसिद्ध होईपर्यंत गुरसानिध्य असावें. तो शारीरिक व्यंगरहित, निरोगी असावा.

व्यवहारांत शिष्यानें गुरूला योग्य सल्ला द्यावा. गुरु घोडी शिष्य जोडी असा व्यवहार शिष्यानें गुरूशीं करू नये.

## दीक्षा व प्रकार

**दीयते ज्ञान सद्भावः क्षीयते पशुवासना ।**
**दान क्षपण संयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता ॥**

आत्मस्वरूपाचें ज्ञान देणे व पशुवासनेचा क्षय करणें ही दोन्ही कार्यें साधण्याचा प्रयत्न ज्या साधनानें साध्य होतो त्या साधनाला दीक्षा असें म्हणतात.

इंद्रियविशिष्ट भोगाची लालसा मनुष्यमात्राच्या ठायीं जन्मत.च असते व हे इंद्रियजन्य भोग इंद्रियें शिथिल झाल्यीं तरीं अन्योन्य उपायानी भोगण्याची इच्छा पुरवून घेण्याचा मनुष्य प्रयत्न करीत असतो. उदाहरणार्थ, विडा किंवा लाडू चावता येत नाहीं तर विडा किंवा लाडू कुटून खाणें, दात पडले तर दुसरे दात लावणें, एक बायको मेली तर दुसरी, तिसरी, चवथी करणे. इंद्रियें शिथिल झालीं तर इंद्रिय जागृतिकरिता माकडें मारून त्याच्या शिराचा उपयोग करणें, इत्यादि अनेक प्रकारानी प्रयत्न करून इंद्रियभोग सुखाकडील प्रवृत्ति जोंपर्यंत कमी होत नाहीं तोपर्यंत मनुष्यप्राणी सुधारलेला पशूच होय. तेव्हा अशा नरपशूच्या पशुवासना नष्ट होण्याचे साधन दीक्षा हे होय.

मंत्रशास्त्र हें योगशास्त्राचेंच एक अंग आहे असें पूर्वी प्रतिपादन केलेलें

---

१. लेखकाच्या (शंकराचार्य योगेश्वरानंदतीर्थांच्या) 'दीक्षासर्वस्व' (१९६४ व्हीनस प्रकाशन पुणें २) या ग्रंथात या विषयाचें संपूर्ण विवेचन दिलेलें आहे.
(गो. प्र. भा.)

आहे. म्हणून योगशास्त्रातील निरनिराळ्या दीक्षांचें वर्णन देण्यात येत आहे. मंत्रशास्त्रातील दीक्षा व योगशास्त्रातील दीक्षा यांचें बरेच साम्य दिसून येतें, परंतु हें साम्य ज्या दीक्षांत अवलोकनांत येत नाही, अशाच योगशास्त्रांत कोणकोणत्या दीक्षा आहेत त्याचा विचार करूं.

योगशास्त्रात *कुमारदीक्षा* ही मुख्य दीक्षा होय. कारण भूलोकांत दीक्षा देण्याचें काम कुमाराकडे सोपविलेलें आहे. हे कुमार पांच आहेत. सनक, सनातन, सनंदन, सनत्कुमार व सनत्सुजात असे ते पांच कुमार होत. सप्त लोकांतील सप्तदेशांकरिता निरनिराळे कुमार दीक्षा देण्याकरिता योजलेले आहेत. त्यापैकीं भूर्लोक ही प्रथम रेषा होय. तिला वासुदेव रेषा असें म्हणतात. या वासुदेव रेषेतील *जीवांना* दीक्षा देण्याकरिता वरील कुमारपंचकापैकीं सनत्कुमार यांची योजना केलेली आहे. या दीक्षेत मनुष्याच्या मनोमय कोशात जागृत असलेल्या आत्म्याचा साक्षात्कार करून देण्यात येतो. कुमारदीक्षेचे तीन भेद आहेत, ते असे : *नाददीक्षा, मंत्रदीक्षा* अथवा *विद्यादीक्षा* व *विद्याधिदेवतादीक्षा* अथवा *भगवद्रूपदीक्षा*.

**नाददीक्षा :** भूर्लोकातील पंचमहाभूतांपैकीं सूक्ष्मतम भूत म्हणजे आकाश हें होय. अशा आकाश शरीरात जीवात्म्याचा वास असतो. आकाश-तत्त्वाचा गुण शब्द हा आहे. म्हणून आकाश शरीरातील *परिमाणूत स्पंदन उत्पन्न व्हावें व त्या स्पंदनानें जीवात्म्याला बोध* होण्याकरिता नाददीक्षेची योजना आहे. नाददीक्षेची अंगभूत लघुदीक्षा "आकाशे खेचर आग्नेयादित्य चंद्रमस " म्हणजे खेचरीदीक्षा–अग्निदीक्षा, सूर्यदीक्षा व चंद्रदीक्षा अशा *नाददीक्षाच्या अंगभूत लघुदीक्षा आहेत.* आणि '*कटपयथी*' या पद्धतीनें गणना केली तर एकंदर २६२ दीक्षा होतात.

**विद्यादीक्षा** अथवा **मंत्रदीक्षा :** ही दीक्षा झाल्याबरोबर शिष्याला जो मंत्र सांगितला असेल, तो दीप्तमंत्र होतो. या दीक्षेनें शब्दाचे सत्य अर्थ

समजून येतात, ही दीक्षा सिद्ध झाली म्हणजे साधकाला स्वरोदय परिचित ज्ञान व दूरदर्शन ह्या सिद्धि प्राप्त होतात. मंत्राक्षराचा उच्चार झाल्याबरोबर आकाशफलकावर त्या मंत्रोच्चारित शब्दाचे ठसे उमटतात व चंद्रभानुलोकांत त्याच शब्दाचीं प्रतिबिंबें उमटतात व त्या चंद्रभानुलोकांत ह्या मृत्युलोकांत उच्चारलेल्या ज्या ज्या शब्दाचे ठसे उमटलेले असतात त्याचें ज्ञान साधकाला प्राप्त होतें.

**विद्याधिदेवतादीक्षा :** ह्या दीक्षेनें साधकाला मंत्रवर्णित देवतेचा साक्षात्कार होतो. ह्या दीक्षेच्या साधनानें देवतेच्या रूपाचें दर्शन होतें. म्हणून ह्या दीक्षेला भगवद्रूपदीक्षा असें म्हणतात.

**नारायणदीक्षा :** ही शेवटली दीक्षा होय. या दीक्षेंत भगवान नारायण ऋषी स्वतः दीक्षा देतात व यालाच वासुदेवरहस्य असें संबोधण्यात येतें. तंत्र ग्रंथात समयीदीक्षा, योगदीक्षा, साधकदीक्षा लोकधर्मिणीदीक्षा व मोक्षदीक्षा अशा दीक्षाचें वर्णन येतें

**समयीदीक्षा :** सांप्रत गर्भाधान, पुंसवन, अन्नप्राशन, उपनयनादि संस्कार योग्य तऱ्हेनें होत नाहींत. यामुळें योनीबीज, आहार, देश याची शुद्धि दीक्षेपूर्वी करावी लागते व ती शुद्धि गुरु मंत्रशक्तीनें करून घेतात. उपनयन करण्याचे वेळीं उपवीत देत असतात. मंत्राच्या साह्यानें आम्याशीं जीवाचा संबंध घडवून आणता येतो. नंतर गुरूंनी शिष्याचें प्रोक्षण व तारण करावें व नंतर रेचक करून आपल्या देहांतून निघून शिष्याचे देहात जाऊन वासनामय शरीरातील पुर्यष्टकेच्या ग्रंथी शिथिल कराव्या व त्या ग्रंथी नष्ट करून पुर्यष्टक मस्तकांत सहस्राराजवळ स्थापन करावी व शिष्याच्या जीवाला आपल्याशीं अभेद रूपानं आणून त्याचेकडून हृदयातील ब्रह्म, कंठातील विष्णू, तालूतील रुद्र, भ्रूमध्यातील ईश्वर, ललाटातील सदाशिव, ब्रह्मरंध्रातील परब्रह्म या देवताचें सामरस्य करून द्यावें व अशा तऱ्हेनें ईश्वराराधनेचा मार्ग शिष्यास सांगावा

वर लिहिलेल्याशिवाय आणखी पांच प्रकारच्या दीक्षा आहेत त्या अशा :

क्रियावती, वर्णमयी, कलावती, वेधमयी, सांप्रदायिकी. कलावती दीक्षेत स्पर्शदीक्षा, वाग्दीक्षा आणि दृग्दीक्षा अथवा चाक्षुषीदीक्षा असे भेद आहेत. अशा दीक्षा देण्याचें सामर्थ्य ज्याचे ठायीं आहे तेंच खरे सद्‌गुरु होत. दृग्दीक्षा अथवा दृष्टिदीक्षा — चाक्षुषीदीक्षा — "चक्षुरुन्मील्य यत्तत्व ध्यात्वा शिष्य समीक्षते, पशुबंध विमोक्षाय दीक्षेय चाक्षुषी मता." स्पर्शदीक्षा म्हणजे स्पर्श केल्याबरोबर प्रकाश साक्षात्कार होणें, वाग्दीक्षा म्हणजे वाक्‌सिद्धीनें शिष्यास अमुक मंत्र तुला सिद्ध झाला असें म्हटल्याबरोबर शिष्याला तो मंत्र सिद्ध होणें हें होय. दृग्दीक्षा म्हणजे शिष्याच्या दृष्टीशीं आपली दृष्टी लावून जी दीक्षा दिली जाते ती दृग्दीक्षा होय. वैधीदीक्षा म्हणजे शिष्याचे ठायीं षट्‌चक्राचा अनुभव देणें अशा त्या दीक्षा होत.

**योगदीक्षा :** या दीक्षेंत पाशशुद्धि वा अध्वाशुद्धि करावी लागते. लोकधर्मिणीदीक्षा — या दीक्षेनें संचित व क्रियमाण कर्मांतील अशुद्धांश नष्ट होतात. शुभ फलयोग भोगल्यावर आणखी भोगाची इच्छा असल्यास ऊर्ध्व लोकांत त्या साधकास पाठविता येतें व शेवटीं वैराग्य प्राप्त झाल्यावर श्रेष्ठ लोकातील अधीश्वराचेसह राहून सायुज्यमुक्ति प्राप्त होते.

योगदीक्षा ही सबीज, निर्बीज व सद्योनिर्वाणदायिनी अशा तीन प्रकारची असते. निर्वाणदीक्षा स्त्री, बाल, अंध व रोगी यांकरिता आहे यात गुरु-भक्तीच्या साधनानें मुक्ति प्राप्त होते. हिलाच पर्यंकदीक्षा असेंही म्हणतात.

□ □

**अमृत-मंजिरी**

१. सद्‌गुरूच्याद्वारेंच अजर व अमर असें आध्यात्मिक शरीर मिळतें
२. पढित हे ग्रंथाचा अभ्यास करितात पण ज्ञानी हे वृत्तीचा — तदाकारतेचा — अभ्यास करितात.
३. गुरुमुखातूनच घेतलेले मंत्र सिद्ध होतात कारण त्यामागें गुरूची इच्छाशक्ति असते.
४. ब्रह्माचा मंत्र व चिद्‌घन गुरुमुखातूनच सहज मिळतोच
५ भारत हें कुलीनाचें राष्ट्र आहे.
६. आपली तयारी करीत राहा 'गुरु' आपोआप मिळतो

# ५ मंत्र, तंत्र व यंत्र यांचा परामर्ष

## १ तंत्र व आगमांची उत्पत्ति व प्रचार

या भागात तत्र व आगमाची उत्पत्ति व प्रचार याची माहिती देण्यात येत आहे.

वेद आणि अवेस्ता याचे उपासक निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन स्थाईक झाले. त्याचा काल कांहीं विद्वानानी आठ हजार वर्षांचा धरला आहे व जैन ग्रथाचा आधार धरल्यास हा काळ बारा हजार वर्षांच्या पलीकडे जातो. यावरून असे अनुमान निघते कीं, मत्राचा निर्देश व विनियोग जरी वेद व अवेस्ता या ग्रथात आलेला आहे, तरी मत्रशास्त्र या पदवीला पोहोचणाऱ्या ग्रथाची निर्मिती वेद व अवेस्ताचे काळीं झालेली नव्हती. ज्या ज्या काळीं ज्या ज्या ग्रथाची समाजाच्या धार्मिक गरजा भागविण्यासाठीं जरुरी असते, त्या त्या प्रकारचे ग्रंथ निर्माण होतात. वैदिक काळात सूर्योपासना व अग्न्युपासना प्रचारात होती व त्या उपासनेस अनुकूल असे अग्निष्टोम वार्षिक वा द्वादश वार्षिक अशा यज्ञाचा प्रचार होता अशा यज्ञाच्या पूर्तीकरिता ज्योति शास्त्र व त्याच्या अनुरोधानें पचागनिर्मिति होत आली आहे, तसेच अग्न्युपासनेकरिता दर्भ, समिधा, दूध, तूप याची जरूर लागत असल्यानें आयुर्वेद व तदतर्गत पशुवैद्यकही तयार झालें. वेदत्रयी म्हणून वेदाचें वर्णन श्रीभगवद्गीतेंत आलेले आहे. त्यात वेदत्रयी याचा अर्थ तीन वेद असा नाही. चारी वेदातील ऋचाचे तीनच प्रकार आहेत म्हणून वेदत्रयी

म्हटलें आहे. प्रकार १ पद्यऋचा (कविता). प्रकार २ गद्य व पद्य ऋचा (कविता व वाङ्मय), प्रकार ३ गीति (गाण्याच्या ऋचा). आथर्वणवेदाची आवश्यकता यज्ञकर्मांत ऋत्विज, होता, उद्‌गाता यांचें व यजमान व यजमानपत्नी यांचे रक्षण करण्याकरिता असे मंत्रविद्या व तंत्र यांचा घनिष्ट संबंध पिता – पुत्रवत् आहे व ही मंत्रविद्या व मंत्रशास्त्र यांचा उगम आथर्वण वेदापासून झालेला आहे.

आगमाची उत्पत्ति व वेदाची उत्पत्ति श्रीशंकराच्या मुखापासून झाली असा कांहीं ग्रंथांत उल्लेख आलेला आहे. त्या ग्रंथांत आगमांना 'ऊर्ध्वाम्नाय' असें म्हटलें आहे. म्हणजे श्रीशंकराच्या ऊर्ध्वमुखापासून आगम व तंत्रें निघून झालीं असें प्रतिपादन केलें आहे. कुल्लूक भट्टांनी "वैदिकी तांत्रिकी चैव द्विविधा कीर्तिता श्रुति" असें म्हटलें आहे. "स्त्रीशूद्रद्विजबंधूनां त्रयी न श्रुतिगोचरा" ह्या पहिल्या प्रकारच्या श्रुति व "मानवांना हितार्थाय अपरा श्रुति दर्शिता" ह्या दुसऱ्या प्रकारच्या आगमश्रुति होत. सत्ययुगांत वालखिल्य ऋषींना श्रीशंकरांनी 'आगम' सांगितले, पुढें युगपरिवर्तनानें ते लुप्त झाले. महाभारतांतील शांतिपर्वांत महर्षि कपिलांनी स्युमरश्मि ऋषींना विचारलें कीं, आगमाशिवाय आणखी कोणते श्रुतिग्रंथ आहेत. तेव्हा स्युमरश्मि ऋषींनी पुष्कळ अज्ञात असलेल्या श्रुति व उपनिषदें सांगितलीं. यावरून आगम हेही श्रुतिग्रंथच आहेत असें मानलें गेलें होतें असें दिसतें. वृहद्‌गौतमसंहिता, वृद्धहारीतसंहिता व हारीतसंहिता या ग्रंथांत आगमोक्त दीक्षाचीं विधानें सांगितलीं आहेत. वृहदारण्यकोपनिषद, मनुसंहिता, कात्यायनसंहिता व व्याससंहिता या ग्रंथांत गणेश, गौरी इत्यादिकांच्या मंत्राचे जप करण्यास सांगितलें आहे व श्रीविद्येचाही जप सांगितला आहे. तसेंच जपमाळेचे प्रकारही सांगितले आहेत. ह्या गोष्टींचा उल्लेख आगम ग्रंथांत आला आहे. मनुसंहितेची महति सांगतांना "यत्किंचिन्मनुरब्रवीत् तद्भेषजम्" असें म्हटलेलें आहे. तसेंच यजुर्वेदांतील रुद्राध्यायांत "अध्यवोचदधिवक्ता प्रथमो दैव्यो भिषग्" असेंही सांगितलें

आहे. वरील सर्व उल्लेखावरून आगम ग्रंथ अथवा तंत्र ग्रंथ हे वेदाप्रमाणेंच फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहेत असें सिद्ध होतें. पूर्वी वेदांना निगम व तंत्रांना आगम असे संबोधण्याची प्रथा होती. कारण श्रीमदाद्य-शंकराचार्यांच्या बिरुदावलींत (सकलनिगमागम सार्व्यत्रय—प्रतिपादक सर्वतंत्रस्वतंत्र) असा आगम व निगम यांचा उल्लेख आलेला आहे. श्रीविश्वा-मित्र ऋषींनी श्रीराम— लक्ष्मणास तंत्र शास्त्रातील आगमोक्त 'बलातिबला' विद्या शिकविल्या होत्या असें अध्यात्म रामायणांत विधान केलें आहे, व श्रीरामचंद्रांनी श्रीलक्ष्मणास पूजा सांगतांना आगमोक्त प्रकाराचें विधान सांगितलें होतें असाही अध्यात्म रामायणांत उल्लेख आलेला आहे.

भारतीय युद्धाचे वेळीं अनार्य देशांतून लढवय्ये लोक भारतीय युद्धांत भाग घेण्याकरितां आले व युद्धांतून बचावलेले लोक येथेंच राहिले अशा लोकांना आर्य लोकांत संमिलित करून घेण्याकरितां श्रुतींत 'कृण्वन्तु आर्यम्'....एवढाच निर्देश होता परंतु आर्यकरणाचे विधि व अशांना आर्य बनविल्याचे आचार कसे असावे, त्यांना उपासना कोणत्या मंत्रांनी द्यावी वगैरे विधिविधानें उपलब्ध झालेलीं नव्हतीं तेव्हां तत्कालीन शास्त्रकारांना शोध करितांना आढळून आलें कीं, आगम आणि तंत्र यांत अशा 'आर्य' होऊं घातलेल्यास कोणत्या संस्कारांनी 'आर्य' करून घ्यावें याची आगाऊच योजना केली आहे. म्हणून त्यांनी खालीं नमूद केलेला दंडक घातला—

> कृते श्रुत्युक्तकाचारः त्रेतायां स्मृतिसंभवः ।
> द्वापारे तु पुराणोक्तः कलावागमसम्मतः ॥
>
> कुलार्णवतंत्र

भारतीय युद्धानंतर कलियुग लवकरच सुरू झालें असें धर्मराजाच्या कारकीर्दींतील उदाहरणांवरून दिसून येतें. आर्यांचे ग्रंथ अद्वैतपर आहेत. परंतु नवीन आर्य करून घेतलेल्या अनार्य लोकांस आपलेसें करून

घेण्याकरिता व त्याच्या पूर्व सस्कारास अनुकूल होईल व त्याच्या पचनीं पडेल या हेतूने प्रथम *द्वैत उपासना त्यांस देण्यांत आली.* म्हणजे प्रथम पचदैवतोपासना प्रचारात आणली गेली 'उपासकाना कार्यार्थं ब्राह्मणोरूपकल्पना' म्हणजे आद्य ब्रह्मशक्तीनें उपासकाच्या सोईकरिता नाना प्रकारचीं रूपें धारण केलीं, नाना अवतार धारण केले असें त्या नूतन आर्यांना समजावून देण्यात आलें व त्या निरनिराळ्या रूपाचे व अवताराचे मत्र कोणते, जप कसा करावा, पूजा कशी करावी व शेवटीं मोक्ष कसा सपादन करावा हे सागण्याकरिता तत्रशास्त्राचा म्हणजे आगमाचा आविर्भाव पुन्हा झाला. यापुढील विवेचनात आगम अगर मत्रशास्त्र असा उल्लेख न करितां 'तत्रशास्त्र' असा उल्लेख करण्याचें ठरविलें आहे. म्हणजे पुढील विवेचन जरी तत्रशास्त्राधारें केलेलें आहे, तरी तें मत्रशास्त्राचेंच विवेचन आहे असें समजण्यास काही प्रत्यवाय नाहीं

वरील स्तभात वर्णन केल्याप्रमाणे तत्रशास्त्र हें युगपरिवर्तन झाल्याचें दर्शक असे कलियुगाचें युगशास्त्र आहे आगम ग्रथात आगम व निगम या शब्दाच्या व्याख्या खालीं दिल्याप्रमाणे आहेत

**आगत. शभुवक्त्रेभ्यो गतश्च गिरिजाश्रुतिम् ।**
**मतश्च वासुदेवेन तस्मादागम उच्यते ॥**
**निर्गतो गिरिजावक्त्रात् गिरीश श्रुतिमाप्नुयात् ।**
**मतश्च वासुदेवेन निगम परिकल्प्यते ॥**

श्रीशकरानीं पार्वतीस सागितलेले व वासुदेवाना समत झालेले असे जे मत्रसमुदाय त्यास 'आगम' असें म्हणावें व श्रीगिरिजेनें श्रीशकराना सागितलेले व श्रीवासुदेवाना समत असलेले असे मत्र व त्याचीं विधानें ज्या ग्रथात वर्णिलीं आहेत त्यास 'निगम' असें म्हणावें 'निगमकल्पतरोर्गलित फल' या वाक्यात आलेल्या निगम शब्दाचा अर्थ वेद असा होतो या पुढील काळात वेदाचे महत्त्व कमी होऊन आगमाना शिरोधार्य करण्यात आलें असें दिसते *कारण तत्रग्रथात मत्रशास्त्राच्या शरीराचे वर्णन करिताना*

निगम म्हणजे वेद हे जीव, आगम हा आत्मा, षट्शास्त्रें म्हणजे षड्विकार, दशोपनिषदें म्हणजे दशेंद्रियें होत असें म्हटलें आहे. अशा प्रकारे मंत्रशास्त्राची योग्यता वाढविण्यात आली. मंत्रशास्त्ररूप शरीरातील आत्मा म्हणजे आगम व जीव हे वेद अशी उपमा देणाऱ्याचा हेतु असा दिसतो कीं, वेद व तंत्र यांचा घनिष्ठ संबंध आहे व ते दोन्ही एकाच दर्जाचे आहेत इतकेंच.

कामिकागमात तंत्राची व्याख्या केली आहे, ती अशी आहे '—

**तनोति विपुलं अर्थं तत्त्व-मंत्रसमन्वितम् ।**
**त्राणं च कुरुते यस्मात् तंत्रमित्यभिधीयते ॥**

कालिकावृत्तीत तंत्र शब्दाची व्युत्पत्ति अशी दिली आहे कीं, 'तन् = प्रसरणें' या धातूपासून 'त्राण' असा शब्द झाला. वाचस्पती, आनंदगिरी व गोविंदानंद हे तिघेही तंत्र या शब्दाची उत्पत्ति व्युत्पादनाचे अर्थी तन्त्री अगर तंत्री या धातूपासून झाली असे मानतात. अशा व्युत्पत्तिपासून "तनुते विस्तार्यते ज्ञान अनेन इति तंत्र." ज्या ज्ञानाने मानवाचें रक्षण होतें ते ज्ञान ज्यात वर्णन केलें आहे तें तंत्र होय. अशा तंत्ररूपी मंत्रशास्त्राचें वर्णन खालील श्लोकात दिसून येते

**अन्यान्यशास्त्रेषु विनोदमात्रम्, न तेषु किंचित् भुवि दृष्टमस्ति ।**
**चिकित्सितज्योतिषतंत्रवादाः पदे पदे प्रत्ययमावहन्ति ॥**

इतर शास्त्रग्रंथ प्रत्यक्ष अनुभव दाखविणारे नाहीत. परंतु वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र व मंत्रशास्त्र ह्या शास्त्राच्या ज्ञानापासून पदोपदीं अनुभव घेता येतात. मंत्रशास्त्रातील प्रथात उपासनेचें ज्ञान, औषधींचें ज्ञान, रसायनशास्त्राचें ज्ञान ह्या सर्व ऐहिक व पारमार्थिक सुखसंपादनाचे मार्ग सांगितलेले आहेत.

वाराही तंत्रात आगमरूपी मंत्रशास्त्राचीं सात लक्षणे सांगितलेलीं आहेत.

**सृष्टिश्च प्रलयं चैव देवतानां यथार्चनम् ।**
**साधनानां च सर्वेषां पुरश्चरणमेव च ॥**

पट्कर्मसाधनं चैव ध्यानं योगश्चतुर्विधः ।
सप्तभिर्लक्षणैर्युक्तश्चागमोस्तीति बुद्धयते ॥

सृष्टि, प्रलय, देवतार्चन, पुरश्चरणसाधन, पट्कर्मसाधन, ध्यान, चतुर्विधयोग अशीं तीं सात लक्षणे होत. इतर तत्रग्रथामध्ये पुरप, प्रलय, उत्पत्ति, देवतापूजनतत्त्व, जीवाचे भेद, स्वर्ग, पाताल, देव याचे वर्णन आलेले आहे. तसेच स्त्री–पुमान भेद, मानवी शरीरातील पट्चक्र वर्णन, आश्रमधर्म, युगधर्म, सस्कार, देवतामूर्तीची प्राणप्रतिष्ठा व स्थापना मत्र, यत्र, मुद्रा, साधनें, अतर्योग, वहिर्योग, गृह–वापी–प्रासार याचे सस्कार, जप, व्रत, पट्कर्म, साधन, ध्यानयोग, राजधर्म, प्रजाधर्म, देशविभाज, औषधी, रसायन, कल्प याची माहिती सागितलेली आहे.

## २ तंत्रें–प्रकार व त्यांचे प्रचारित भूभाग

वेदाप्रमाणे तत्रे अनंत आहेत. काही वेदशाखा जशा आज लुप्त आहेत, तशीं बरींच तत्रेही लुप्त झालीं आहेत. तत्राचा उत्कर्ष झाला त्या कालात भारतवर्षांतील निरनिराळ्या भागात निरनिराळीं तत्रें ग्राह्य मानलीं जात असत. तत्रकाळात आर्यावर्ताचे देशविभाग अश्वक्रात, रथक्रात, विष्णुक्रात, गजक्रात या प्रकाराने केलेले होते. शक्ति-मगल तत्राप्रमाणें विंध्यपर्वतापासून चितागाग म्हणजे सर्व बगाल मिळून झालेल्या देशाला विष्णुक्रात असें म्हणत असत. महाचीन व नेपाळ या भागाना रथक्रात व उर्वरित इतर भागाला अश्वक्रात म्हणत असत महासिद्धसार तत्राप्रमाणे अश्वक्रात म्हणजे दिनाजपुराजवळील करतोया नदीपासून यवद्वीपापर्यंतचा भाग होय. (हल्लीचें जावा बेट) (या पुण्य नदीचें जल इतर पुण्य नद्याप्रमाणे श्रावण महिन्यात तीन दिवसही अपवित्र होत नाही)

विष्णुक्रान्त देशांत सिद्धीश्वर, कालीतत्र, कुलार्णव, ज्ञानार्णव, नीलतत्र, देवत्र्यागम, श्रीक्रम, सिद्धियामल, मत्स्यसूक्त, सिद्धसारतत्र, वाराहीतत्र, योगिनीतत्र, गणेशविमर्शिनी, हसतत्र, महेश्वरतत्र, निरूत्तर, गाधर्व,

ललिता, समयाचार, भावचूडामणी, कामधेनुयामल, ब्रह्मयामल, रुद्रयामल, कुब्जिकातंत्र वगैरे ६४ तंत्रें चालू होतीं.

गजक्रांत–गाधार (कंदाहार) काबूल, चित्रळ, कैकेय (इराण), काश्यप कास्पियन समुद्राचा काठ, सप्तसिंधु[1] (तुर्कस्थानात सप्तसिंधु–सात नद्या आहेत). या गजक्रांत देशात सानरतंत्र, डामरतंत्र, नील सरस्वतीतंत्र, सिद्ध वाराहीतंत्र, योगद्रुमतंत्र, कुंडलिनीतंत्र अशीं ६४ तंत्रें चालू होतीं.

रथक्रांत देशात मातृकोदय, महानिर्वाण, मेरतंत्र, भूतडामर, देव-डामर, वासुदेव–रहस्य, बृहद्गोतमीय ब्रह्मज्ञान, गारुड वर्णविलास, बाला–विलास, पुरश्चरणचंद्रिका, नवरत्नेश्वर, आकाशभैरव, इंद्रजालतंत्र, कृकनास–दीपिका, आचारसार, सरस्वती, शारदातिलक शक्तिसंगमतंत्र वगैरे ६४ तंत्रें चालू होतीं.

अश्वक्रांत देशात गुप्तदीक्षा, भूतशुद्धि सिद्धमंत्र, धर्मकेतु तंत्र, महायोगिनी तंत्र, शिवार्चनतंत्र बिंदुतंत्र, शूलिनी, महामालिनी, मोहनतंत्र, भूतेश्वर, योगार्णव, यंत्रचूडामणि, लीलावती, जयराधामाधवतंत्र, धूमावतीतंत्र, महानिर्वाणतंत्र, वगैरे ६४ तंत्रें चालू होतीं. ह्या २५६ तंत्राचें सार 'सर्वतंत्रस्वतंत्र' या तंत्रात निर्वाचित केलेलें आहे.[2]

---

१. ही सप्तसिंधु म्हणजे सध्याचा कोणता भाग यावद्दल विवाद्य मतें आहेत. Rig-Vedic India — Das Gupta, Orion B G Tilak व प्राचीन भारतीय स्थळसूचि-चित्राव शास्त्री इत्यादि ग्रंथात मतभिन्नता आहे. (गो प्र. भा.)

२. तंत्रशास्त्राचा उगम शिवपार्वती संवादात आढळतो. आगमनिगम ह्याचा अर्थ व संबंध शिव व पार्वती (आगम), पार्वती व शिव संवाद (निगम) असा असल्याचें वर सांगितलेंच आहे. भारतामध्यें गौडपादाचार्य, शंकराचार्य, सुंदराचार्य, भास्करराय, सुभगानंद, अप्पैय्या दीक्षित, देवनाथ ठाकूर इत्यादि अनेक तंत्रकार होऊन गले. परंतु परदेशी लोकांपैकीं न्यायाधीश वुडरॉफ व सर ॲव्हेलोन आणि एच् एच् विल्सन ह्यानीं या तंत्रशास्त्राचा फार सूक्ष्म अभ्यास करून त्यासंबंधींचीं आपला मतें पूर्ण विचारांतीं नमूद केलेलीं आहेत.

## ३. यंत्रें त्यांचें महत्त्व व नित्यता

मंत्रशास्त्रातील मंत्र, मंत्रशक्ति व मंत्रयोग यांचें वर्णन केल्यानंतर मंत्र-शास्त्रातील मूलभूत प्रतीकोपासना साधनेचें आद्यस्वरूप म्हणजे यंत्रें त्यांचें वर्णन करण्यात येत आहे. मंत्रशास्त्रांत मंत्राचें जितकें महत्त्व आहे, तितकेंच महत्त्व यंत्राचेंही आहे. मंत्र हे जसे स्वतःसिद्ध व अविनाशी

त्यांत त्यांच्या अभ्यासाची दृष्टि सखोल व दुराग्रहरहित असून आस्थेवाईक *अभ्यासकाची आहे असें दिसतें*—पुढील माहिती *'तंत्रमार्गाचीं मूलतत्त्वें'*—(Principles of Tantras 1952) १९५२ या ग्रंथावरून दिलेली आहे. ती अशी : "कलियुगाची सुरवात होण्यापूर्वी पर्वतप्राय तांत्रिक ग्रंथाचा नाश झाला. कांहीं तंत्राचार्यांच्या मतें ही ग्रंथसंख्या एक लक्षावर होती. ॲव्हलॉन यांनीं संशोधनांत उपलब्ध झालेल्या ३१३ 'तंत्र' ग्रंथांची यादी प्रसिद्ध केली आहे. ते म्हणतात, वामकेश्वर तंत्राप्रमाणें ६४ तंत्र ग्रंथ होते. ज्ञानकोश-काराच्या मताप्रमाणें ती संख्या १९२ होती. आद्यशंकराचार्यांनीं ६४ ग्रंथांचा उल्लेख केला. कालपर्याय तंत्राप्रमाणें शाक्ततंत्रें ३२७, उपतंत्रें ८, यामल ४, डामरस २. याशिवाय अनेक संहिता, चूडामणी, अर्णवें, पुराणें, उपवेद *काक्षपुताजविमर्षिणी व चिंतामणि* इतकी ग्रंथसंपत्ति होती. वैष्णवाचीं ७५ तंत्रें-शिवाय यामल व कल्प हीं शास्त्रें, शैवाचीं ३२ तंत्रें, गाणपत्याचीं ३० तंत्रें, उपतंत्रें व कल्प इत्यादि ग्रंथ आहेत; याशिवाय बौद्ध वर्गाचीं अनेक प्रकारचीं तंत्रें, सूक्तें, कामधेनु, कल्प इत्यादि आहेत. एवढेंच नव्हे तर अद्यापिही कैलास पर्वतावर गणपति नित्य नवीं तंत्रें तयार करून भूतलावर पसरवीत असतो।" वुड्रॉफही असेंच म्हणतात, यामुळें प्रत्येक ठिकाणीं गणपतीला सर्वत्र महत्त्व आहे. विल्सन म्हणतात, बंगालमधील ⅚ विधि या तंत्राप्रमाणेंच चालतात. दक्षिणाचारी शाक्तपंथीयांचीं तंत्रें शुद्ध व वेदप्रमाण असतात. पण वामाचारीयांचीं रुद्राप्रमाणें असतात. वामाचारी यामध्यें पंचमकारांना (मद्य, मांस, मीन, मुद्रा, मैथुन) महत्त्व असतें. अशा वामाचारी पंथाला 'कौलपंथ' म्हणतात. ते प्रत्यक्ष सुंदर तरुणींच्या वास्तव योनीची पूजा करितात. याशिवाय फार बारीक माहितीही दिलेली आहे. त्यावरून ते किती खरे कर्मवादी अभ्यासू होते हें स्पष्ट होतें. (देवीकोश भाग २रो प्र. भा.)

आहेत, तशींच यंत्रेंही स्वत सिद्ध व अविनाशी आहेत. *मंत्र म्हणजे सूक्ष्म शक्तीवर स्वामित्व करणारी प्रक्रिया. मंत्र म्हणजे अतींद्रिय शक्तीची प्रेरक शक्तीच होय. आणि यंत्रें ही सूक्ष्म शक्तीवरून स्वामित्व सिध्द करून दाखविणारी साधनें आहेत.*

**यंत्रं मंत्रमयं प्रोक्तं मंत्रात्मा देवतैव हि ।**
**देहात्मनोर्यथाऽभेदः यंत्रदेवतयोस्तथा ॥**

कोणत्याही मंत्राची सिद्धि करावयाची असल्यास वाचकशक्तीची पूजा आवश्यक आहे, असे मागील स्तबकात प्रतिपादन केलें. ही वाचकशक्ति प्रादुर्भूत प्रथम यंत्ररूपानें होते व नंतर प्रतिमारूपानें होते. आरण्यकांत वर्णिलेली प्रतीकोपासना मंत्रमयच होती व ती कांहीं काळानंतर मूर्तीरूपानें अथवा प्रतिमारूपानें उदयास आली. मंत्रसृष्टि ज्याप्रमाणें स्वत सिद्ध अनादि आहे, तशीच यंत्रसृष्टिसुद्धा अनादि व अनंत आहे. अष्टधा प्रकृतिरूप प्रभूची प्रार्थना करणारा भक्त त्या प्रभूला म्हणजे अष्टधा प्रकृतीला नित्यत्व व अनादित्व आहे असें मानीत असतो श्रीभगवद्गीतेंत "प्रकृतिं पुरुष चैव विद्ध्यनादि उभावपि" असें सांगितलें आहे. आथर्वणवेदांत, "कासित्वं महादेवी, अहं ब्रह्म, ब्रह्मणि द्वे ब्रह्मणि वेदितव्ये इत्याथर्वणी श्रुति अहमखिलं जगत्" असें वाक्य आहे. नामरूपात्मक ब्रह्म आहे नामरूपात्मक ब्रह्माचीच उपासना शक्य आहे. मंत्रशास्त्र हे उपासनेचेंच मुख्य शास्त्र आहे. नामरूपाच्या पलीकडे असलेल्या ब्रह्माचा अनुभव घेणारा पुरुष लक्ष मनुष्यांत एखादाच असेल. मंत्रामध्ये गूढ असलेल्या देवता यंत्राचे साहाय्याशिवाय प्रगट होणार नाहींत. मंत्रांत गूढ असलेल्या चैतन्य शक्तीचें मंत्र हे जसे नित्य व अनादित्वदर्शक आहेत, तशीच यंत्रांत मंत्रात्मकदेवता गूढ असल्यानें यंत्रेंही नित्य व अनादि होत. प्रकृतिपुरुषात्मक जग जसें नित्य, तशी प्रकृतिही नित्यच आहे व प्रकृतिसंघटित वर्तुल त्रिकोण हेंही नित्यच होत. ही गोष्ट पुढील स्तबकांतील अवतरणावरून लक्षांत येईल.

यासान्तरोहरूपा परामहेशी त्रिभाविताकारा।
स्पष्टा पश्यन्त्यादि त्रिमातृकात्मा च चक्रतां याता॥

(कामकलाविलास)

चक्रस्यापि महेश्या न भेदलेशोऽपि भाव्यते विबुधैः।
अनयोः सूक्ष्माकारा परैव सा स्थूलयोश्च कापि भिदा॥

"एको ह" असा नाद उत्पन्न झाला व हा नाद बिंदुरूपानें उदयास आला. बिंदूला रूप नाहीं. तो वृद्ध बिंदू झाला तेव्हाच त्याला वर्तुलाकार प्राप्त झाला. हा वर्तुलाकार येणें हाच चक्रसंभव होय. चक्राचा उल्लेख म्हणजे लेखन करण्याकरिता उत्पन्न झालेली रेषा हीच रेषा वर्तुलाकार-रूपानें प्रगट झाली. "बहु स्या" असा दुसरा स्फोट झाल्याबरोबर त्या वर्तुलाकारात पश्यंति, मध्यमा, वैखरीरूप तीन मात्रा उत्पन्न झाल्या.

'विवक्षा व्यवसायोक्तिरूपा एतास्त्रिमातरः। पश्यन्त्यादि महा-देव्या स्वरूपं नात्र संशयः॥ एवं रूपा त्रिमातृका, सैव चक्रतां याता, चक्रस्य त्रैलोक्यमोहनादि सर्वानन्दमयबैन्दवान्तनवाव-रणात्मकस्य सुंदर्याधिष्ठानभूतस्य महेश्याः तदधिष्ठात्र्याः सुंदर्याश्च भेदलेशः बुधैर्नानुभूयते। श्रीसुंदरीस्वरूपत्वात् श्रीचक्रस्य। महत्तरा महिमा देवतानां नवयोनिर्नवचक्राणि दीधिरे। नवैव योगा नवयोगि-नीश्च। नवानां चक्राणां अधिनाथस्योना नवमुद्रा नवभद्रामहीनां एका साऽऽसीत् प्रथमासा नवाऽऽसीत्।

(उपनिषत्)

तच्छक्तिपंचकं सृष्ट्या लयेनाग्निचतुष्टयं।
पंचशक्तिचतुर्वन्हिसंयोगात् चक्रसंभवः
एतच्चक्रावतारं तु कथयामि वरानने॥

(वामकेश्वर तंत्र)

वरील उताऱ्यात त्रिमातृका उत्पन्न झाल्या असे लिहिले. पुढें ह्या त्रिमातृका चक्ररूपांत प्रगट झाल्यानंतर त्रैलोक्यमोहनचक्र, सर्वानंदमयचक्र

अशी चक्रोत्पत्ति झाली. त्या चक्राची अधिष्ठात्री देवता त्रिपुरसुंदरी आहे. त्यावरून हे त्रैलोक्यमोहनचक्र, श्रीचक्र आणि त्रिपुरसुंदरी यात पूर्ण अभेद आहे, आणि त्रिपुरसुंदरी प्रकृति ही पुरपाधिष्ठात्री असल्याने श्रीचक्रयंत्र त्रिपुरसुंदरीप्रमाणेंच नित्य, शुद्ध व अनादि आहे, हे सिद्ध झालें.

*वरील स्वभात श्रीचक्रयंत्र जसें अनादि व नित्य सिद्ध होतें त्या* प्रमाणानींच त्रिकोणात्मक सर्व यंत्रें व त्याची अधिष्ठात्री देवता याचा अभेद असल्यानें सर्व यंत्रें नित्य, शुद्ध व अनादि आहेत, हे सिद्ध झाले तथापि पुन्हा त्रिकोणात्मक यंत्राचीही उत्पत्ति कशी झाली ते पाहू.

प्रथमत बिंदु उत्पन्न झाला. त्यापासून वृद्धबिंदु उत्पन्न झाला, म्हणजे रेषा उत्पन्न झाली, व तिचे आदोलन होताना उजवीकडे वामा नामक बिंदु झाला. त्या बिंदूपासून जी रूपशक्ति उत्पन्न झाली, ती शक्ति विष्णुरूपिणी, सूर्यदेवतारूपी, सत्त्वगुणमयी इच्छाशक्तिरूपिणी होय डावीकडे आदोलन झालें. त्यापासून जी ज्येष्ठा शक्ति उत्पन्न झाली, ती अग्निदेवतारूपी ज्ञानरूपिणी व तमोगुणमयी होय. ह्या दोन्ही शक्ति खालीं पतन पावल्यानतर जी रौद्री शक्ति उत्पन्न झाली, ती शक्ति रोद्री रजोगुणात्मक व चद्रदेवतारूप असून क्रियाशक्तिमयी होय




अशा प्रकारानें त्रिकोणात्मक यंत्र तयार झालें. "स्वभाविकी ज्ञानबल-क्रिया च" या उक्तीप्रमाणे ही त्रिगुणात्मिका शक्ति – ह्या त्रिकोणयंत्राच्या-रूपानें वास करणारी शक्ति, नित्य, अनत व अनादि आहे हें सिद्ध झालें, व हे *त्रिगुणात्मिकशक्तिदर्शक यंत्र तिचेंच रूप असल्यानें तें यंत्रही नित्य,* अनत व अनादि आहे, हे उघडच आहे यास प्रमाणभूत वाक्य असें आहे ·

"श्रुतिस्तिस्रः पुरस्तिस्रस्त्रिपथा विश्वचर्षिणी। यंत्रकथा अक्षरा सन्निविष्टा अधिष्ठायैनां अजरा पुराणि महत्तरा महिमा देवतानाम्।"

मेयमातृप्रमामानप्रसरैः संकुचत्प्रभम्।
श्रृंगाटरूपमापन्नं इच्छाज्ञानक्रियात्मकम्।

धामत्रयं नाम सोमसूर्याग्निमंडलं। शक्तित्रयं नाम इच्छाज्ञानक्रियादि। एवंविधसमस्तवस्तुपूरणात् समष्टिरूपा त्रिपुरा नाम पराशक्तिः आविर्बभूव। त्रिमूर्तिसर्गाच्च पुरोभवाच्च, त्रयीमयत्वाच्च पुरोऽपि देव्या।

अयं त्रिलोकीमयपूरणाच्च प्रायोऽम्बिकायास्त्रिपुरेति नाम॥
आधैरग्निरवीन्दुबिंदुनिलयैरिति। वामा, ज्येष्ठा, रौद्री त्रिनामभिर्गीयते महादेवी। वामास्वान्तस्थितप्रपञ्चवमनात् विश्वजननयित्रीति अभिधीयते, ज्येष्ठा सर्वमंगलकारिणी, रौद्री सर्व रोगविद्राविणी।
(कामकलाविलास)

त्रिबिंदुरूप त्रिकोणरूप असा श्रृंगाटकत्रिकोण प्रथम उत्पन्न झाला. या श्रृंगाटकाच्या तीन बिंदूना निरनिराळीं अभिधानें दिलेलीं आहेत. तीं अशीं मेय, माता आणि प्रभा, इच्छा, ज्ञान, क्रिया; सोम, सूर्य, अग्नि, वामा, ज्येष्ठा, रौद्री, यापैकीं पहिल्या चार त्रयींचे अर्थ उत्तान आहेत, म्हणून शेवटल्या त्रयीचा अर्थ दिला, तो असा— *वामा* म्हणजे सर्व विश्व वमन करणारी, अर्थात विश्वजननी, *ज्येष्ठा* म्हणजे सर्व मंगलकारिणी व *रौद्री* म्हणजे सर्व रोग हरण करणारी.

याप्रमाणे पश्यन्ति, मध्यमा, वैखरीरूप श्रृंगाटक त्रिकोण आरंभीं उत्पन्न झाला. त्या तीन कोणबिंदूना उष्णता, प्रकाश व शक्ति; बाष्प जल व हिम; जन्म, आयुर्दाय व मृति; शरीर, मन व जीव अशीं हीं आणखी विशेषणें देता येतील. शास्त्रवेत्ते या त्रयीला, शक्ति, अवकाश व काल असेंही म्हणतात. गूढविद्यच्या दृष्टीनें हा श्रृंगाटक त्रिकोण प्रकाश जीवन व प्रेम या त्रयीनें व्यापला आहे असे म्हणता येईल. जीवनाची

गूढशक्ति प्रत्येक जन्मात अधिकाधिक उत्क्रान्त होत असल्यास हा त्रिकोण मार्गदर्शक आहे असेंही म्हणता येईल.

वरील त्रिकोणातील पहिला बिंदु इच्छाशक्तीचा आहे. मनुष्य समाजातील अगदीं खालच्या पातळीतील वर्ग आपातत. उत्पन्न होणाऱ्या इच्छा पुरविण्याची खटपट करणारा असतो. या वर्गांतील मनुष्याचा कल कार्यकारणभाव न पाहता शक्याशक्यता अगर इष्टानिष्टता या गोष्टींकडे न पाहता, आपोआप, सहजासहजीं ज्या इच्छा पूर्ण होतील, त्या पूर्ण करण्याकडे असतो. क्षुधा लागल्यास मिळेल ते खावें, तृषा लागल्यास मिळेल तें पाणी प्यावें, निद्रा आल्यास मिळेल त्या जागेत निद्रा करावी, ही पशुवर्गीय प्रणाली त्याचे वागण्यात दिसून येते. जणु काय पशुवर्गांतून नुकताच हा वर्ग मनुष्ययोनीत आला आहे. या वर्गांतीलच परंतु थोडा पुढें गेलेला वर्ग असा कीं, त्याचें इच्छासामर्थ्य विवक्षित उत्क्रांतीला पोचलेलें असतें व तो वर्ग सदसत् बुद्धि जागृत ठेऊन मार्ग क्रमीत असतो. या दोन्ही पातळींनील मनुष्ये जितकी इच्छाशक्ति व सदसत् बुद्धि जागृत ठेवतील, तेवढी त्याची प्रगती होत असते आणि जोपर्यंत त्याच्या इच्छाशक्तीची धाव चुकीच्या पायावर उभारलेली असते अथवा अव्यवस्थित किंवा कमकुवत असते, तोंपर्यंत ती त्याना उच्चदर्जाच्या स्थळीं पोहोचविण्यास अपात्र ठरते व ते अपक्रांतीला जातात.

उत्क्रांतीला जाणारा वर्ग ज्ञानार्जन करण्याची हाव बाळगतो. व त्यामुळें त्याला दुसऱ्याचा उपदेश ऐकावा, त्याचप्रमाणे कांहीं ग्रंथ वाचावे व वाचन झालेल्या विषयाचें मनन करावें असें वाटतें, आणि अशा प्रकारें ज्ञानसंपादनार्थ तो अहर्निश परिश्रम करीत असतो. अशा प्रकारानें त्रिकोणाचा दुसरा बिंदु जो ज्ञानशक्तीचा द्योतक असतो, त्याकडे त्याच्या वृत्तीची धाव असते. त्याच्या कल्पना दृश्य वस्तूवरच स्थिर झालेल्या असतात व कधीं अदृश्य व अमूर्त वस्तूबद्दलही विचार त्याचे मनात जागृत होतात. बुद्धिनिरूपाला पटणाऱ्या गोष्टींकडे त्याचा कल असतो

व तो असा बुद्धिनिष्ठ असल्यानें देहाभिमानी बनतो, तरी तो उत्क्रांतिपथावर असतो हे खास. बौद्धिक चिंतनाने त्याची सद्-असत् विवेक बुद्धि जागृत होते व त्याचा परिणाम असमाधान, अपूर्ण-बुद्धिग्राहकता या गोष्टींत दिसून येतो. तथापि जर तो केवळ बुद्धिसर्वस्वावर अवलंबून राहाणार नाहीं तर कालान्तराने व निसर्गत त्याचे ठिकाणीं उत्साहवर्धक ज्ञानाचा प्रादुर्भाव होतो.

अशा दुसऱ्या श्रेणींतील मनुष्यात आतापर्यंत प्रयत्न करून उत्पन्न झालेल्या ज्ञानाचा परिणाम विज्ञानात होतो. शृंगाटक त्रिकोणाचा जो ज्ञानाचा दुसरा बिंदु वरील स्तंभात निरूपिला आहे त्या बिंदूची अधिष्ठात्री शक्ति जी ज्ञानशक्ति तिचे आकलन त्या वर्गांतील मनुष्यास होतें. ही शक्ति प्राप्त होण्यापूर्वी मनुष्यास वस्तूचे व वस्तूंच्या स्थित्यंतराचे निरीक्षण व वस्तूंचें अनुभवजन्य ज्ञान प्राप्त झालें पाहिजे. थोडक्यात सांगावयाचें तर *कल्पनाशक्ति ही आरंभी श्रद्धेवर अवलंबून असते. बुद्धीच्या कसोटीला ती टिकलेली* नसते. परंतु मनात एखादी कल्पना आली तर प्रत्यक्ष व्यवहारातील अनुभवाशीं ती ताडून पहाता टिकली पाहिजे आणि ही कल्पना जर चुकीच्या पायावर आधारलेली असली तर ती टिकणार नाहीं किंवा टिकलीच तर हटवादीपणाने किंवा रूढीच्या वजनानें टिकेल. म्हणून *"अनुभव"* असे *ज्यास आपण म्हणतों तो सत्याचे पायावर उभारलेला असतो* व त्यामुळें त्या अनुभवाच्या सत्यतेची त्यास खात्री पटलेली असते. हाच *सत्य वस्तूचा साक्षात्कार होय.*

बुद्धिनिकषावर परजून उत्पन्न झालेले ज्ञान प्रकाशरूप आहे इतकेंच समजलें. परंतु ह्या प्रकाशाचा अनुभव आल्यास सर्वांभूतीं असेंच प्रकाश-रूपी ज्ञान आहे असें अपरोक्षसाक्षात्कारानें अनुभवास आलें तर ह्या मनुष्याचे ठिकाणीं *"सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्"* या वाक्याप्रमाणें सर्व प्राणिजाताबद्दल प्रेम उत्पन्न होईल.

असें प्रेम उत्पन्न झालें म्हणजे शृंगाटक त्रिकोणाच्या बिंदूपैकीं क्रियाश-

कीच्या बिंदूला मनुष्य पोचतो अपरोक्षानुभूति प्राप्त झाल्यानंतर आपल्याच ठिकाणीं नित्य तृप्त राहून निष्क्रिय जीवन घालविणे यातच वेदान्तज्ञानाची परिसमाप्ति आहे असे मानणारा मनुष्य खऱ्या जीवन्मुक्तीला पोचलाच नाहीं असे म्हणणे भाग आहे म्हणून तिसरा बिंदू जो क्रियाशक्तिरूप आहे ती क्रिया म्हणजे प्रेमाची श्रेष्ठ भूमिका होय एखादा साधा मनुष्य अणु म्हणजे काय, त्याचे घटक काय आहेत हें समजून घेऊन स्वस्थ बसेल, एखादा सृष्टिविज्ञानशास्त्रज्ञाला त्या अणूच्या घटकाच्या ज्ञानानें जे परिणाम होतात ते माहीत असल्याने ज्ञानाबद्दल त्याला अधिक महत्त्व वाटेल व एखादा शोधक रसायन शास्त्रज्ञ मनुष्यजीवनास अधिक सुखी करण्याकरिता त्या अणूच्या घटकाच्या ज्ञानाचा उपयोग करील त्याप्रमाणे गणित, विद्युत्शास्त्र, वाद्यवादनशास्त्र याचाही असाच मनुष्याचें सामाजिक जीवन सुखमय करण्यास उपयोग होतो, त्याचप्रमाणे वस्तूच्या अपरोक्ष ज्ञानाचा उपयोग अपरोक्षज्ञानी मानवी जीवन सुखकर करण्याचा प्रयत्न करील तर तो वरील नमूद केलेल्या शास्त्रज्ञापेक्षा कमी दर्जाचा आहे असें म्हणता यावयाचे नाहीं

याप्रमाणे या शृंगाटक त्रिकोणाच्या तीन बिंदूचे वर्णन झाल ह्या बिंदु त्रयाचीं कार्यें एकमेकाशीं किती सलग्न झालेलीं आहेत हे दाखविण्याकरिता त्या तीन बिंदूना तीन रेषाना जोडून टाकलें आहे आणि मुमुक्षरूपी जीवाची काही विशिष्ट कामगिरी असली, तर ती या त्रिकोणदर्शक बिंदु-त्रयीच्या योगानें इच्छा, ज्ञान व क्रिया याचा इतका परस्पर सयोग त्याच्या आयुष्यक्रमात व्हावयास पाहिजे की, या क्रिया एकसमयावच्छेदेंकरून जगत्कल्याणाचें कार्य करण्यास समर्थ होतील व "जगाच्या कल्याणा सताच्या विभूति" देह कष्टविती उपकारें या श्रीतुकाराममहाराजाच्या उक्तीप्रमाणें हा मुमुक्षु वर्तन करीत असतो, असे जगाच्या निदर्शनास यावें असें जगाच्या निदर्शनास आल्यास तो जरी मुमुक्षु आहे असें बाह्यात्कारी दिसलें तरी तो मुक्तच होय व सिद्धच होय यांत काहीं सशय नाहीं

शृंगाटकत्रयाचे म्हणजे शृंगाटक यंत्राचें इतकें वर्णन करण्याचा हेतु हाच कीं मंत्रोद्दिष्ट यंत्रस्थित देवतेची केवळ पूजा करूनच कार्यभाग झाला असें मुमुक्षूंनी व मंत्रवेत्त्यांनी समजूं नये. मंत्रसिद्ध देवतांच्या प्रसादानें मुमुक्षूंना मानवी समाजाची आधुनिक काळांत जी दुःखपरंपरा दिसत आहे ती दुःखपरंपरा नष्ट करण्याकरितां मंत्रशास्त्रवेत्त्यांचे लक्ष जावें, हीच खरी देवपूजा होय, असें मंत्रवेत्त्यांनी समजलें पाहिजे. हें थोडें विषयांतर झालें, परंतु शृंगाटक त्रिकोणाची वरिष्ठ भूमिका वर्णन करण्याकरिताच तें केलें आहे. याप्रमाणें यंत्राप्रमाणें त्यांचीही नित्यता सिद्ध झाली असो.

मागें सिद्ध केल्याप्रमाणें त्रिकोण यंत्र व चक्ररूप यंत्र हीं श्रीत्रिपुरसुंदरीरूप आहेत असें सिद्ध झाल्यानंतर आदिशक्तीपासून उत्पन्न झालेल्या सर्व देवता व त्यांचीं यंत्रें हीं पण नित्य व अनादि आहेत असें सिद्ध होतें. प्रत्येक देवतेच्या मंत्रानें त्या देवतेची उपासना करण्याकरितां त्या त्या देवतेचें यंत्र संपादन करून त्या यंत्रामध्यें देवतेचें आवाहन करून मंत्र जप झाला पाहिजे तर तो सिद्ध होईल, अन्यथा होणार नाहीं.

## ४ विश्व व तदंगभूत यंत्रें

विश्वप्रपंच नित्यच आहे. मुमुक्षूला विश्वांतील पदार्थांची क्षणभंगुरता दाखवून विश्वाच्या नामरूपापलीकडे असलेल्या वाच्यशक्तिरूप परब्रह्माची ओळख पटवून देण्याकरितांच फक्त विश्व हें क्षणभंगुर आहे, असें सबोधण्यात येतें. श्रीविष्णुसहस्रनामांत विश्व हें पहिलेंच नाव आहे. म्हणून विश्व नित्य आहे असें समजावें. द्वैत सांप्रदायांत हा प्रश्नच उद्भवत नाहीं कारण श्रीविष्णु ही देवता नित्य, शुद्ध, अविनाशी व अनादि आहे असें ते मानतात. त्या विश्वांतील दृश्य ग्रह व नक्षत्रें तसेंच सूर्य, चंद्र, ह्या देवता यंत्रात्मकच आहेत. गायत्रीचें गायत्री यंत्र हें त्रिकोण व अष्टदलात्मक आहे. सूर्य देवतेचें यंत्र द्वादशकोणात्मक, चंद्राचें षोडशकोणात्मक, मंगळाचें त्रिकोणात्मक, बुधाचें अष्टकोणात्मक, गुरूचें षट्कोणात्मक, शुक्र

यंत्र पंचकोणात्मक व शनियंत्र षट्कोणात्मक आहे. असे ग्रहांच्या यंत्रांचे प्रकार आहेत. याप्रमाणें श्रीवराह, श्रीनारसिंह, श्रीराम, श्रीकृष्ण, इत्यादि अवतारांच्या बहिरंग व अंतरंग पूजेकरितां निरनिराळीं यत्रें सांगितलीं आहेत.

## ५ बीजप्रबन्धः

मंत्रशास्त्रांत बीजांचा महिमा फार वर्णन केलेला आहे. निरनिराळ्या देवताचीं निरनिराळीं बीजें असतात. म्हणजे बीज मंत्र असतात. बीजमंत्र, मूलमंत्र, मालामंत्र असे मंत्रांचे प्रकार पूर्वी सांगितले आहेत. मंत्राभिधान नांवाच्या प्रकरणांत अ आदि मत्रांचे अर्थ दिलेले आहेत, व शेवटीं कांहीं बीजमंत्रही दिलेले आहेत. ते असे :

| | | | |
|---|---|---|---|
| ॐ | प्रणव, अथवा तार | आं | पाशबीज |
| र्‍हीं | गिरिजाबीज | सौं | देवीबीज अथवा वरुणबीज |
| क्लीं | माया अगर शक्तिबीज | क्लीं | कामबीज |
| श्रीं | कमला अगर लक्ष्मीबीज | ग्लौं | भूमिबीज अगर गणेशबीज |
| स्वाहा | अग्निजाया | श्रीं | विश्वबीज |
| र्‍हूं | कूर्च कवच | क्ष्रौं | नारसिंहबीज |
| हुं | वर्मबीज | ह्रौं | प्रसादबीज अथवा शिवबीज |
| स्त्रीं | वधूबीज | गं | गणेशबीज |
| ऐं | वाग्बीज | ई | वेदमाता गायत्रीबीज अथवा लक्ष्मीबीज. |

वरील प्रकारानंतर मत्राभिधान याच प्रकरणांत खालीं लिहिल्याप्रमाणें मातृकाचे अर्थ दिलेले आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीं देण्यांत येत आहेत.

ॐ कारबीज हे वर्तुळाकार आहे. सर्व मत्राच्या पूर्वी याचा उच्चार व्हावा लागतो व सर्व बीजाची उत्पत्ति ह्या 'प्रणव' बीजापासून होते. हा वेदसारच आहे व वेदबीजच होय. त्रिकूटात्मक म्हणजे अ, उ,

म अशा कूटाचा बनलेला आहे व ह्याला अ, आ, उ, ऊ, म व अनुस्वार असे पाच रश्मि म्हणजे किरणपुज आहेत. हा भवनाशक आहे. मत्रविद्या ह्या बीजापासून उत्पन्न झाली व सर्व मातृका ह्या प्रणवापासून उत्पन्न झाल्या. हा अनादि आहे व अद्वैतसिद्धि करणारा आहे

अ श्रीकण्ठबीज व कामाकर्षिणी बीज.
आ अनतबीज, विनायकबीज व भगमालिनीबीज.
इ चक्रबीज, विघ्नविनायकबीज, रुद्रबीज व नित्यक्लिन्नाबीज
ई त्रिमूर्तिबीज, भेरूण्डाबीज व कामकलाबीज, विंदुमालिनी व त्रिपुरसुदरीबीज.
उ शकरबीज, षडाननबीज, वन्हिवासिनीबीज.
ऊ मधुसूदनबीज, भैरवबीज, रूपाकर्षिणीबीज.
ऋ त्रिविक्रमबीज, शिवदूतीबीज, गन्धाकर्षिणीबीज.
ऌ श्रीधरबीज, दीर्घजिव्हाबीज, चित्ताकर्षिणीबीज.
ॡ कमला हृषीकेशबीज, धैर्याकर्षिणीबीज.
ए मरुत्बीज, वन्हिबीज, एकादशीबीज, कुण्डलीबीज.
ऐ वाग्भवबीज, सरस्वतीबीज, विजयाबीज, द्वादशीबीज.
ओ सद्योजातबीज, त्रयोदशीबीज, वासुदेवबीज, गायत्रीबीज.
सर्वमगलाबीज, त्रैलोक्यविजयाबीज, बीजादिकर्षिणीबीज.
औ ज्वालिनीबीज, आमाकर्षिणीबीज, ज्वालामालिनी बीज.
अं सोमबीज, अमृताकर्षिणीबीज, कुब्जिकाबीज
अः रतिबीज, सुयशाबीज.
क महाकाली स्कन्धबीज, कामेश्वरीबीज
ख आकाशबीज, तापिनीबीज
ग गगाबीज, गणेशबीज, विद्यामाबीज, भोगिनीबीज.
घ चरणबीज, त्रैलोक्यविद्याबीज.
ङ भैरवबीज, कामेशीबीज.

च बुधबीज, चंद्रमाबीज, कुलावतीबीज.
छ सदाशिवबीज, विलासिनीबीज.
ज नन्दीबीज, भोगदाबीज, विजयाबीज.
झ गुहबीज, द्राविणीबीज.
ट पृथ्विबीज, मरुत्बीज.
ठ वन्हिबीज.
ड त्रिवक्त्रबीज, योगिनीबीज.
ढ यज्ञेशबीज, विघ्नेशबीज, मालिनीबीज.
त वाराहीबीज, श्यामसुखीबीज.
थ भद्रकालीबीज.
द धराबीज.
ध शंखिनीबीज, धनेशबीज.
न ज्वालिनीबीज.
प कालरात्रिबीज, शनिबीज.
फ कालकुब्जिनीबीज.
ब क्लेदिनीबीज, तापिनीबीज.
भ क्लिन्नाबीज, वा क्लिन्नाबीज.
म कालीबीज, मातंगमालिनीबीज.
य वायुबीज, चामुण्डाबीज.
र अग्निबीज, क्रोधिनीबीज, त्रिपुरसुंदरीबीज.
ल शक्रबीज, अमृतबीज, पृथ्वीबीज, शवबीज.
व वरुणबीज.
श कामबीज, सुभगाबीज.
ष सूर्यात्माबीज.
स सम्मोहा ब्राह्मीबीज.
ह शिवबीज.

ळ पृथ्वीबीज, व्यापिनीबीज.
क्ष नृसिंहबीज, कालजिव्हबीज.

बीजनिघटु म्हणून एक बीजमत्राचा भाग आहे. त्यावरून खालीं लिहिल्याप्रमाणे मातृका व इतर बीजें याचे विवरण केलेलें आहे. खालीं लिहिलेले श्लोक स्पष्टार्थदर्शक आहेत. सर्वत्र ते जसेच्या तसेच दिले आहेत.

अ विद्युजिव्हा, आ कालरज्जी, इ गर्जिनी, ई धूम्रभैरवी, । उ कालकूटा, ऊ विदारी, ऋ महारौद्री, ॠ भयकरी, ॥ ऌ संहारिणी, ॡ करालिनी, ए ऊर्ध्वकेशी, ऐ उग्रभैरवी, । ओ भीमाक्षी, औ डाकिनी, अं रुद्राकिणी, अः चण्डिका ॥ क क्रोधीश , ख वारण', ग चण्ड., घ कामुक । ङ उत्मत्तभैरवी, च ज्वालामुख', छ रक्तदष्ट्र', ज असिताग. ॥ झ वलयामुख , ञ विद्युन्मुख , ट महाज्वाली, ठ कपाली, । ड भीषणः, ढ गुरुः, ण प्रहारी, त रोरेव , थ दण्डी, ॥ द वलिन', ध शूलधृक्, न सिंहनादी, प कपर्दी,। फ प्रलयाग्निः, ब भयकरः, भ बहुरूपी, म महाकाल , । य स्थिरात्मा, र क्षतजोक्षित , ल बलभेदी, । व रक्तपटः, श चण्डीश , ष ज्वलनध्वज', स धूम्रध्वज , ह योगवक्त्रः ॥

श्रीं विष्णुप्रिया ह्रीं धूम्रभैरवी क्लीं कालीबीज हू रुद्राकिणी । ऐं वाग्भवबीज फट् विद्युजिव्हा क्रों क्रोधीशबीज स्वाहा। अग्निवल्लभाबीज क्लीं कामबीज हु कालकूटबीज ह्रूँ डाकिनीबीज । स्त्रीं धूम्रभैरवीबीज भ्रू क्षतजोक्षितबीज स्फें कालाग्निबीज फ्रें वेतालबीज ॥ क्रू स्वाहा कल्पिनीबीज प्रीं घोराक्षीबीज ठ ठ ठ ठ महाकालबीज स्फीं प्रलयाग्निबीज हू कालरात्रिबीजं ह वैवस्वतबीज हसखफ्रे ऊर्ध्वकेशीबीज। ए योनीबीज हु दुर्गाबीज नाद लोकमाता बिंदु लोकपिता ॥

वर लिहिल्याशिवाय आणखीं काहीं बीजें खालीं देण्यात येत आहेत.

आ असाध्यसाध. ह्रीं सर्वभूतिप्रद. सौं सर्वमन क्षोभण. द्रा चिरजीवन ब्लूं सम्मोहन वषट् वशीकरण. वौषट् आकर्षण. हु द्वेषण. ट ट स्तभन सौ सर्वलाभिवर्धन, नम मरणनिवारण. खें वे मारणबीज. आणखी २६ बीजाचे अर्थ मिळाले नाहीत. 'ह्रौं' हें प्रसादबीज आहे.

## गायत्री जपासाठीं चोवीस मुद्रा


१ सुमुखम्


२ संपुटम्


३ विततम्


४ विस्तृतम्


५ द्विमुखम्


६ त्रिमुखम्


७ चतुर्मुखम्


८ पंचमुखम्


९ षण्मुखम्


१० अधोमुखम्


११ व्यापकांजलिकम्


१२ शकटम्

## मुद्रा प्रकरण

मंत्रशास्त्रांत मुद्रांचें महत्त्व यंत्रांप्रमाणेंच आहे. त्या त्या मुद्रेनें त्या त्या


१३ यमपाशम्


१४ ग्रंथितम्


१५ उन्मुखोन्मुखम्


१६ प्रलंबम्


१७ मुष्टिकम्


१८ मत्स्यः


१९ कूर्मः


२० वराहकम्


२१ सिंहाक्रान्तम्


२२ महाक्रान्तम्


२३ मुद्गरम्


२४ पल्लवम्

देवतेची प्रसन्नता संपादन करावी लागते. परंतु ह्या मुद्रा गुरुमुखानेंच व गुरूंनी दाखविलेल्या पद्धतीनें कराव्या लागतात. गायत्रीमंत्रारंभींच्या चोवीस मुद्रा व दशमुद्रांचे फोटो खालीं दिले आहेत.

सुमुखं संपुटं चैव विततं विस्तृतं तथा ।
द्विमुखं त्रिमुखं चैव चतुः पंचमुखं तथा ॥ १ ॥
षण्मुखाधोमुखं चैव व्यापकांजलिकं तथा ।
शकटं यमपाशं च ग्रंथितं चोल्मुकोल्मुकं ॥ २ ॥
प्रलम्बं मुष्टिकं चैव मत्स्यं कूर्मं वराहक ।
सिंहाक्रान्तं महाक्रान्तं मुद्गरं पल्लवं तथा ॥ ३ ॥
एता मुद्रा न जानाति गायत्री निष्फला भवेत् ।
एता मुद्रास्तु कर्तव्या गायत्री सुप्रतिष्ठिता भवेत् ॥ ४ ॥

गायत्रीजपानतरच्या मुद्रा—

सुरभिर्ज्ञानशून्यं च योनि कूर्मोय पंकजं ।
लिंगनिर्वाणमुद्रां जपान्तेष्टौ प्रकीर्तिताः ॥

पूजारंभीं करावयाच्या पचमुद्रा —

अभयमुद्रा, चिन्मुद्रा, वरदमुद्रा, साक्षात्कार, निर्वाणिणी अशा आहेत.
नीराजन दर्शनानतर करावयाच्या मुद्राः—

कालमुद्रा, योगमुद्रा, सिद्धिमुद्रा, वैहायसीमुद्रा, रसमुद्रा, सक्षोभणमुद्रा, शत्रुक्षयकरीमुद्रा, पातालमुद्रा, अजलिमुद्रा, परमामुद्रा, आवाहनादि नवमुद्रा.

आवाहनादि मुद्रा—

विष्णुपूजेंतील अकरा मुद्रा —

शंख-चक्र-गदा-पद्म-वेणु-श्रीवत्स-कौस्तुभाः ।
वनमाला तथा ज्ञानमुद्रा विद्याव्हया तथा ।
गुरुडाख्या तथा मुद्रा विष्णोः संतोषदायकाः ।

शिवपूजेंतील दशमुद्रा —

लिंगयोनित्रिशूलाक्षमालाऽभीतिमृगासिकाः ।
खट्वाङ्गा च कपालाख्या डमरूः शिवतोषदाः ॥

सूर्यपूजेंत पद्मा नावाची एकच मुद्रा आहे.

## पूजेसाठीं अष्टमुद्रा



१ सुरभिः

२ ज्ञानम्

३ वैराग्यम्



४ योनि



५ शंख



६ पंकजम्





७ लिंगम्

८ निर्वाणम्

गजानन पूजेंत सप्तमुद्रा आहेत —

> दन्त पाशाङ्कुशाविघ्नपरशुर्लड्डुकस्तथा ।
> बीजापूराह्वया मुद्रा ज्ञेया गणपपूजने ॥

देवीपूजेंतील नवमुद्रा —

> पाशाङ्कुश वराभीतिः खड्गचर्म धनुः शराः ।
> मुशली मुद्रिकाः दौर्गी मुद्रा शक्तेः प्रियंकराः ॥

ब्रह्मास्त्रजपपूजनाचे वेळीं करावयाच्या मुद्रा —

> मुद्राः पाशं च वज्राख्या जिव्हा ब्राह्मी तथैव च ।
> पंचमुद्राः समाख्याता ब्रह्मास्त्रजपपूजने ॥

वाग्वादिनी व लक्ष्मी पूजेला लक्ष्मी व अक्षमाला, वीणा, व्याख्या, पुस्तक या मुद्रा होत.

वन्हिपूजेंत सप्तजिव्हा मुद्रा सांगितली आहे.

त्रिपुरसुंदरी पूजनांत दहा मुद्रा सांगितल्या आहेत. त्या अशाः—

सक्षोभिणीमुद्रा, बाण, आकर्षण, वश्य, उन्माद, महाकुशमुद्रा, खेचरी, विजयिनी, त्रिखंडा, व धनुर्मुद्रा

अभिषेकाचे वेळीं कुंभमुद्रा, आसनाकरिता पद्ममुद्रा, विघ्नप्रशमनाकरिता काळाकर्षिणी, जलशोधनाकरिता गालिनी

गोपाळपूजेंत वेणुमुद्रा, रामार्चनाकरिता धनुष्य व बाणमुद्रा, परशुराम पूजनात परशुमुद्रा करावी जगन्मोहन पूजेंतील जगन्मोहन कर्मांत काममुद्रा योजावी वासुदेव पूजेंत, कुजवनमुद्रा योजावी प्रार्थना करावयाचे वेळीं प्रार्थना मुद्रा करावी

आवाहनी, स्थापनी, सन्निधापिनी, सबोधिनी, सन्मुखीकरणी, अवगुंठन मुद्रा, या मुद्रा पूजनाचे आधीं कराव्या.

□ □

अमृत-मंजिरी

१. मंत्राचे विधि म्हणजे त्यांचीं 'अभौतिक' यंत्रेंच होत.
२. यंत्र म्हणजे सूक्ष्मशक्तींवर स्वामित्व गाजविण्याचें साधन.
३. तंत्रविद्या ही 'कृष्ण विद्या' नाहीं. ती शक्तिविद्येचें एक स्वरूप आहे.
४. मंत्रशक्तिग्रहणार्थ सर्वप्रकारच्या 'शुचितेची' निकडीची आवश्यकता असते.
५. मुद्रामुळें ज्ञानतंतूवर परिणाम होतो.
६. मुद्रा म्हणजे त्या त्या स्थानातील देवतारूपी शक्तिकेंद्रें जागृत करण्याची कृति.

# ६ तेजोबलवर्चसी गायत्र्योपासना

## गायत्री – यंत्र व मंत्र महिमा

गायत्री यत्र ताब्याच्या अगर चादीच्या पत्र्यावर उठवून घ्यावें कोण खालीं याना व 'भो भो गायत्री' ही अक्षरे वर यावीन ह्या अक्षराचे वर त्रिरेखात्मक जागेंत 'ॐ भूर्भुव स्व ॐ' असे यावें. नतरच्या अर्धरेपेंत 'तत्सवितुर्वरेण्य' नतरच्या जागेंत 'ॐ' नतर भर्गोदेवस्यधीमहि 'नतर ॐ' नतर 'धियोयोनः प्रचोदयात्' नतर 'परोरजसे सावत्' नतर 'ॐ' अशीं अक्षरे लिहावीं (हे मत्रसिद्धि साधनाकरिता उपयोगावयाचे गायत्रीयत्र निराळें आहे) पण पुढें अष्टकोनात्मक गायत्री मंत्र दिलें आहे

सा हैषा गयास्तत्रे प्राणा वै गयांस्तत् प्राणांस्तत्रे तद्यत् गयांस्तत्रे तस्मात् गायत्री नाम ॥१॥ (शतपथ ब्राम्हण १८-४-१५ १०)
यस्मा अन्वाह तस्य प्राणांस्त्रायते। (बृहदारण्यकोपनिषद)
वाग् वै गायत्री वाग् वा इदं सर्वं भूत गायति च त्रायते च (छांदोग्योपनिषद)

गानात् त्राणाच्च गायत्र्या गायत्रीत्यम् गायतं त्रायते इति।
गायतस्त्रायसे देवि तद् गायत्रीति गद्यते।
गय प्राण इतिप्रोक्तस्तस्य प्राणादपीतिवा।

गय म्हणजे प्राण ह्याचें रक्षण करिते म्हणून तिला गायत्री म्हणतात. हे गायत्री देवी, जो नेहमीं तुझी प्रार्थना करितो, त्याचें तू रक्षण करितेस. वाणी

हीच गायत्री, वाणी हीच सर्व जगताचे वर्णन करिते व रक्षण करिते. वर्णन करणाऱ्याचे रक्षण केल्यामुळे गायत्रीला गायत्रीत्व येतें.

## गायत्री यंत्र



गायत्रीमंत्राचें सामगायन केल्यामुळें सामगायकाचें ती रक्षण करिते.

> सर्वे शाक्ता द्विजाः प्रोक्ता न शैवा नच वैष्णवाः।
> आदिदेवीमुपासन्ते गायत्रीं वेदमातरम्।

वस्तुतः शैव, वैष्णव, सौर व गाणपत्य हे भेद व्यर्थ होत, कारण सर्व द्विज गायत्रीची उपासना करितात म्हणून सर्व त्रैवर्णिक शक्ति उपासक होत. मुक्ता, विद्रुम, हेम, नील, धवल, अशा पाच रंगांनी युक्त श्रीगायत्री देवीच्या पंच मुखांचे वर्णन पुराणांतरीं केलेलें आहे व अशा

गायत्रीमंत्राचे अर्थहि पंचदेवात्मक केलेले आहेत. पंचदेवोपासना ह्या एका गायत्रीमंत्रानेंच सिद्ध होते, म्हणून ह्या मंत्राची महती वर्णन केलेली आहे.

> जिह्वा दग्धा परान्नेन हस्तौ दग्धौ[१] प्रतिग्रहात् ।
> मनो दग्धं परस्त्रीभिः कथं सिद्धिर्वरानने ॥

मंत्रसिद्धि कशानें होईल याचा विचार करीत असतां असें म्हटलें आहे 'हस्तौ दग्धः प्रतिग्रहात्' म्हणजे मंत्रसिद्धीची इच्छा करणाऱ्या साधकानें प्रतिग्रह म्हणजे दान घेऊं नये. सिद्धि प्राप्त व्हाव्या अशी इच्छा करणाऱ्याला हा नियम लागू आहे. तथापि गायत्रीमंत्राची उपासना शास्त्रीय रीतीनें सर्वात्मभावनारूप अभेद भावानें अपरोक्षानुभूति प्राप्त व्हावी म्हणून जो करील त्यानें प्रतिग्रह घेतला तरी गायत्रीमंत्राच्या प्रथम पादाच्या उपासनेच्या फलानें तो प्रतिग्रहरूपी पातकत्रयप्रतिबंधांतून मुक्त होतो. तीन लोकांतील धनसंपत्तीचा प्रतिग्रह करील तरीसुद्धां प्रथम पादाच्या उपासनेच्या फलानें त्याचे प्रतिग्रहरूपी पातक नष्ट होईल. वेदत्रयींच्या फलाचा प्रतिग्रह करील तर त्या पातकापासून गायत्रीच्या दुसऱ्या पादाच्या उपासनेनें उत्पन्न होणाऱ्या फलानें वेदत्रयीच्या प्रतिग्रहरूपी पातकापासून तो मुक्त होईल, व सर्व जगत्‌रूपी प्रतिग्रह जरी केला तरी गायत्रीच्या तृतीय पादाची उपासना करणारास प्रतिग्रहाचें पातक लागत नाहीं. गायत्रीमंत्राचा चतुर्थ पाद परब्रह्मस्वरूप असल्यानें त्या चतुर्थ-पादाच्या उपासनेचें फल अतुल आहे.

> य एतां वेद गायत्रीं पुण्यां सर्वगुणान्विताम् ।
> तत्त्वेन भरतश्रेष्ठ स लोके न प्रणश्यति ॥

या श्लोकानेंही गायत्रीमंत्राचें महत्त्व समजून येत आहे.

---

१. हस्तौ दग्धौ असाही पाठ आहे.

तत्र गायत्रीं प्रणवादिसतव्याहृत्युपेतां
शिरःसमेतां सर्ववेदसारमिति वदन्ति।
त्रिपदा गायत्री तु प्रणवान्ता जप्तव्या।

(शांकर गायत्रीभाष्य)

गायत्रीमंत्र चारी वेदांत आहे. ऋग्वेदात अ. ४. व १० मंत्र ३ सूक्त ६२ मध्यें आहे. यजुर्वेद संहितेच्या तिसऱ्या अध्यायांत ३५ वा मंत्र गायत्रीमंत्र होय. सामवेदांत गायत्री उपनिषद् स्वतंत्र आहे. नारायण उपनिषदांत ३५ सावा मंत्र गायत्रीमंत्रच आहे. अथर्ववेदांत सूर्योपनिषद् या उपनिषदांत गायत्रीमंत्र आहे. छांदोग्य उपनिषदांत व बृहदारण्यकांत गायत्रीमंत्राचा महिमा वर्णिलेला आहे. 'गायत्री छंदसां मातेदं ब्रह्म जुषस्व मे' असें श्रुति म्हणते.

महर्षि वाल्मिकीऋषींनी वाल्मिकी रामायणाच्या चोवीस हजार श्लोकां पैकीं प्रत्येक सहस्र श्लोकाचे आरंभीं गायत्रीमंत्रातील एकएक अक्षर घातलेलें आहे. श्रीभागवताचेही द्वादश स्कंध लिहितांना गायत्रीमंत्रातील दोन दोन अक्षरांचें प्रत्येक स्कंधांत वर्णन आहे व पहिल्या श्लोकांत गायत्री मंत्रातील धीमही हे पद 'सत्यं परं धीमही' या श्लोकांत आणलें आहे श्रीभगवद्गीतेंत श्रीभगवान गोपालकृष्णानी 'गायत्री छंदसामहं' म्हणून गायत्रीची महती गायिली आहे पराशरसंहिता, भविष्यपुराण, अग्निपुराण व पद्मपुराण या पुराणांत गायत्रीची महती वर्णिलेली आहे. महाभारतग्रंथ प्रथमतः 'जय' या नावानें संबोधिला जात असे. त्याचे चोवीस हजार श्लोक होते व त्या जय ग्रंथांत श्रीभगवद्गीतेचे चोवीस अध्याय नमूद केलेले होते. या चोवीस अध्यायाचे आरंभीं गायत्रीमंत्राचीं चोवीस अक्षरें आलेलीं होतीं असा चोवीस हजार श्लोकाचा जय ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. एतद्दर्शनें गायत्रीमंत्र किती पूज्य, प्रीतिपात्र व महनीय होता तो प्रस्तुतकालीं तसा मानला जातो काय? हें वाचकांनीच ठरवावें.

कोणीही आपल्या गुप्तधनाची प्रसिद्धी करू इच्छित नाहीं व यामुळें ऋषीमुनी यांनी गुप्तधनरूपी गायत्रीमंत्राच्या शक्तीचा परिस्फोट केलेला नाही. शिवपुराण, कालिकापुराण याप्रमाणें गायत्रीमहापुराणही कोणा ऋषीला सहज लिहिता आलें असतें असें एक छोटेसें शतश्लोकी गायत्री पुराण आमचे पाहण्यात आलें आहे. गायत्रीमंत्राबद्दल याज्ञवल्क्यऋषींनीं असें म्हटलें आहे कीं

> यथा च मधुपुष्पेभ्यो घृतं दुग्धाद्रसात् यथा ।
> एवं हि सर्ववेदाना गायत्री सारमुच्यते ॥

गायत्रीउपासना त्रैवर्णिकाच्या सध्येंत प्रामुख्यानें येते प्रत्यक्ष गायत्री मंत्राचा जप व सूर्योपस्थानात गायत्रीचें दर्शन व सूर्यचरणाची स्तुति असा सध्येचा क्रम आहे ही सध्या त्रिकाळ करावयाची असते. उपनयनाचे वेळीं गायत्रीमंत्राचा उपदेश होतो 'उपदिशति' म्हणजे जवळ बसवून दाखवितो. गायत्रीमंत्रात वर्णिलेलें सूर्यतेज बटूच्या ठायीं आहे, तें तेज बटूला दाखविणें असा अर्थ आहे आपल्या ठिकाणीं तें सूर्यतेज आहे अशा प्रकारचा अनुभव बटूस आणून देणे ही गोष्ट किंवा ही क्रिया आजकाल सर्वतोपरी लुप्त झाली आहे 'भूर्भुव स्व' ह्या तीन व्याहृति म्हणून व त्यांनीं निर्दिष्ट केलेल्या स्वर्गलोकात असलेल्या म्हणजे आपणास दृग्गोचर होणाऱ्या सूर्यदेवतेजवळ जाऊन तेथून पुढें दिसणारा 'तत्सवितुर्भर्ग' दुसऱ्या सूर्याचें म्हणजे आपल्या शरीरातील भ्रूमध्यस्थित आत्मतेजाला सहस्रार चक्रस्थित परमात्मतेजाचे दर्शन करवून देणें, ही क्रिया एखाद्यासच परिचित असेल! त्यामुळें बटूला गायत्रीदेवीच्या मंत्राचा उपदेश करणें ही बाब केवळ उपहासात्मक झाली आहे असो केवळ गायत्रीमंत्राचा शब्दश उपदेश करणे ही गोष्ट कस्पटाप्रमाणे निरर्थक झाली आहे! *गायत्रीमंत्राचा उपदेश करण्यापूर्वी उपदेशाधिकार प्राप्त्यर्थ बटूच्या पित्याला अगर पितृसदृश दायादाला गायत्रीमंत्राचा*

चाराशें गायत्रीमंत्र जपावा लागतो. तसा जप स्वतः करण्याऐवजीं तो जप ब्राह्मणाद्वारा केला तरी चालेल अशी शास्त्रज्ञाकडून सोय निघाली आहे. परंतु तो क्रमही आतां बहुतारीं लुप्त झाला आहे. गायत्रीमंत्र कसा म्हणावा ही गोष्ट उपदेशकर्त्यालाच अननुभूत असेल तर तो उपदेशकर्ता बट्रूला तरी काय शिकविणार? "अन्धेनैव नीयमाना यथान्धाः' असा क्रम चालला आहे. 'गायंन त्रायते गायत्री' ही गोष्टही अशक्यच होऊन बसली आहे. गायत्रीमंत्रात प्रणव कोठें म्हणावा हेही माहीत नाही. भूशुद्धि, भूतशुद्धि, प्राणप्रतिष्ठा, अतर्मातृका, बहिर्मातृका, शापविमोचन, उत्कीलन, सजीवन व अस्त्रोपसंहार या क्रियाही माहीत नसतात.

वैदिक सध्या व तात्रिक संध्या त्रिकाळीं करावयाच्या असतात. तांत्रिक संप्रदायात तुरीय संध्या असते, म्हणजे ती मध्यरात्रीं करावयाची संध्या होय. वस्तुतः प्रातःसंध्या आणि सायंसध्या या दोन मुख्य सध्या होत. रात्र व दिवस याचा जो सधि ती संध्या वेळा होय. स्वरशास्त्राचा अभ्यास करणारे योगी सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यन्त एकच स्वर म्हणजे इडा (डाव्या नाकपुडींतून वाहाणारा स्वर), अगर पिंगला (उजव्या नाकपुडींतून वाहणारा स्वर) कायम करीत असतात. सूर्योदयाबरोबर इडा नाडीचा उदय होतो. हा जो इडापिंगलेचा उदयास्त त्या दोन्ही नाड्यामध्ये सुषुम्ना नाडी पधरा अगर वीस पळेंपर्यंत चालू असते म्हणजे त्याच वेळीं दोन्ही नाड्या सारख्या चालू असतात. अशा या सुषुम्ना नाडींची वेळा अभ्यासानें वाढविता येते, हा जो सुषुम्ना नाडीचा काल तीच खरी सध्यावेळा होय. आणि ही वेळा सूर्योदय व सूर्यास्तकाल हीच होय. योगी लोक याच नाडींन ध्यानगत होत असतात. 'महाजनो येन गत स पथा.' या न्यायानें सामान्य लोक प्राकृतिक सूर्योदय व सूर्यास्त यास संध्या म्हणतात व त्याप्रमाणे सध्याची योजना केलेली आहे.

वैदिक सध्येंत त्रिकाल सध्याच्या देवता ब्रह्मा, रुद्र व विष्णु अशा दिलेल्या आहेत. परतु तात्रिक सध्याच्या देवता बाला, युवती व वृद्धा

अशा दिलेल्या आहेत. तदनुरूप रुद्रदेवता संहारकर्ता म्हणजे वृद्ध अशी योजना दिसते. वैदिक संध्येत माध्यान्हकाळीं रक्षण करणारी विष्णुदेवता असावी. परंतु सायंकाळीं म्हणजे प्रलयकाळीं विष्णु देवता नियत केलेली आहे याबद्दल लेखकाचें म्हणणे असें आहे कीं, माध्यान्ह मध्येंचा वेद यजुर्वेद आहे व यजुर्वेदात रुद्रदेवताराधन नमकचमकात्मक रुद्रपाठानें करावें असें सांगितलें, म्हणून रुद्रदेवता माध्यान्हकाळीं ठरविली असावी. तसेंच सायंसंध्येला सामवेदसंहिता सांगितली आहे व गीतेंत श्रीकृष्णानीं 'वेदानां सामवेदोऽस्मि' असें सांगितलें आहे. यामुळे सायंसंध्येला विष्णुदेवता नियत केली असावी

वस्तुत ब्रह्मदेव हे रज प्रकृत्य

विष्णु तम प्रकृत्यात्मक आहेत.

तीं अनुक्रमें रजोगुणात्मक, तमोगुणात्मक व सत्वगुणात्मक आहेत म्हणजे अधिकार जे दिले ते म्हणजे ब्रह्मदेवाला सृष्ट्युत्पादनाचा अधिकार, रुद्राला संहाराचा अधिकार व श्रीविष्णूला सृष्टीपालनाचा अधिकार हे होत. म्हणजे ब्रह्मा रजोगुणात्मक, शिव तमोगुणात्मक व श्रीविष्णु सत्वगुणात्मक असे त्यांचे गुण आहेत. म्हणून त्यांनीं ह्या जबाबदाऱ्या पत्करिल्या आहेत. *प्रकृति म्हणजे स्वाभाविक धर्म व गुण म्हणजे* अस्वाभाविक धर्म. अस्वाभाविक धर्मस्वीकार करणें म्हणजे स्वाभाविक प्रकृतिलोप करणें होय, म्हणजे आपल्या स्वभावाला न पटणाऱ्या सत्ताधिकाऱ्याची भूमिका धारण करणें होय. जसें सात्त्विक स्वभावाच्या मनुष्याला सेनानायकाची सत्ता चालविण्याचा प्रसंग येणें. सृष्ट्यारंभपूर्व–स्थिति म्हणजे निर्गुणत्व व प्रकृति स्थायित्व होय. स्वाभाविक धर्मलोप म्हणजे अधिकारग्रहण म्हणजे सगुणरूप धारण. सृष्टिक्रिया सुरू झाली म्हणजे श्रीविष्णु हे सत्त्वगुणी व श्रीशिव हे तमोगुणी होत असें त्यांचें ध्यान करावयाचें व मूळप्रकृत्यात्मक ध्यान म्हटलें तर माध्यान्हकाळीं सत्त्वप्रकृत्यात्मक शिवदेवतेचें ध्यान पाहिजे व सायंकाळीं तमप्रकृत्यात्मक श्रीविष्णुदेवतेचें ध्यान करावयास पाहिजे, व त्याचे उलट गुणात्मक

ध्यान म्हटलें तर माध्यान्हकाळीं सत्त्वगुणी श्रीविष्णुदेवतेचें ध्यान व सायंकाळीं तमोगुणी श्रीशिवदेवतेचें ध्यान करावें. तमोगुणी श्रीशिवाचा मुलगा श्रीगजानन हे विघ्नहारक व सत्त्वगुणी श्रीविष्णूचे चिरंजीव मदन हे विघ्नकारक. यावरून श्रीशिव हे सत्त्वप्रकृति आहेत व श्रीविष्णु हे तमप्रकृति आहेत. गुण आणि प्रकृति याच्या योगानें हे दोघेही उलटसुलट तमोगुणप्रधान अगर सत्त्वगुणप्रधान होतात. याप्रमाणे माध्यान्हसंध्येत श्रीशिवाची योजना ते सत्त्वप्रकृत्यात्मक म्हणून केली असावी व श्रीविष्णूची सायंसंध्येची देवता ते तमप्रकृत्यात्मक म्हणून केली असावी असा लेखकाच्या म्हणण्याचा आशय आहे व या प्रकारच्या विचारसरणीला स्कंदपुराणाचा आधार आहे.

वेदग्रंथातील पुरुषसूक्तात शूद्राची योजना वेदपुरुषाच्या चरण कमलाजवळ केलेली आहे. म्हणजे 'पद्भ्याशूद्रोऽजायत' वेदपुरुषाच्या चरणाजवळ ते असतात. त्यांच्या उपासनेबद्दल कांहीं उल्लेख दिसत नाहीं. परंतु वेदाबरोबरच अस्तित्वात असलेल्या आगमादि ग्रंथात शूद्राच्या उपासनेबद्दल पुष्कळ उहापोह केलेला आहे. म्हणजे शूद्राकरिता गायत्री व ध्यान सांगितलें आहे. व त्याशिवाय शक, शबर, यवन, असे जे आर्यावर्ताबाहेरील लोक अथवा आर्यावर्तांतील हीन संस्कृतीचे लोक यांच्याकरिता दीक्षादि विधान वर्णन केलेलें आहेत. उदाहरणार्थ, महानिर्वाण तंत्रात सांगितलें आहे कीं, श्रीसावित्री देवतेचा महिमा जसा वेदग्रंथात सांगितला आहे तसाच तिचा महिमा आगमादि तंत्रग्रंथातही सांगितला आहे. कलियुगांत गायत्रीमंत्रारंभीं ब्राह्मणांना 'प्रणव' म्हणावा, क्षत्रियांनीं गायत्री मंत्रारंभीं 'श्रीं' बीज लावावें. वैश्यांनीं गायत्री मंत्रारंभीं 'ऐं' बीज लावावें व शूद्रांना आगमोक्त गायत्रीमंत्राचा जप करावा. कलियुगात सर्वतोपरी संस्काराचा लोप झाल्याने ब्राह्मणादि त्रैवर्णिक सर्वच संस्कारहीन झालेले आहेत. ज्या ब्राह्मणकुलांत तीन पिढ्या वेदपठणाचा लोप झाला त्या ब्राह्मणकुलाशीं चवथी पिढी ब्राह्मणवर्णापासून च्युत होते.

म्हणजे त्या पिढींतील लोक शूद्रवर्णाशीं समरस होतात. ही गोष्ट आज व्यवहारांत आपणांस दिसतच आहे. आज ब्राह्मणकुलांतील आंग्ल शिक्षणानें होरपळून निघालेले सोळा वर्षांपासून छत्तीस वर्षांमधील पुरुष पहा. शंभरांपैकीं बव्हंशीं पुरुष संध्याविहीन, श्राद्धविहीन, पंचमहायज्ञविहीन, शिखासूत्रविहीन असे दिसून येतात. अशांनां जर ईशकृपेनें सद्बुद्धि उत्पन्न झाली व त्रैवर्णिकांनां वैदिकसंध्या व शूद्रांनां आगमोक्त ब्रह्मगायत्री जप व ध्यान करावयाची व सूर्यनमस्कार करण्याची इच्छा झाली तर त्यांनीं आगमोक्त गायत्रीचा जप व ध्यान करावें. ही आगमोक्त ब्रह्मगायत्री 'ओँ परमेश्वराय विद्महे। परतत्वायधीमहि। तन्नोब्रह्मप्रचोयात्।' अशी आहे. व 'विप्राविप्रेतराश्चैव सर्वेऽप्यत्राधिकारिणः' उल्हास २ महानिर्वाणतंत्रांत हा उल्लेख आलेला आहे. सविता म्हणजे सूर्य, त्याचें शक्तिरूप म्हणजे सावित्री.

२५ २६॥(२)

## २. ऋग्वेदांतील सावित्रीमंत्र

| | |
|---|---|
| अर्चनापुत्र | तत्सवितुर्वृणीमहे। वयं देवस्य भोजनम्। |
| शावास्व ऋषिः | श्रेष्ठं सर्वधातमम्। तुरं भगस्य धीमहि॥ |
| अनुष्टुप छंद | |
| सविता देवता | ऋग्वेद मंडल, ५-८२-१ |

## ३. गुप्त सांप्रदायांतील सावित्रींमंत्र

विश्वामित्र ऋषि–'ॐ भूः सावित्रीं प्रविशामि। ॐ तत्सवितुर्वरेणियम'॥७॥
गायत्री छंद–'ॐ भुवः सावित्रीं प्रविशामि। भर्गो देवस्य धीमहि'॥ ८॥
सविता देवता–'ॐ स्वः सावित्रीं प्रविशामि। धियो यो नः प्रचोदयात् ॐ'॥

हा मंत्र मोठा यशस्वी आहे. *परंतु गुरुमुखाशिवाय ह्याचा उपयोग होणार नाहीं.*

हे वैदिक गायत्रीमंत्राचें महत्त्व वर्णन केलें. आता त्या मंत्रातील प्रत्येक पदाचें महत्त्व काय आहे ते पाहूं. प्रथम गायत्रीमंत्रात प्रणवाचा उच्चार करावा असे सांगितलें आहे. कठोपनिषदात धर्मराजानें नचिकेतास प्रणवाचें महत्त्व सांगितलें आहे.

> सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति ।
> यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति ॥
> तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ।
> एतध्द्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम् ॥
> एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ।
> एतदालंबनं श्रेष्ठमेतदालंबनं परं ।
> एतदालंबनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ॥

संपूर्ण वेदांनी ज्या पदाचा महिमा वर्णिलेला आहे व ज्या पदाचा जप करावा असे सांगितलें आहे व ज्या पदाचें ज्ञान होण्याकरिता ब्राह्मण ब्रह्मचर्याचें आचरण करितात, तें पद तुला सांगावयाचें तर ते ॐकार हे पद होय. हेंच पद ब्रह्मरूपाचें दिग्दर्शक आहे व ह्याच पदाचें आमूलाग्र ज्ञान झाल्यास ब्रह्मलोक प्राप्त होतो. ब्राह्मणांना हेंच पद एकमेव निर्वाणीचें आश्रयस्थान आहे व श्रेष्ठ पदवीला पोंचविणारें आहे. हे आश्रयस्थान आपलेसेंकरून म्हणजे आत्मसात् करून घेतलें तर ब्रह्मलोक प्राप्त होतो. श्रीमद् भगवद्गीतेत 'ॐ इत्येकाक्षरं व्याहरन् मामनुस्मरन्-मद्भाव याति न संशयः' असे विधान सर्वांकरिता सांगितलें आहे.

प्रश्नोपनिषदात सत्यकामानें पिप्पलाद ऋषींनां विचारलें कीं, जो मानव आमरण प्रणवाचें ध्यान करितो त्यास कोणत्या लोकाची प्राप्ति होते ? तेव्हा त्यास त्यांनी सांगितलें कीं, त्या ॐकार जपकर्त्या मानवास सगुण व निर्गुण ॐकाररूप ब्रह्मपदाची प्राप्ति होते.

> युञ्जीत प्रणवे चेतः प्रणवो ब्रह्मनिर्भयम् ।
> प्रणवे नित्ययुक्तस्य न भयं विद्यते क्वचित् ॥

प्रणवं ह्रीश्वरं विद्यात् सर्वस्य हृदि संस्थितम् ।
सर्वव्यापिनमोंकारं मत्वा धीरो न शोचति ॥
अमात्रोऽनन्तमात्रश्च द्वैतस्योपशमः शिवः ।
ॐकारो विदितो येन स मुनिर्नेतरो जनः ॥ (गौडपादकारिका)

निर्भय ब्रह्मरूप ॐकाराचें चिंतन करावें. प्रणव हाच ईश्वर आहे व हा सर्वांच्या हृदयात वास करितो. प्रणवाला मात्रा नाहींत, असें म्हटलें तर त्यास अनंत मात्रा आहेत. कारण सर्व अक्षरें प्रणवाच्या ॐकाररूप शरीरातील अवयवात्मक आहेत. द्वैत–अद्वैत–नादाची प्रणवाच्या योगानें परिसमाप्ति झाली आहे. ज्यानें 'ॐकार' समजून घेतला त्याला मुनीच म्हणावें, इतरे जनामध्ये त्याची गणना करिता येत नाहीं.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेंत म्हटलें आहे कीं–

ॐमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति स मद्‌भावं याति नास्त्यत्र संशयः ॥

प्रणवाचें महत्व वर्णन करिताना सांगितलें कीं, जो ॐ अक्षर-ब्रह्माचा जप व माझें स्मरण प्रयाणकालीं करील त्याला मत्स्वरूपाची प्राप्ति होईल यात संशय नाहीं.

ॐकार या मंत्राचा ऋषि ब्रह्मा, छंद गायत्री व सर्व कर्मारंभीं उच्चार हा त्याचा विनियोग आहे. ॐकार मंत्राचा कोटी जप केला असता सगुणब्रह्मदर्शन होतें असें सांगितलें आहे.

गायत्रीमंत्रारंभींच्या भूरादि सतव्याहृतींपैकीं व्याहृतित्रयाचें महत्त्व वेदांत फारच सुरस केलेलें आहे. एका वेळीं प्रजापती हे ह्या जगात सार वस्तु कोणती हें जाणण्याकरिता तप करूं लागले. त्यावेळीं त्यांना पृथ्वीवर अग्निदेवता, अंतरिक्षांत वायुदेवता आणि स्वर्गांत आदित्यदेवता ह्याच मुख्य देवता आहेत असें समजून आलें. व पुन्हा तपश्चर्या केल्यावर अग्नीमध्यें ऋग्वेद, वायूंत यजुर्वेद व आदित्यामध्यें सामवेद सारभूत आहे

असें दिसलें. पुन्हा तपाचरण केल्यावर ऋग्वेदांत भूमि, यजुर्वेदात भुवः व सामवेदांत स्वर्लोक आहे, असें त्यांस समजून आलें. 'भूः' चा अर्थ सत्, 'भुवः' चा अर्थ चित् व 'स्वः' चा अर्थ आनंद होय. 'महः' चा अर्थ सर्वातिशय महत्त्व, 'जनः' चा अर्थ आदिकारण व 'तपः' याचा अर्थ तेजोरूप परतेज असा असून सत्य याचा अर्थ सर्वबाधाराहित्य असा आहे.

प्रणवान्ता गायत्री जपादिभिरुपास्या ।
तत्र शुद्धागायत्री प्रत्यग् ब्रह्मैकबोधिका ॥
बुद्ध्यादि सर्वदृश्यसाक्षिलक्षणं ।
यन्मे स्वरूपं तत्सर्वाधिष्ठानभूतं ॥
परमानंदं निरस्त-समस्तानर्थरूपं स्वप्रकाशचिदात्मकं ।
ब्रह्मेत्येवं धीमही । ध्यायेम ॥
सोऽयं इति न्यायेन सर्वसाक्षिप्रत्यगात्मनो ।
ब्रह्मणा सह तादात्म्यरूपमेकत्वं भवति इति ॥
सर्वात्मकब्रह्मबोधकोऽयं गायत्रीमंत्रः संपद्यते ।

(शांकर गायत्री भाष्यम्)

प्रणवादि व प्रणवान्ता गायत्री जपतप अनुष्ठान करण्यास उपास्य देवता म्हणून योग्य आहे. शुद्ध गायत्री मंत्र प्रत्यक्षतेनें अभिन्न असलेल्या ब्रह्म-तत्त्वाचा बोधक आहे. दृश्य जगताला साक्षीभूत असें जें माझें रूप तेंच सर्व जगताचें अधिष्ठान आहे. मायोपाधिनिर्मित सर्व अनर्थ माझ्या स्वरू-पात दृग्गोचर होत नाहींत. माझें स्वरूप परमानंदमय आहे, व स्वयंप्रकाश चिदात्मक असें जें माझें स्वरूप त्याचे सर्व साधक लोक ध्यान करितात, अशा प्रकारचा ब्रह्मबोधक गायत्री मंत्र आहे व प्रणवतत्त्वाशीं या मंत्राचें अतिशय साम्य आहे असें दिसतें. श्रीदेवीभागवतात प्रणवान्ता गायत्री दिलेली नाहीं. पुराण वाचनाला पुराणोक्तरीत्या रूपानें तो मंत्र यावाचा. संध्येंत मंत्रर्षीनें तो गायत्री मंत्र म्हणावयाचा असतो म्हणून त्या गायत्रीमंत्राचा प्रणवान्त जप करावा.

प्रणव तत्त्वाच्या अ, उ, म, अशा तीन मात्रा आहेत, यापैकीं अकाराचा अर्थ व्यष्टि, समष्टि, वैश्वानर, विराट् असा आहे. उकाराचा अर्थ तैजस् व हिरण्यगर्भ व मकाराचा प्राज्ञ व ईश्वर असा आहे. त्याचप्रमाणें 'तत्सवितुर्वरेण्य' या गायत्रीमंत्राच्या प्रथम पादाचा अर्थ असा आहे कीं, त्यात सर्व विश्वाची उत्पत्ति करणाऱ्या ईशशक्तीचें प्रतिपादन केलें आहे, आणि कार्यकारणभाव ईश्वराच्या ठिकाणीं एकत्व स्थापनेंच असल्यानें कर्तृत्वशक्तीमध्यें कार्य करणाऱ्या शक्तीचा अतर्भाव होत आहे द्वितीय पादामध्यें तैजस व हिरण्यगर्भ याचें प्रतिपादन आहे. तेजवाचक 'भर्ग' पदानें व ध्यानकर्तृवाचक 'धीमहि' पदानें द्वितीयपदाचा अर्थ स्पष्ट होतो. क्रियावाचक 'प्रचोदयात्' पदानें वैश्वानर पदाशीं अभिन्न असलेल्या विराट् स्वरूपाचें दिग्दर्शन होतें.

न्यायशास्त्राप्रमाणें गायत्री मंत्राच्या शेवटल्या पादापासून म्हणजे, 'प्रचोदयात्' या पदानें आरंभ केल्यास प्रथम सृष्टि उत्पत्तीचे वेळीं संकल्प परिमाणूत चेतना उत्पन्न होते. नंतर 'यो न' (यू मिश्रण) य' ह्या पदानें संकल्प परिमाणूचें मिश्रण होतें. याप्रमाणे आरंभवादाच्या रीतीनें संयोगपूर्वक सृष्टीची उत्पत्ति होते. 'धिय' पदानें मन व आत्मा याच्या संयोगानें सांसारिक बुद्धि उत्पन्न होऊन सांसारिक भोग भोगण्याची वृत्ति उत्पन्न होते. 'धीमहि' या पदानें ईश्वरविषयक ध्यानादि क्रियाचे योगानें सात्त्विक ज्ञान प्राप्त होतें. नंतर 'अ देवस्य भर्ग' या पादानें अ देव म्हणजे अज्ञान व भर्ग म्हणजे नाश, अज्ञानाचा नाश होतो. अशा मिथ्या ज्ञानाचा नाश झाल्यावर 'वरेण्य' म्हणजे श्रेष्ठ मुक्ति प्राप्त होते. ही मुक्ति म्हणजे 'सवितु' कर्तारूप आत्म्याची एकवीस प्रकारच्या दुःखाचा नाश झाल्यानंतरची अवस्था होय.

योगशास्त्राप्रमाणें ह्या गायत्री मंत्राचा अर्थहि समजून घेतला पाहिजे. 'प्रचोदयात्' या पदानें कुंडलिनी समुत्थानापासून षट्चक्रभेदन अथवा षट्चक्रांतून जाणाऱ्या कुंडलिनीची भावना करून सहस्रार चक्रनिवास

होईपर्यंतची क्रिया अभिमत आहे. या रीतीनें क्लेश कर्मादिकाचा लेश नसलेला असा जो ईश्वर म्हणजे सविता आमच्या बुद्धीला शुभचिंतन करण्यास प्रवृत्त करो व अन्य सांसारिक भोगाकडे आमची प्रवृत्ति न होवो. याप्रमाणे मंत्रातील अन्य पदाचाही अर्थ दाखविता येईल.

याप्रमाणे गायत्रीमंत्राचे निरनिराळ्या भूमिकावरून अर्थ केल्याने केवळ आद्य प्रकृतीला मूलभूत धरून केलेले अर्थ बरोबर नसावे. कारण त्या अर्थांवरून प्रकृतीची अनादिता सिद्ध होते, व पुरुषाचीही होत आहे, व प्रकृति व पुरुष अशीं दोन तत्त्वें अनादि मानावीं लागतात. 'प्रकृतिं पुरुष चैव विद्ध्यनादि उभावपि' या गीतोक्त वचनाकडे विवेचनाचा कल जाऊन मूळ मंत्रातील अद्वैतसिद्धि बाजूस पडते अशी शंका कोणास येईल. परंतु उपासना प्रकरणातील हे विवेचन असल्यानें प्रारंभीं द्वैत मानल्याशिवाय उपासना हा विषय मांडताच येत नाहीं. आज जगांत अद्वैत मार्गीयाना व्यवहारांत द्वैत मानल्याशिवाय व्यवहार करिता येतो का? श्रीसमर्थांनी 'उपासना उपासना' अशा द्विरुक्तीनें साधकास उपदेश केला ती उपासना म्हणजे जवळ बसणें. तें कोणाच्या? इष्टदेवतेच्या. या विचारपरंपरेंत द्वैतकल्पना असल्याखेरीज उपासना शक्यच नाहीं 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' म्हणजे शिवच झाल्यावर दुसरा शिव राहिला कोठें व त्याची पूजा ती काय? तेव्हां शिवो भूत्वा म्हणजे शुद्ध व निर्मळ भावना धारण करून, स्थूल सूक्ष्म कारणादि देहाच्या अनिष्ट वृत्तींकडे असलेल्या प्रवृत्तींचा निरोध करून सर्व कल्याणनिधान उपास्य देवतेची पूजा करावी असाच त्या वचनाचा अर्थ आहे नवविधा भक्तींत आठ प्रकारच्या भक्तींचें अनुष्ठान असताना द्वैतभाव असतोच असतो.

असा द्वैतभाव असल्याशिवाय 'ह्रीं क्लीं श्रीं' अशा बीजानीं युक्त असलेले मंत्र सिद्ध होणार नाहींत. 'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपंच प्रपञ्च्यते' या वचनाप्रमाणें अधिकारभेदानें भिन्नभिन्न मंत्राराच्या साधकांस भिन्नभिन्न प्रक्रियांचा उपयोग करावा असें शास्त्रांत सांगितलें

आहे. 'अधिकार तैसा करूं उपदेश' असें तुकाराम महाराज व श्रीसमर्थ रामदास स्वामी महाराज सांगतात. मागील स्तंभात वर्णन केलेलें शास्त्रीय विवेचन अध्यारोपात्मक आहे व वेदान्त शास्त्रीय विवेचन म्हणजे अद्वैत सिद्धीचें विवेचन अपवादात्मक आहे. सर्व शास्त्राचें ध्येय एकच आहे. व तें ध्येय गायत्री मंत्राची श्रेष्ठता हेंच होय. 'आपोज्योतिरसोऽमृतम् ब्रह्म भूर्भुवः स्वरोम्' या गायत्री मंत्राच्या शिर म्हणजे शेवटल्या पक्तींत अद्वैतसिद्धीच सिद्ध केलेली आहे. 'आप' या शब्दानें सर्वव्याप्ति, 'ज्योति' या शब्दानें प्रकाशरूप, 'रस' या शब्दानें व 'अमृत' या शब्दानें मरणादि संसारपाशापासून मोक्ष होणे असें सच्चिदानंदरूप ॐकारात्मक ब्रह्म तेंच मी आहे अशी भावना असावी असा त्या मंत्राचा इत्यर्थ आहे.

गायत्री मंत्राचा जप करावयाचा तर,

> मंत्राणां पल्लवो वासः मंत्राणां प्रणवः शिरः।
> शिरः पल्लवसंयुक्तो मंत्रः कामदुघो भवेत्॥

या वचनाप्रमाणें त्रिपाद गायत्रीचा जप करितांना 'प्रचोदयात्' या पदानंतर प्रणवाचा उच्चार करावयास पाहिजे. व्याहृति म्हणजे भूर्भुवस्व याचे आरंभीं ॐ, नंतर 'तत्सवितु' याचे आधीं ॐकार व प्रचोदयात् याचे शेवटीं प्रणव असावा. नेहमीं प्रचारात दोनच प्रणव म्हणण्याचा प्रघात दिसतो. परंतु तो मंत्रशास्त्राप्रमाणें चुकीचा आहे. कांहीं ठिकाणीं प्राणायामाचे वेळीं दशप्रणव संयुक्त गायत्रीचा जप सांगितला आहे. गायत्री त्रैवर्णिकास सांगितली असल्यानें त्या गायत्रीचा जप करीत असतां ब्राह्मणांनी तीन प्रणव, क्षत्रिय व वैश्यांनी दोन प्रणव म्हणावे असें शास्त्र सांगतें. आजकाल क्षत्रिय व वैश्य समाज गायत्रीजपविन्मुख झालेले आहेत ही मोठी शोचनीय स्थिति आहे. गायत्री-मंत्र-जपापूर्वी गायत्री कवचाचा पाठ नेहमीं करावा. कवच हें साधकाचें रक्षण करतें (हें कवच पुढें दिलेले आहे.)

'ॐ भूः भुवः स्वः । ॐ तत्सवितुर्वरेण्यं
भर्गो देवस्य धीमहि । धियो यो नः प्रचोदयात् । ॐ'

अशा प्रकारच्या गायत्री मंत्राचा जप द्विजांनीं करावा इतकी गोष्ट तरी ह्या लेखानें प्रचारात आल्यास वरें होईल. असें न जमल्यास भोगमोक्षार्थी द्विजानी चतुष्पदा गायत्रीचा जप करावा. या वचनाला चिदंबर रहस्यात आधार आहे, तो असा—

चतुष्पदा गायत्री भोगमोक्षार्थिनां नृणाम् ।
यज्जपात् सर्वसिद्धिः स्यात्कामधुक् सा प्रकीर्तिता ॥
द्वात्रिंशदक्षरीं यस्तु जपेत् व्याहृतिपूर्विकां ।
अर्धपात्रे सहस्रं तु षण्मासं प्रयतः शुचिः ॥
स मेधावी भवेत् वाग्मी गद्यपद्यविशारदः ।
भवेत्येव न संदेहो नान्यथा शिवभाषितम् ॥

(चिदंबर रहस्ये)

श्रीसूर्यनारायणाचे मंडळात श्रीगायत्रीदेवीचें प्रातर्, माध्यान्ह व सायंकाळचें ध्यान करावें असें सांगितलें आहे. व्याहृतींचा अर्थ असा कीं, भुर्लोक, भुवर्लोक, व स्वर्गलोक अशा तीन लोकांपैकीं दोन लोकांचें उल्लंघन करून स्वर्गलोकास म्हणजे सूर्यलोकास भावनेनें जावें व त्या ठिकाणीं 'तत् सवितु ' म्हणजे *आपणास स्थूल नेत्रेंद्रियानी दिसतो तो प्रकाश प्रतिबिंबाचा आहे व खरें सूर्यबिंब सूर्यलोकात अर्थात् स्वर्गलोकात गेल्यावर दिसू लागतें*, त्या सूर्यदेवाच्या प्रभावशाली तेजाचें ध्यान आम्हीं करितो, जो सूर्यदेव आम्हाला सद्बुद्धीची प्रेरणा करितो. (अलीकडे आपली सूर्यमाला दुसऱ्या एका अतिदूर व अतिबलिष्ठ व अमित आकर्षण-शक्तियुक्त अशा दुसऱ्या सूर्याकडे आकर्षिली जात आहे असा शोध लागला आहे.) वरील गायत्रीमंत्राचा अर्थात् सवित्याच्या लोकात जाऊन तेथून दिसणाऱ्या दुसऱ्या सवित्याचें वर्णन आलें आहे. *अलीकडील शोध व पूर्वीचे अनुभव यांचें योग्य समेलन कसें होत आहे, ही एक आपल्या*

*पूर्वजांच्या ज्ञानशक्तीच्या आपलेपणाची दिग्दर्शकच गोष्ट आहे* असें म्हटल्याखेरीज राहवत नाही.

वरील स्तंभात गायत्रीदेवीची बाह्यांग उपासना वर्णन केली. आतां अंतरंग उपासनेबद्दल विवेचन करण्यांत येत आहे. आपल्या हृदयस्थित स्वयंज्योतिरूप गायत्रीउपासनेच्या अंगप्रत्यंगरूप असलेल्या द्वारपालाची उपासना छांदोग्य उपनिषदांत वर्णन केलेली आहे.

**ते वा एत पञ्चब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य**
**द्वारपाः स य एतानेवं पंचब्रह्मपुरुषान्**
**स्वर्गस्य लोकस्य द्वारपान् वेदास्यऽ कुले**
**वीरो जायते प्रतिपद्य स्वर्गलोकम्।**

(छां० ३-१३-६)

ज्याप्रमाणें प्रचारात राजाच्या द्वारपालांची प्रीति संपादन केली तर राजाची भेट होते, त्याप्रमाणे प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे चैतन्यज्योतिरूप गायत्रीच्या ब्रह्मरूप स्वर्गलोकाचे द्वारपाल आहेत. हे द्वारपाल वश झाले म्हणजे हृदयस्थित—हें हृदय ब्रह्मधामाजवळ आहे—गायत्रीब्रह्माची प्राप्ति होते व उपासकाला प्रत्येक ज्योतिरूप स्वर्ग प्राप्त होतो व त्याच्या *कुलांत वीरपुरुष अथवा वीरशिष्य उत्पन्न होतो.*

२५. गायत्री ब्रह्मरूप हृदयभवनाला पाच छिद्रें आहेत. त्या छिद्रांतून वास करणारे प्राणापानादि पच पुरुष हेच द्वारपाल आहेत असें वर लिहिलें. त्यापैकी पूर्वाभिमुख पुरुषाच्या हृदयाचें जें पूर्व छिद्ररूप द्वार आहे त्या द्वारात प्राणरूपी द्वारपाल असतो, तो चक्षु होय, तोच आदित्य होय. ह्या प्राणाचे तेज व अन्न या रूपानें जो चिंतन करितो तो तेजस्वी व दीप्ताग्नि होत्साता जागृत पचनशक्तीनें युक्त होतो, तसेंच ज्या हृदयाचें दक्षिण छिद्र रूप द्वार आहे, त्याचा द्वारपाल व्यान हा आहे. हाच द्वारपाल श्रोत्ररूपी व चंद्रमारूपी आहे. श्री आणि यशरूपानें व्यानाची उपासना करितो तो श्रीमान व यशस्वी होतो.

तसेंच पश्चिम द्वाराचा द्वारपाल अपान आहे. तो वायूरूपी व अग्निरूपी आहे.

ह्या अपान वायूचे ब्रह्मवर्चस व अन्नादि रूपानें जो चिंतन करितो तो ब्रह्मवर्चसी होतो व सुप्रास अन्न प्राप्त करून घेतो. तसेंच उत्तरद्वाराचा द्वारपाल समान वायू आहे. तो मनरूप व पर्जन्यरूप आहे. ह्या समान वायूची आराधना जो परोक्ष व अपरोक्ष कीर्तिरूपानें करितो त्यास परोक्ष व अपरोक्ष कीर्ति प्राप्त होते. तसेंच उर्ध्वद्वाराचा द्वारपाल उदान वायू आहे. याच्या ओज व महः स्वरूपाचें जो चिंतन करितो तो ओजस्वी व महान् होतो.

ही चतुर्विंशत्यक्षरा गायत्री चतुर्थपादासह द्वात्रिंशदक्षरा होते. 'त्र्यंबकं यजामहे' व 'जातवेदसे' या दोन मंत्रांसहवर्तमान तिचा उच्चार केला तर ती शताक्षरा गायत्री होते. याच गायत्रीमंत्राच्या पादाचे लोम विलोम केल्यानें 'बला अतिबला' या विद्या तयार होतात व ब्रह्मास्त्र व ब्रह्मशिरोस्त्र हीं अस्त्रें तयार होतात. ह्या विद्या व हे मंत्र लेखकाजवळ आहेत. त्याचा परिचय उत्तरार्धांत केलेला आहे. पण त्यांचा अनुभव घेतलेले व सध्यां हयात असलेले सज्जन लेखकास भेटले नाहींत.

## ४. गायत्री मंत्रानुभवाचीं उदाहरणें

गायत्रीमंत्राचें पुरश्चरण करण्याची पद्धति, न्यास, गायत्री, कवच व गायत्रीमंत्राचें शापमोचन, उत्कीलन, संजीवन व अस्त्रोपसंहरण हें कांहींही माहीत नसतांना केवळ गायत्रीमंत्राचा जप चोवीस वर्षेपर्यंत श्री. सप्तशृंग देवीसन्निध एक ब्राह्मण करीत होता. वणीहून पायऱ्या चढून गेल्यावर त्याचा मठ पहिल्यानें लागतो. या मठातील वार्गेतून श्रीभगवती सप्तशृंगाधिष्ठित महालक्ष्मीस बारा माम पुर्वे जात असतात. या गायत्री बोवांस लेखक भेटला व गायत्रीमंत्रजपाचें फळ काय प्राप्त झालें असें विचारतां प्रस्तुतची जागा, मठ व बारा महिने योगाजवळ निर्वाहाकरितां

तोंड वेंगाडावें लागत नाहीं, यात्रेच्या वेळीं यात्रेकरूंची सोय करितां येते, इतकेंच फल आहे, असें ते म्हणाले.

आज मंत्रविद्या म्हणजे सत्र झूट असें मानणारेच गृहस्थ पुष्कळ आहेत, व मंत्रांची सिद्धि नसल्यानें हा वर्ग वाढत चालला आहे. संस्कारांचा लोप व आचारभ्रष्टता यामुळें मंत्रसिद्धि होत नाहीं, ही गोष्ट खरी आहे· परंतु ती गोष्ट पटविणें आजकाल दुरापास्त झालें आहे. गायत्री कवचाचे १००० पाठ पलाशवृक्षाखालीं १० दिवसांत केले. परीक्षा पास झाली.

विष्णुकांत गोपीनाथ त्रिपाठी
जळगांव

हल्लींच्या पिढींत वेदमंत्र, पुराण मंत्र, आगममंत्र, शाबरमंत्र इत्यादि मंत्रांवरील व त्याचप्रमाणें वेद, पुराणें, आगम यांवरील श्रद्धा नाहींशी झालेली दिसते. ती खरी अश्रद्धा नव्हे, असें लेखकाचें मत आहे. हीच नवीन पिढी पूर्ण आस्तिक होण्यास मंत्रसिद्धि पटवून देणें हाच एक उपाय आहे. मंत्रसिद्धि प्राप्त झालेल्या गृहस्थांस ही कार्यकारण परंपरा सांगून मंत्रसिद्धीचा अनुभव हल्लींच्या पिढीस पटवावा अशी विनंती केल्यास ते म्हणतात "आम्ही कांहीं तमाशा मांडला नाहीं किंवा नाटक नाहीं." त्यांचें हें प्रतिपादनही खरेंच आहे. यांतूनच मार्ग निघावा व तो निघण्यासाठीं वैदिक अभ्यास करणारे विद्यार्थी स्वतः मंत्र सिद्ध करण्याकरितां पुढें आले पाहिजेत. ते तसे पुढें आले तर त्यांचा दर्जाही वाढेल व त्यांचेबद्दल आंग्लभाषा व आंग्लभाषेतून आधुनिक अपुऱ्या शास्त्राचा परिचय झाल्यानें जे पुरुष अविश्वासी बनून गेलेले आहेत, त्यांच्या ठिकाणीं वरील वैदिक विद्यार्थ्यांबद्दल आदरहि वाढेल व नित्यनैमित्तिक कर्में करण्याकरितां वैदिक मंडळींनां बोलावण्याचा प्रसंग आल्यास त्यांस 'भटजी' या कनिष्ट दर्जाच्या नांवानें त्यांचा निर्देश न होतां 'गुरुजी' या नांवानें त्यांचा निर्देश होईल. बहकलेल्या आंग्लविभूषितांकरितां 'तान्प्रति नैप यत्नः'

हा लेख लिहिण्याचा प्रयत्न नाहींच नाहीं. वेदशास्त्रोत्तेजक शाळेच्या विद्यार्थ्यांकरितां व वैदिक परंपरा कायम टिकविण्याची इच्छा असणाऱ्यांकरितां हा प्रयत्न आहे.'

## श्री गायत्री कवच

(हें रुद्रयामलांतील २ रें कवच)

श्रीगणेशायनमः ॥ श्रीगणात्रायैनमः ॥ श्री गायत्री देव्यै नमः ॥ नारद उवाच ॥ स्वामिन्सर्वजगन्नाथ संशयोऽस्ति मम प्रभो ॥ चतु पष्टिकलाभिज्ञ निग्रहायोगनिद्वर ॥ १ ॥ मुच्यते केन पुण्येन ब्रह्मरूपः कथं भवेत् ॥ देहश्च देवतारूपो मंत्ररूपो विशेषतः ॥ २ ॥ कर्म तच्छ्रोतुमिच्छामि न्यास च विधिपूर्वकं ॥ ऋषिच्छंदोऽधिदैवं च ध्यानं च विधिवत्प्रभो ॥३॥ श्री नारायण

१. गायत्री उपासना–विधिविधान–पुरश्चरण व उपयुक्तता, त्याचप्रमाणें गायत्री मंत्राचे प्रकार व त्याप्रमाणें पुरश्चरणें व विधिविधान ह्यासंबंधें बरेच वाङ्मय मराठी, हिंदी, व गुजराथी मार्फत अलीकडे उपलब्ध झालेलें आहे. त्यांपैकीं अगदीं अलीकडे [मे १९६९] प्रसिद्ध झालेलें 'गायत्री विज्ञान व उपासना' –मीमांसातीर्थ विजवडेकरशास्त्री–ईशावास्य प्रकाशन पुणें–हें एक पुस्तक आधुनिक वैज्ञानिक वृत्तीच्या जिज्ञासूंना वा उपासकांनां बरेंच मार्गदर्शन करील असें आहे. संध्याविधि व विज्ञान (गो. प्र. भावेकृत) हें पण तितकेंच उपयुक्त पुस्तक आहे.

'अखंड आनंद' नावाचें मासिक मथुरा येथून प्रसिद्ध होत असतें. स्वामी दयानंदी विचारप्रणालीप्रमाणें विचाराचा धारा यात वहात असतो. तो विधिविधानाच्या बाबतींत वैदिक सनातनी परंपरेशीं विसंगत आहे. बंगाली व दाक्षिणात्य द्राविडी संस्कृतीलाही ती विचारधारा मान्य नाहीं. तथापि या सर्व वाङ्मयाचा व उपासनेचा साग विचार येलेला ग्रंथ "गायत्रीपंचाग व उपासना" नांवाच्या प्रसिद्ध होऊ घातलेल्या 'नवज्योति प्रकाशन' संस्थेच्या ग्रंथात पहावयास मिळेल (गो. प्र. भा).

उवाच ॥ अस्त्येक परम गुह्य गायत्रीकवच तथा ॥ पठणाद्धारणान्मर्त्यः सर्वपापै प्रमुच्यते ॥ ४ ॥ सर्वान्कामानवाप्नोति देवीरूपश्च जायते ॥ गायत्रीकवचस्यास्य ब्रह्माविष्णुमहेश्वरा ॥५॥ ऋषयो ऋग्यजु सामाऽथर्वच्छदासि नारद ॥ ब्रह्मरूपा देवतोक्ता गायत्री परमा कला ॥ ६ ॥ तद्बीज भर्ग इत्येषा शक्तिरुक्ता मनीषिभि ॥ कीलक च धिय प्रोक्त मोक्षार्थे विनियोजनम् ॥७॥ न्यासः– चतुर्भिर्हृदय प्रोक्त त्रिभिर्वर्णै शिर स्मृत ॥ पचभि स्याच्छिखा पश्चाविभिस्तु कवच स्मृत ॥ ८ ॥ चतुर्भिर्नेत्रमुद्दिष्ट चतुर्भि स्यात्तदस्त्रक ॥ अथ ध्यानम् प्रवक्ष्यामि साधकाभीष्टदायक ॥ ९ ॥ मुक्ताविद्रुमहेमनीलधवलच्छायैर्मुखस्त्र्यक्षणैर्युक्तामिंदुकलानिबद्धमुकुटा तत्वार्थवर्णात्मिका ॥ गायत्रीं वरदाभयाऽङ्कुशकशा शूल (शुभ्र) कपाल गुण ॥ शखचक्रमथारऽरविंदयुगुल हस्तैर्वहन्तीं भजे ॥ १० ॥ गायत्री पूर्वत पातु सावित्री पातुदक्षिणे ॥ ब्रह्मसध्या तु मे पातु पश्चादुत्तराया सरस्वति ॥ ११ ॥ पावकीं मे दिश रक्षेत्पावकीं जलशायिनी ॥ यातुधानींदिश रक्षेद्यातुधानभयकरी ॥ १२ ॥ पावमानींदिश रक्षेत्पवमानविलासिनी ॥ दिश रौद्री च मे रक्षेत् रुद्राणीं रुद्ररूपिणी ॥ १३ ॥ ऊर्ध्वं ब्रह्माणि मे रक्षेदधस्ताद्वैष्णवी तथा ॥ एव दशदिशो रक्षेत्सर्वांग भुवनेश्वरी ॥ १४ ॥ अंगन्यासाः—तत्पद पातु मे पादौ, जघे मे सवितु पद ॥ वरेण्य कटिदेशे तु, नाभि भर्गस्तथैव च ॥ १५ ॥ देवस्य मे तद्हृदय धीमहीति च गल्लयो ॥ धिय पद च मे नेत्रे य पद मे ललाटकम् ॥ १६ ॥ न पद पातु मे मूर्ध्नि शिखाया मे प्रचोदयात् ॥ अक्षरन्यासाः तत्पदं पातु मूर्धांन स कार पातु भालक ॥ १७ ॥ चक्षुषी तु विकारार्णो

१. पावकीं–आग्नेय दिशा, २ यातुधानी–नैर्ऋत्य, ३ पावमानी–वायव्य. रौद्री–ईशान्य वगैरह नावासबधीं पाठभेद आहेत. व त्याच्या महत्त्वाचें विज्ञानही आहे त्याचें दिग्दर्शन 'विज्ञान' या प्रकरणात केलें असून सपूर्ण विचार "गायत्री पंचाग" या भावी ग्रथात दिसेल गायत्रीच्या ध्यानात 'मुंडैस्त्रीक्षणै' असाही पाठ भेद आहे (गो प्र. मा)

तुकारस्तु कपोलयो ॥ नासापुटेर्वकारार्णो रेकारस्तु मुखे तथा ॥ १८ ॥ णिकार ऊर्ध्वमोष्ठ तु यंकारस्त्वधरोष्ठक ॥ आस्यमध्ये भकारार्णो गों कारश्चिबुके तथा ॥ १९ ॥ देकार कंठदेशे तु वकार स्कंधदेशक ॥ स्यकारो दक्षिण हस्त धीकारो वामहस्तक ॥ २० ॥ मकारो हृदय रक्षेत् हिकार उदरे तथा ॥ धिकारो नाभिदेशे तु योकारस्तु कटिं तथा ॥ २१ ॥ गुह्य रक्षतु योकार ऊरू द्वौ न पदाक्षर ॥ प्रकारो जानुनी रक्षेच्चोकारो जघदेशक ॥ २२ ॥ दकार गुल्फदेशे तु याकार पदयुग्मक ॥ तकारव्यंजन चैव सर्वांगे मे सदाऽवतु ॥ २३ ॥ इद तु कवच दिव्य बाधाशतविनाशन ॥ चतुःषष्टिकलाविद्यादायक मोक्षकारक ॥ २४ ॥ मुच्यते सर्व पापेभ्य पर ब्रह्माधिगच्छति ॥ पठनाच्छ्रवणाद्वाऽपि गोसहस्रफल लभेत् ॥ २५ ॥ इति श्रीदेवीभागवते पुराणे नारायणोक्त गायत्रीकवच संपूर्णम् ॥

□ □

अमृत – मंजिरी

१. गायत्री मत्र हा गुरुमत्र म्हणने सर्वश्रेष्ठ मत्र आहे
२. गायत्री मत्र सर्वांत लवकर सिद्ध होतो
३. गायत्री मत्रानें अनेक अर्थ प्राप्त करितां येतात.
४. गायत्रीउपासनेमुळें अनेक सिद्धि प्राप्त होतात

# ७ पंचदशी विद्या व विधि विचार

## १ पंचदशी विद्या

ॐ नमो विष्णुरूपाय नमस्ते ब्रह्मरूपिणे ।
नमस्ते रुद्ररूपाय नमः त्रिमूर्तिधारिणे ॥ १ ॥

पार्वती बोलते, हे महारुद्र, तुम्ही सर्व जगताची उत्पत्ति, स्थिति व लय करणारे आहां. तुम्हीच ब्रह्मदेव होऊन जगाची उत्पत्ति, विष्णु होऊन जगाचें पालन आणि रुद्र होऊन जगाचा संहार करीत असतां. तुम्ही त्रिगुणात्मक आणि पंचभूतात्मक आहां. तीं पंचमहाभूतें–पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं आहेत, पंच तन्मात्रा–शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ह्या आहेत. पंच इंद्रियें–त्वक्, चक्षु, रसना, घ्राण व शब्द हीं आहेत. हीं सर्व पंधरा तत्वें तुमचे इच्छेनें आदिमाया शक्तीला घेरतात, ते ह्यां सर्व तत्वांचे परिणाम राजस, तामस, व सत्त्वगुण हे उदय पावतात. मी (पार्वती) तुमच्या मायेला जाणत नाहीं, आणि संसार करण्याची इच्छा करीत आहें. म्हणून संसाराचा निर्वाह होईल, अशी उत्तम विद्या मला तुम्ही सांगा. ईश्वर सांगतात:–ऐक पार्वती, एक विद्या तुला सांगतों. ही विद्या मी कोणत्याहि देवाला किंवा ऋषीला सांगितली नाहीं, ती तुला सांगतों. ही विद्या देवनिंदक, तीर्थद्वेषी, गुरुद्रोही, असत्यवादी, अविश्वासी, मातापिता सेवाहीन, अहंकारी, दांभिक, पाखंडी अशा लोकांनां सांगूं नको. सांगशील तर गुरु व शिष्याचें अकल्याण होईल. या विद्येनें गुरूचा छळ करील त्याला कोटी कालपर्यंत ही विद्या फलद्रूप होणार नाहीं. या

विधेनें जो शिष्य गुरूला संताप आणील, त्याला श्वेत कुष्ठ फुटेल. तसेंच जो गुरु निष्कपटी शिष्याला ही विद्या सांगणार नाहीं तो गुरु ही दोषी होईल. एक वर्षपर्यंत शिष्याची परीक्षा करून मग त्याला गुरूनें ही विद्या शिकवावी. नाहीं तर गुरूला मोठा दोष येतो.

## २ पंचदशीयंत्र पद्धति, कृति व विधि.

श्री महादेव पार्वतीला म्हणाले, हे देवी, मी सर्व मंत्र व यंत्रें साध्य केलेलीं आहेत. परंतु फक्त हें पंचदशी यंत्र साध्य केल्याशिवाय ठेवलें आहे. हें अतिशय गुप्त आहे. ती विद्या मी तुला आतां सांगतों व तूंही ती अतिशय गुप्त ठेव. खीलपट, नास्तिक व दुष्ट यांस देऊं नकोस. हें मन देऊन ऐक. नदीच्या काठावर सुंदर वृक्ष असलेल्या ठिकाणीं जाऊन मातीं व उत्तम शेणानें एक जागा सारवून तयार करावी, तीवर अष्टगंधानें एक गोठा (कोठा) बीजमंत्र जमिनीवर लिहावा. त्याचें पूर्वेकडे तोंड करावें आणि डोक्यावर अर्धचंद्र अनुस्वार द्यावा. त्याचप्रमाणें अष्टगंधानें पृथ्वीवर पंचदशी यंत्र काढिलें पाहिजे. त्याच्यावर एक दिवा ठेवावा. दिवा सोनें, चांदी, तांबें, लोखंड अथवा माती याचा असावा. (चांदी, ताम्र, लोह यांच्या पत्र्यावर पंचदशी मंत्र लिहावा) तो दिवा गाईच्या शुद्ध तुपानें भरावा. त्यात लाल सुताची वात (१००० किंवा १०८ किंवा १८ किंवा १२ हात लांब असलेली) लावावी. (पूर्व विधीप्रमाणें) नंतर मध्यें लाल कापडाचें आसन घालून यंत्र लिहणाऱ्यानें बसावें. जर क्रूरकार्य करावयाचें असेल, तर सूर्यधासानें श्वास चालवावा. लाल वस्त्र, लाल धोतर, लाल आसन, यामध्यें कोणत्याहि इतर रंगाचा धागा असू नये. आसनावर बसून 'ह्रीं' या मायाबीजाचा जप करावा. अष्टगंधानें यंत्र लिहावें, आणि जें आपलें काम असेल तें त्याच्यावर लिहावें. दररोज ५०-१००-२००-५०० अथवा १००० वेळां (जितकें पहिल्या दिवशीं लिहिलें असेल तितकें रोज) लिहावें. यंत्रात 'ह्रीं' हें मायाबीज लिहावें आणि येणेंप्रमाणें केशराच्या

गधानें एक लाख वेळा लिहिले म्हणजे हनुमान प्रगट होऊन दर्शन देतील. याचप्रकारें नेहमीं लिहावें आणि प्रत्येक यत्राला निरनिराळें कापून कणकेंत त्याची गोळी करून मासोळ्याना खायाला द्यावें. तलाव, बावडी, विहिरी जेथें असतील तेथें तेथें माशाना असे दिलें नाहीं तर कार्यसिद्धि होणार नाहीं. यत्र लिहणें बद केले तर मासोळ्याना खाणे देणे बद केलें तरीसुद्धा हा बीज मत्र जपत राहावा, जेव्हा एक लाख मंत्र पुरा होईल तेव्हा एक लाखाचा दशाश इतके हवन पाण्यात करावे. अग्नीमध्यें नाहीं. ज्याप्रमाणे वली वैश्वदेव होतो, त्याप्रमाणे बीजमत्र 'स्वाहा' म्हणून पाण्यात सोडावा. नतर दशाश (हवनाच्या) तर्पण, मार्जन, गोदान वगैरे करावें. प्रथम एकापासून नऊपर्यंत प्रारभ करून ९ पर्यंत लिहून शेवटीं १ लिहिला तर राजा वश होतो. दुसरा प्रकार तीन पासून आरभ करून ९ पर्यंत लिहावे नतर १, २ लिहावे म्हणजे *व्यापारवृद्धि* होईल. चारापासून आरभ करून ९ पर्यंत लिहून नतर १, २, ३ लिहावे म्हणजे साधकाच्या क्रोधविकाराचें उच्चाटण होते. ५ पासून आरभ करून ९ पर्यन्त लिहिले व नतर १, २, ३, ४ लिहिले तर सावकाचें स्थान भ्रष्ट होतें. ६ पासून आरभ करून ५ पर्यंत लिहिले व नतर १, २, ३, ४, ५ लिहिले तर *मारण होणार नाही*. ७ पासून आरभ करून लिहिले तर (९ पर्यंत) व नतर १, २, ३, ४, ५, ६, असे लिहिले तर *अशुभ चितकांना* विपत्ति येते. ९ पासून आरभ करून १, २, ३ ४, ५, ६, ७, ८ असे लिहिले तर अवश्य धनवृद्धि होते. ह्या प्रकारें ८ कोटें (अगुले) अशा चमेलीच्या काडीच्या लेखणीनें अष्टगधानें १ लाख प्रमाणे नऊ कोठयात लिहावे. द्वी[१] भट[२] वेद[३] अग्नी[४] बाण[५] त्रि[६] षट्[७] शशि[८] वसु[९]. पण आदिमाया बीजाचें साधन जमणार नाहीं तर मायाबीजाशिवायच अष्टगधानें सूत्र लावून लिहावें. एक पासून ९ पर्यंत जर दीपक वगैरे सामान मिळू शकलें नाहीं तर माया बीज हे अवश्य जपावें. व गोळ्या पूर्वोक्त विधिप्रमाणें बनवून त्या

मासोळ्याना देत राहिले तरी सुद्धा कार्य सिद्धीस जाईल. जर मत्र लिहून पर्वताच्या शिखरावर चढवून उडवले तर उच्चाटन सिद्ध होतें. पृथ्वीवर (जमिनीवर) खडीनें (दगडानें) लिहिलें तर बंदी सुटतो. ब्रह्मचर्यानें रहावें. हविष्यान्न खावें. स्वत ची इच्छा मत्रावर लिहावी. जर मासोळीनें लवकर गोळी खाल्ली तर यत्र लिहावें. खाल्ली नाही तर लिहू नये. अष्टगध (१) चदन (२) अगर (३) जटामासी (४) देवदार (५) कस्तुरी (६) केशर (७) कापूर (८) वाळा याच्याशिवाय कापूर व केशर यानीं हे यत्र लिहावें, असें त्रिपुर सुप्रयोगात लिहिलें आहे.

पचदशी विद्या व श्रीविद्या ह्यासबधें जास्त माहिती उत्तरार्धांत 'देव देवता मत्र' ह्या प्रकरणात दिलेली आहे. तसेंच पचदशी यत्र, त्याचे प्रकार व उपयोग उत्तरार्धांत अनेक ठिकाणीं सागितले आहेत.

## ३. पंचदशीयंत्राचा विधि व विनियोग

शुभ कार्याला शुभ दिवस, क्रूर कार्याला क्रूर दिवस पाहून आरभ करावा. व यत्र लिहून नदींत सोडून द्यावें जें वाहून जाणार नाहीं तें स्वत जवळ ठेवावें त्यायोगें सर्व कार्यसिद्धि होईल. खालीं दिल्याप्रमाणें यत्राची सख्या लिहिली असता त्या त्या समोरील कार्यसिद्धि होते.

| संख्या | फळ | संख्या | फळ |
|---|---|---|---|
| २००० | लक्ष्मी प्रसन्न होते. | २००० | शत्रु वश होतो. |
| ६००० | निरोगी होतो. | ३००० | सर्व वश होतें. |
| १००० | सरस्वती प्रसन्न होते. | २००० | सभामोहन होते. |
| १००० | औषधी सिद्ध होतात. | ६००० | गर्भमोचन होतो. |
| २००० | मत्र यत्र सिद्ध होतें. | २००० | विदेशीं घर होतें. |
| ४००० | ईश्वर प्रसन्न होतो. | २००० | ख्याति-प्रसिद्धि होते. |

| संख्या | फळ | संख्या | फळ |
|---|---|---|---|
| ३००० | वैरी प्रसन्न होतो. | १० | निपनाश होतो. |
| ६००० | गेलेली वस्तु प्राप्त होते. | ५००० | वध्या स्त्री गर्भवती होते. |
| ५००० | देव प्रसन्न होतो. | ३००० | मित्रलाभ होतो. |
| २००० | दु:खनाश व सुख होते. | ४००० | राजा प्रसन्न होतो. |
| ४००० | उद्योग प्राप्त होतो. | १५००० | मनातील इच्छा पूर्ण होते. |

यत्र लिहून पाण्यात सोडावें. सिद्ध होईल. जर काही इच्छा असेल तर कणकेंत गोळी बनवून मासोळीला खाऊ घातली तर सर्व कार्यसिद्धि होईल. यत्र लेखन विधि शुभ कार्याला उत्तर दिशेकडे तोंड करून व अशुभ कार्याला दक्षिण दिशेकडे तोंड करून करावा.

**अथ मंत्रविधि—** (१) स्त्रीसग करू नये. (२) ब्रह्मचर्यानें रहावें. (३) यत्र लिहिण्यापूर्वी 'ॐ ह्रीं क्लीं स्वाहा' हा जप एक लक्ष जपावा. लोकास मोहिनी पाडण्यासाठीं १० यत्रे रोज लिहावीं. २० आकर्षणासाठीं, ३० जपासाठीं, १००० कार्यसिद्धीकरिता लिहावीं. लेखणी आठ अगुले असावी.

| | | |
|---|---|---|
| मोहनासाठीं | सुवर्णाची लेखणी | मद्यानें लिहावें. |
| स्तभन | चादीची लेखणी | हळदीनें लिहावें. |
| देवदर्शन | सुवर्णाची लेखणी | केशराने लिहावें. |
| द्रुतगमन | लोखडाची लेखणी | शवभस्मानें लिहावें. |
| द्वेष | लोखडाची लेखणी | मणवृक्षरसानें लिहावें |
| उत्पात शाति | दूर्वांची लेखणी | चदनानें लिहावें. |

| | | | |
|---|---|---|---|
| बदीमोचन | १०००० लिहावीं. | सर्व सिद्धि | ४०००० लिहावीं |
| राज्यप्राप्ती | २००००० लिहावीं. | मोहनविद्या | ५०००० लिहावीं |
| | ३००००० लिहावीं. | राजा वश होतो | ४०००० लिहावीं. |
| | ४००००० लिहावीं. | पाण्यात न बुडणें | ४००००० लिहावीं |

| | | | |
|---|---|---|---|
| वाक्‌सिद्धि | ५०००००लिहावीं. | लक्ष्मीप्राप्ति | ७००००लिहावीं. |
| गत राज्यप्राप्ति | २००००० लिहावीं. | अष्ट सिद्धि | ८००००० लिहावीं. |
| नव निधीप्राप्ति | ९०००००लिहावीं. | महादेवासारखे होणे | १ लक्ष लिहावीं. |

दररोज १०,२०, ३२, ५० किंवा १०० वेळा लिहावें. ब्राह्मणानें भूर्जपत्रावर लिहावें. क्षत्रियानें ताडपत्रावर, वैश्याने कागदावर लिहावें. शूद्रानें पृथ्वीवर लिहावें. लाल आसन व लाल कपडा अनुष्ठान सुरू असे-पर्यन्त घालावा. जमिनीवर झोपावें. मूग व तांदूळ भोजनाला घ्यावे. वरीलप्रमाणे जोपर्यंत यंत्रलिखाण चाललेलें आहे तोंपर्यन्त तसें रहावें व वागावें. श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु.

# ८ अन्यधर्मीयांचे देव, मंत्र व यंत्रतंत्रें

## १ पारसीक वेद—अवेस्ता व गाथा

वेदातील मत्र पूर्वीच्या स्तभात वर्णन केले आहेत. पारशी लोकाचे फार जुनाट असलेले गाथा व अवेस्ता हे ग्रथ होत. आपण वेदाना जसा मान देतो तसा मान पारशी लोक त्याच्या *गाथा* व *अवेस्ता* यास देतात व पारशी ते ग्रथ अपौरुषेय मानतात. हिमकाल सुरू झाल्यानतर देव, असुर, मानव, दानव, हे उत्तरध्रुव प्रदेशातून बाहेर निघाले अवेस्तामध्यें 'हप्तहिंदु' या स्थानात आर्य लोक आले असें वर्णन आहे. हप्तहिंदु म्हणजे सप्तसिंधु.

य ऋक्षदंहस्ते मुचयो वार्यांत सप्तसिंधुषु ८–२४–२७

सप्तसिंधु हे देशाचें नाव आहे. यावरून सप्तसिंधु देशात आर्यांची वस्ती होती. त्यावेळीं आर्यावर्तांतही आर्यांची वस्ती होती द्वापार युगातील म्हणजे १२००० वर्षांपूर्वी भारत राजा सार्वभौम राजा होता व त्याचें वर्णन करिताना 'समुद्रपर्यंताया पृथिव्या एक राट्' असें नमूद केलेलें आहे. वेदकाळीं वैदिक लोकाची विचारपद्धतीच अशी होती कीं, सर्व पृथ्वीतील मानवानां 'आर्य' करावयाचें. ही गोष्ट "स्व स्व चरित्र शिक्षेरन् पृथिव्या सर्व मानवा." या वाक्यावरून सिद्ध होतें. सप्तसिंधु अमलेला तो देश हल्लीं तुर्कस्थानात रशियाचे अमलाखालीं आहे. त्या भागाचे रशियन भाषेतील नाव 'सेमिरिटचेन्स्किकाय' 'सात नद्याचा

प्रात' असें आहे. 'एदेनव्हेजो' म्हणजे आर्यांचे स्थान, असा निर्देशही वरील सप्तसिंधूचे प्रदेशाबद्दल ठिकठिकाणीं आला आहे. पण हे पारशी म्हणजे 'अहुरमझ्जद' या देवतेचे पूजक होत.

पारशी लोकांच्या अवेस्ता ग्रथाचीं एकवीस पुस्तकें होतीं. त्यापैकीं दोनच शिल्लक राहिलीं आहेत. यापैकीं ऋषी 'जरथुस्त' यांनी ग्रथण केलेल्यापेकीं थोडे मूळ श्लोक शिल्लक राहिले आहेत, त्यास 'गाथा' असें म्हणतात, ह्या गाथाचे पाच विभागात एकदर २३८ श्लोक आहेत व त्यापैकीं पहिल्या भागात २०० श्लोक आहेत. त्या शभर श्लोकात 'अहुनवर' हा शब्द येतो. हा शब्द 'जरथुस्त' धर्माचा मूलमत्र (१ ला मत्र) आहे व सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी ईश्वरानें हा शब्द उच्चारिला व ह्या शब्दापासून सृष्टि उत्पन्न झाली असा त्या धर्माचा दडक आहे.

ह्या मत्रामध्ये अष् हा शब्द येतो. 'अष्' याचे एक रूप 'अर्त' असें होतें. अर्त याचें वैदिक रूप ऋत हें होय. 'अष् हे पन्ता ओ' 'ऋतस्य पथा ' असा वैदिक शब्द तयार होतो. 'रतु' म्हणजे ऋति असाही अर्थ आहे, हा 'अहुनवर' मत्र खाली लिहिला आहे.

दुसरा मंत्र—'अशेमवोहु वहीशतमेअस्ती
अशेम वस्तु वसिष्म अस्ती
अशना अस्ती अशल आइमाये
हयद् अशाय वहेशताय अशेम
हायत् अशाय वशिष्ये अशेम'

(१) यथा अहू अहूर्या अथा रतुष् अशात् ह चित् ह चा.

(२) वड्हे उश दज्दा मनहो श्योथननाम् अङ् हे उश मज्दाई

(३) क्षथ्रेमचा अहुराई आ यिम् द्रगुभ्यो ददत् वास्तारम्

(१) ज्याप्रमाणे राजा सर्वोपरि असतो, तसे ऋषीही आपल्या पवित्रतेला साधनी भूत आहेत.

(२) शुद्धमनाचा पुरस्कार प्रभूचे करिता सृष्टिकार्य करणाऱ्यांस प्राप्त होतो.

(३) गरिबाचा जो वाली होतो, त्यास ईश्वराचें बल (क्षत्र) प्राप्त होतें.

पारशी लोकात असा नियम आहे कीं जो मनुष्य वरील सर्व मन्त्राचा शुद्ध उच्चार करून ४० दिवस पाठ करील त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. दुसऱ्या कोणत्याही मन्त्रसाधनेची जरूर पडणार नाहीं.

मि. ए फिरोज शापुरजी मसाणी, एम्. ए., एलएल्. बी , सॉलिसिटर, मुंबई, यानी अवेस्तामधील मन्त्राच्या वर्णनपर सात पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यापैकीं तिसरें पुस्तक लेखकानें मागवून घेतलें. पुस्तककर्त्यानें सर्व हक्क स्वाधीन ठेविले आहेत असें कळविलें आहे. लेखकाचा हेतू ह्या पुस्तकाचें भाषातर करू न देण्याचा नाहीं. फक्त वेदासारखा[1] मन्त्रभाग अवेस्ता मध्येंही आहे हे दाखविण्याचा हेतु आहे. एकदरींत ह्या लेखातील मन्त्रशास्त्राच्या उहापोहाला ह्या पुस्तकातील कांहीं गाथाचा, मन्त्राचा विनियोग दाखविला तर वाचकाची खात्री होईल कीं, *इतर धर्मग्रथातही मन्त्रांचा विनियोग सांगितला आहे.* मेहेरबान मसाणी साहेब याच्या पुस्तकातील पाचसहा मन्त्र येथें देण्यात येत आहेत व ह्याबद्दल लेखक मि. मसाणी याचा आभारी आहे.

१. पारशी गाथा व मन्त्र . पुढें दिलेले मन्त्र अवेस्ती भाषेंतील असून त्याची लिपीही अवेस्ती आहे. त्या लिपीचें वळण अशत: जुन्या पर्शियन व याहुदी लिपींशीं जुळतें आहे. भाषाशास्त्रीय दृष्ट्या गथातील विचार व शब्द ऋग्वेदीय सस्कृत शब्दासारखेच आहेत जसे वैदिक ‘सर्वतत्’ म्हणजे ‘हौर्वतत्’ ‘अमृत’ ‘अमृतात्’ म्हणजे अमरेतत्–अमरदाद–(अमरता) वैदिक ‘क्षत्र’ (सत्ता–तेज) म्हणजे त्याचे ‘क्षत्र’ इ. अवेस्तामधील मूळ सूक्ताना ‘यास्न’ म्हणतात. गाथा म्हणजे ‘यास्न’चे भाग असून त्याचीं ७२ मडलें आहेत अहुनावैति गाथा, उश्तवतीगाथा, स्पेन्तमैंयु गाथा, वोहक्षत्र गाथा आणि ‘वाहिशोइश्ति गाथा’ असे पाच भाग आहेत झरतुष्टी धर्मविचाराचे हुमत (सद्विचार) हुख्त (सद्शब्द, सद्भाषा) आणि हुवरश्त (सदाचार) हे तीन आधारस्तंभ आहेत. ते देवाला हिंदु धर्मीयाप्रमाणें षड्गुणैश्वर्यसंपन्न समजतात. नौरोजीन अखबार Weekly Illustruated ३१–७–६९ (गो. प्र. भा.)

वेदाचा अभ्यास जसा वेदधर्मीय ब्राह्मणामध्यें आहे, तशा प्रकारचा अभ्यास जरथुस्त म्हणजे पारशी मंडळींत नाहीं. 'मंत्र' असे अवेस्तांत कांहीं भाग आहेत, हें पुष्कळ पारशी मंडळीस माहीत नाहीं. यांत आश्चर्याची गोष्ट नाहीं, व येथें त्या मंत्राचा उपक्रम केल्यानें पारशी मंडळीस फायदा व्हावा हा लेखाचा हेतु नाहीं. लिहिण्याचा मुख्य हेतु हाच आहे कीं, वैदिक ब्राह्मण अगर वैदिक गृहस्थ यांच्या ठिकाणीं जशी वैदिक मंत्राबद्दल अनास्था आहे तशीच किंबहुना अधिक अनास्था पारशी मंडळींत दिसून येते. परंतु मोठा शिक्षित असो वा अशिक्षित असो अग्निपूजा व वरुणपूजा ही मात्र पारशी मंडळींत जागृतावस्थेंत आहे. वैदिक धर्मीय सुशिक्षित मंडळींत श्राद्धविधि लुप्तच होत आहे, तसाच तो पारशांतही लुप्त होत आहे, म्हणजे ते आपल्या पुरोहिताला तें कर्म करण्यास सांगत असतात व पुरोहितानें तें श्राद्धकर्म अग्निमंदिरांत करावयाचें ही रूढीच होऊन बसली आहे. असो. ह्या गोष्टीचा उल्लेख करण्याचा हेतु हा आहे कीं *ब्राह्मणादि त्रैवर्णिकांनीं सूर्योपासना तरी कायम ठेवावी.*

वैदिक लोक ज्याप्रमाणें मुसलमान वगैरे मांत्रिक मंडळींकडे जाऊं नये, त्यांनीं आपल्या वैदिक, पौराणिक किंवा शाबर मंत्राचा अनुभव घ्यावा असें सांगतात, त्याप्रमाणें पारशी लोकही हिंदू मुसलमान यांच्या मधील मांत्रिक लोकांकडे जाऊं नये असें सांगतात. *ज्या धर्मांत ईश्वरानें आपणास जन्म दिला त्या धर्माला धरून रहावें व त्या धर्मांतील मंत्रांचा उपयोग करावा असें पारशी* लोकांतील गुरू सांगतात. आर्यलोक जसे सूर्योपासक आहेत, तसे पारशी लोकांन बृहस्पति देवतेची व अग्नीची उपासनाही सांगितली आहे. हिंदू मुसलमान धर्मांप्रमाणें 'झोरोआस्टर' धर्मांतही रोगी लोकांस अंगारा, ताईत मंत्रून दिलेले दोरे देण्याची प्रथा आहे.

*गाथेंतील मंत्र व त्यांचा विनियोग*

आतां अवेस्तामधील काहीं मंत्र व त्यांचा विनियोग देण्यांत येत आहे. मुलांना दृष्ट पडते ती निर्मूलन करण्याचा मंत्र–

'नीरंग व दीदन् पस्ती यानी कसी राके दर्दे कजल व अब्रूलक वाशद चुन् आन कसीरा वेवीनद इन् नीरंग आवायद् बखानदन्'

अर्धशिशी दुखते त्यावर मंत्र :–'नीरंग वराय दफे करदने दर्दे नीमसर'

*नाग मारण्याचा मंत्र* : 'नीरंग मार जदन् वर्षे नाहे....आपमवाहू'

*शेतांत किडे पडतात ते मारण्याचा मंत्र* : 'अवस्त भूर जदमू इन् आस्ता के चुन कशाद इन् खानंद वस्फतम अवजन एत....आपयवाह'

*बाळंतीण सुख प्रसूत होण्याचा मंत्र* : 'नीरंग आन अस्त के झन् वा वकते फरझंद झांदन दुशवार वाशद् इन् नीरंग व खानंद' किंवा *तांब्याच्या ताइतांत हें यंत्र लिहून बांधावें* : आरम पाहलुम् विशाम्' (७ वेळ) हा मंत्र ताइत हातांत घेऊन म्हणावा. व मग तें यंत्र ताइतांत घालावें.

| ४ | १ | २ |
|---|---|---|
| ७ | ५ | ३ |
| ६ | १ | ८ |

दाढदुखीवर मंत्र : 'नीरंग वराय दर्द इरान्'

पति-पत्नीमध्यें वैमनस्य असल्यास तें दूर करण्याचा मंत्र : 'नीरंग तावीज नवस्तन वराय सुलेह करदन ह ई मर्द व जन नाम ई यऽद-शुहरवाद'

एक, दोन, तीन दिवसांचा ताप नाहींसा करण्याचा मंत्र–नीरंग दूर करदन ई तप ई यक्र रोज व दो रोज व से रोज ई यऽद....द्रगुव्यो चीत्रआत् जरथुस्तनो'

गरमी व सर्दीचा ताप नाहींसा करण्याचा मंत्र—

'नीरंद दूर करदन ई तप ई गर्म व सर्द निजवयोभ....आपव दाम दातम्'

शयतान् व देवाचा जादू तोडण्याचा मंत्र :—

'नीरंग ई होम यदत नीरंग शक्तन् ई-जादू-ई शयतान व दीवान् कु शेकनम्....आपमवाह'

याप्रमाणें अवेस्तामधील कांहीं मंत्र लिहिलेले आहेत. याप्रमाणें अनेक

रोगावर अनेक विधींचे वेळीं म्हणण्याचे मत्रही अवेस्तात आहेत. वरील मत्र देण्याचा हेतु हाच कीं, मत्रविद्या हा विषय अवेस्ता व गाथा या ग्रथातही आहे. या मत्रात एक गोष्ट दिसून आली ती अशी कीं, अवेस्ताच्या मत्रात सैतान व देव एकाच श्रेणींत घेतले आहेत या पारशी म्हणजे असुर लोकाचें देवाशीं वैर होतें. त्याचे देव वरुण, बृहस्पती हे होत. आपल्या पुराणग्रथात बृहस्पतीनीं अवतार धारण करून असुराना यज्ञापासून परावृत्त करण्याचा व हिंसादि दोषापासून मुक्त राहण्याचा उपदेश केलेला होता असें वर्णन आहे. देव जसे होमहवन करून सिद्धि प्राप्त करून असुराचा पाडाव करीत असत, तसेंच होम-हवन करून असुरही देवाचा पाडाव करीत असत. असा क्रम अव्याहत चालत असे. अशा वेळीं देवाचें हित साधण्याकरिता बृहस्पतीचा अवतार हा असुरास उपदेश करण्याकरिता झाला होता. म्हणून हा असुरामध्यें देवांचा द्वेष व बृहस्पतीची स्तुति आढळून येते

**सप्तसिंधु**[१] :—हा भाग कोठे होता याबद्दल ऋग्वेदातील ऋचा मागील भागात दिली आहे. त्यातच रशियन तुर्कस्थानातील रशियन भाषेंतील सप्तसिंधू या अर्थाच्या शब्दाचें रूपहि दिलें आहे व तेथें सातच नद्या आहेत परतु इराणातील या आर्यवशी लोक व आर्यावर्तातील आर्य लोक काश्मीरपर्यंत एकमेकाच्या सहवासात असताना सप्तसिंधु हा पूर्वस्थित देशाची स्मृति रहावी म्हणून काश्मीर व अफगाणिस्थान या पठारावरून वहात जाणाऱ्या सिंधू नदीच्या पश्चिमेकडील भागालाही 'सप्तसिंधू' व पूर्वेकडील भागालाही सप्तसिंधू असें संबोधीत असत सिंधूच्या पूर्वेकडील भागात राहणारे आर्य म्हणजे इराण देशातील आर्य असें म्हणता येईल

१. सप्तसिंधु–झेंदावेस्ता म्हणजेच अवेस्ता व ऋग्वेद व त्यातील ऋचा भारतातील आर्य, इतर स्थलीय आर्य, आणि उभयतातील मत्र इ. गोष्टी 'वेदाचें उत्तर ध्रुव प्रदेशातील वसतिस्थान' हा लो. टिळकांच्या ग्रथात सविस्तर सांगितलें आहे, (गो. म. मावे)

या दोन्ही सप्तनद्या मिळून चवदा नद्या होतात व प्रत्येक गटानें आपापल्या भागास सप्तसिंधू असेंच नामाभिधान दिलेलें आहे. या ठिकाणीं येईपर्यंत दोन्ही गटात भेद नव्हते असें वाटते, कारण ह्या १४ नद्याचा उल्लेख ऋग्वेदातील सूक्तात दिसून येतो. आपल्या आर्यावर्तांतील फक्त सिंधूच्या पूर्वेकडील नद्याचाच उल्लेख येतो. म्हणून त्या सिंधूच्या पूर्वेकडील व पश्चिमेकडील सात नद्याच्या वैदिक नावाची व हल्लीं प्रचलित असलेल्या धार्मिक विधि करिताना, स्थलाचा नामनिर्देश करिताना व पुण्य नद्याचा उल्लेख करिताना नावाची माहिती उद्‌बोधक होईल अशाकरिता ती खालीं दिली आहे.

सिंधूच्या पूर्वेकडील सात नद्याचा उल्लेख असलेली वैदिक ऋचा खालीं लिहिल्याप्रमाणे आहे.

**'इमं मे गङ्ग यमुने सरस्वति शुतुद्रिस्तोमं सचता परुष्णिया**
**असिक्न्िया मरुद्वधे वितस्तयार्जीकीये शृणुह्यासुषोमया**

१ गगा २ यमुना ३ सरस्वती ४ शुतुद्री (सतलज) ५ परूष्णी (इरावती अथवा रावी) ६ असिक्निन् (चद्रभागा–चिनाब व वितस्ता–जेहलम)–चद्रभागा आणि जेहलम ह्या एकत्र वहातात तेव्हा त्यास मरूद् वृधा असें म्हणतात ७ वितस्ता ही सुषोमाबरोबर वाहते, त्यावेळीं तिला आर्जिकीया (जेहलम) आणि सुषोमा (सुवन) हिलाच विपाशा–बियास म्हणतात. या नदीचें प्राचीन नाव उरूजिस असें आहे. सिंधूच्या पश्चिमेस वाहणाऱ्या सात नद्याचीं नावें.

**तृष्टामया प्रथमं यातवे सजूः सुसर्त्वा रसया श्वेतया त्या**
**त्वं सिंधो कुभया गोमतीं क्रुमुं मेहत्न्वा सरथं याभिरीयसे**

ऋ. १०–७५–७॥–६॥

सिधूनदीच्या पश्चिमेस असणाऱ्या नद्याची वैदिक नावें व त्याचीं हल्लींचीं नावें.[१]

---

१. 'प्राचीन स्थळ नाम सूची' या श्री चित्रावशास्त्री यांच्या ग्रथात दिलेलीं काहीं नावें निराळीं आहेत. (गो. प्र. भावे).

अहुरमझ्द—

'असुर' हा शब्द ऋग्वेदात आरंभीं चागल्या अर्थानें आला आहे

यमयमीसंवाद (म. १० सू. १० ऋ. २) *महस्पुत्रासो* असूरस्यवीरा दिव पुत्रास्ते असुरस्य वीरा / या दोन्ही चरणात महस् म्हणजे महर्लोक व दिव म्हणजे देवलोक असा आहे.

तैत्तिरीयब्राह्मण (काण्ड ३ पाठ २१ अनुवाक २) 'त्वमग्ने रुद्रो असुरो महोदिव .'

हे अग्ने तू रुद्र म्हणजे भयकर आहेस, असुर म्हणजे शत्रुहता आहेस व द्युलोकातील तेजोरूप 'तू आहेस.' आणि त्याच प्रसगात पुढें मरुतादि-देवगणाचा तू नियामक, ईश्वर आणि सरक्षक आहेस. आणि तेहतीस देवाचीं निरनिराळीं रूपें तूच धारण केलीं आहेस, असें वर्णन केलेलें आहे.

**(१) त्वं विश्वेषां वरूणासि राजा ये च देवा असुर ये च मर्त्याः**
(ऋग्वेद १०, ९७, १५)

**(२) समिधे अग्नाव ऋतं इद्वदेम महत् देवानां असुरत्वमेकं.**
ऋग्वेद (३, ५५, १).

(१)–'हे वरुणा, तू सर्व विश्वाचा राजा आहेस अर्थात् देवाचा व असुराचाही राजा आहेस.

(२)—या जातवेद अग्नीसमोर मी सत्यच भाषण करितों कीं, सर्व देवामध्ये एकच ईशतत्त्व आहे.

याप्रमाणे पुढें काहीं ठिकाणीं असुर हे निर्गुणोपासक व देव हे सगुणोपासक असा भाव उत्पन्न झाला असें दाखविलें आहे व त्यामुळें परस्परात वमनस्य उत्पन्न होऊन असुर या शब्दाला 'दस्यु-दैत्य' असा अर्थ लावण्यात आला आहे वस्तुत असुर हे आर्यच होत यांत काहीं सशय नाहीं

मझ्द—ईश्वरकृष्ण याच्या *सांख्यकारिका* श्लोक (६८–७०) यात सांगितले आहे कीं, सांख्य दर्शनाचे *सस्थापक कपिल मुनी याच्या एका* शिष्याचें नाव 'आसुरी' असें होतें. या आसुरी मुनींनी आपला शिष्य

'पचशिख' याला साख्य –विद्या शिकविली व ह्या पचशिख मुनींनी ती विद्या मिथिलेश विदेही जनक राजास शिकविली. शतपथ ब्राह्मणाचा वश ब्राह्मणात व बृहदारण्यकोपनिषदात (अध्याय ६ तील वशावळींत) असें लिहिलें आहे कीं उद्दालक ऋषींचे शिष्य याज्ञवल्क्य होते, व त्याचा शिष्य आमूरी व त्याचा शिष्य आसुरायण आणि आसुरायणाचा शिष्य प्राश्नीपुत्र हा आसुरीवासी होता. आसुरी म्हणजे हल्लींचा 'असिरिया' देश होय हा देश इराकजवळच आहे. त्यामुळे साख्य शास्त्राचा जसा असीरियात प्रसार झाला तसाच इराणातील आर्य लोकातही झाला होता हे आसुरी पथाचे लोक साख्य शास्त्रज्ञ, विद्वान व बुद्धिवान असे समजले जात असत, म्हणून आसुरी हा शब्द 'महद्' या शब्दाचा पर्याय शब्द आहे असें मानण्यात आले असावें

उपनिषत्कारानी आत्मा व ईश्वर हीं तत्वें मानलीं आहेत, पण त्याप्रमाणें साख्य दर्शनकार ईश्वरतत्वाचा स्वीकार करीत नाहींत. ते ज्ञानरूप पुरूषाचा स्वीकार करितात. परतु ज्ञानरूप पुरुष हा आत्मा व ईश्वर याहून निराळाच आहे असें ते मानतात. उपनिषदामध्यें महत् तत्वाला बुद्धीच्या पलीकडील स्थिति दाखविली आहे व साख्य दर्शनात समग्रबुद्धिरूपच तो पुरुष आहे असें मानण्यात आलें आहे. ह्या साख्य शास्त्राचा प्रसार इराणातील आर्य ब्राह्मणात म्हणजे 'मग' ब्राह्मणात पुष्कळ प्रमाणात झाला. परतु इराणातील बुद्धिवान मडळीस तो रुचला नाहीं, म्हणून त्यानीं महत् या शब्दाला 'दा' हा धातु लावून महत्द्-मस्जद् असा शब्द तयार केला. इराणी आर्यांच्या 'मग' ब्राह्मणाच्या किंवा पारसिक धर्म स्थापकाच्या मताप्रमाणे मस्ज़्द शब्दात महान् प्रभु, महान् पुरुष अर्थात बुद्धिप्रेरक विश्वेश्वर असाच अर्थ ध्वनित होतो असे दिसतें. याप्रमाणें 'अहुर मज्झ्द्'–म्हणजे 'असुर महत्‌दा' असा अर्थ तयार होतो

इ. सन पूर्व ६८८ ते ६७० मध्यें असिरीयाचा राजा असुर बनिपाल याचा एक शिलालेख सापडला आहे. या शिलालेखात त्या देशातील प्रजाजनाचा महान् देव म्हणून असुर मसदाचें (मज्दाचें) नाव कोरलेलें

आहे. यावरूनही अहुरमझ्ज म्हणजे 'असुर महस्' म्हणजे 'महान् पुरुष' असे असावें असे दिसते.

**झरतुष्ट (झरदुस्त)** ...

ऋग्वेद संहितेंत अक्षर सख्यानुसार मुख्य सात छदाचा उपयोग करण्यात आला आहे, ते सात छद असे—

गायत्री छद २४ अक्षराचा, उष्णिक् छद २८ अक्षराचा, अनुष्टुप् ३२ अक्षराचा, बृहति ३६ अक्षराचा, पक्ति ४० अक्षराचा, त्रिष्टुप् ४४ अक्षराचा आणि जगति ४८ अक्षराचा, असे छद आहेत. परतु यजुर्वेद संहितेंत प्रत्येक छदाचे आर्ष, दैव, आसुर, प्राजापत्य, याजुष, साम्न आर्च आणि ब्राह्म अशा प्रकारचे आठ भाग केलेले आहेत या विभागात आसुरछद म्हणून एक भाग आहे. त्यामध्यें आसुरी गायत्री छदाची अक्षरसख्या १५ आहे. आसुरी उष्णिक १४, आसुरी अनुष्टुप् १३, आसुरी बृहती १२, आसुरी पक्ति ११ आसुरी त्रिष्टुप् १० आणि आसुरी जगती छदाची अक्षरसख्या १० आहे यात्रमाणें यजुर्वेदामध्ये कांहीं ऋचा आसुर छदात गाइलेल्या आहेत.

असुर लोकात स्त्रीपुरुषाकरिता भाजीबधनाचें विधान होतें व आहे. आपल्या आर्यावर्तांतही "पुरा कल्पे तु नारीणा मौंजीबधनमिष्यते" स्त्रियाच्या मौंजीबधनाची चाल होती परतु हल्लीं ती बद आहे. हे असुर अग्नि व वरुण देवताचे उपासक होते व आहेत. ते यज्ञोपवीत घालीत असत. व हल्लींचे पारसीकहि यज्ञोपवीत घालतात. हे असुर लोक निर्गुणोपासक होते व आर्यावर्तांतील आर्य लोक विष्णू, इद्र, रुद्र इत्याद सगुण देवताचे उपासक होते. यामुळें, त्या दोघात मोठी लढाई झाली व पारसीक असुराचा[1] पराभव झाल्यानें ते (असुर) इराणात वस्तीकरिता निघून गेले.

---

१. 'ततो पारसिकान् जेतु पतस्थे स्थल वर्त्मना' असें कालिदासाच्या काव्यांत (रघुवंशात) आहे हें लक्षात घ्यावें। (गो. म. मा.)

अशा प्रकारानें हप्तहद् देशातून इराणात (इलान्) गेलेल्या असुर लोकांत कालांतरानें "झरतुस्त" नांवाचे धर्मसंस्थापक होऊन गेले याच्या पूर्वजांच्या ज्या दहा पिढ्या आहेत, त्यावरून झरतुस्त हे ब्राह्मण कुळांतील होतें व त्यांचे कुल श्वेत होतें व गोत्र हरिदश्व म्हणजे हरिद्रवेय होतें असें दिसतें तें पुढील माहितीवरून दिसून येईल झरतुस्ताच्या पिढ्या खालीलप्रमाणें आहेत

१ झरतुस्त, २ पौरुषाश्व, ३ प्रतिअश्व, ४ ओर्वाश्व, ५ सेचदश्व, ६ चक्षण, ७ प्रतिअस्य, ८ हरिद्रवेय किंवा हरिदश्व, ९ हरिद्रव, १० श्वित.

वरील दहा नांवांपैकीं पाच नांवें अश्वान्त आहेत, आपल्या श्वताश्वतर उपनिषदाच्या उद्गात्या ऋषीचें नांव श्वेताश्वतर होतें या नांवांत अश्वतर हें ऋषीचें नांव व श्वेत हें त्याच्या कुळाचें नांव होय

ऐतरेय ब्राह्मणामध्यें विश्वजित् नांवाच्या यज्ञाचें वर्णन करितांना 'बुडिल' ऋषीचें नांव आश्वि अगर अश्वतर असें दिलेलें आहे

श्रीसायणाचार्यांनीं आश्वि याचा अर्थ अश्व या नांवाच्या ऋषीचा पुत्र आणि अश्वतर याचा अर्थ अश्वतर ऋषीचा वंशज असा केला आहे. छांदोग्य उपनिषद् (अ ५, ११, १ व १६, १) यांत असें वर्णन आलेलें आहे कीं, वर नमूद केलेले 'बुडिल' ऋषी हे उद्दालक ऋषींना बरोबर घेऊन कैकय (इराण अथवा इलान्) देशाचा राजा अश्वपति यांनीं बोलाविलेल्या ब्रह्मपरिषदेंत उपस्थित झाले होते व या परिषदेंत वैश्वानर ब्रह्मविद्येबद्दल त्यांनीं चर्चा केली होती यावरून असें अनुमान निघतें कीं, अश्वतर आणि अश्व या वंशांतील पुरुषास उपनिषदीय वाङ्मयांत फार मान दिलेला आहे

कृष्ण यजुर्वेदाच्या ८६ शाखा आहेत त्यांत चरक नांवाची एक शाखा आहे ह्या चरक शाखेच्या ९१ उपशाखा आहेत त्यामध्यें श्वेताश्वतर आणि मैत्रायणी अशा शाखांचा उल्लेख आहे

मैत्रायणी शाखेच्या ७ उपशाखा आहेत त्यांत हरिद्रवेय या नांवाची

उपशाखा आहे. 'झरतुष्ट' या धर्मसंस्थापकांच्या दहा पिढ्या वर दिल्या आहेत. त्यांत आठव्या पुरुषाचें नांव 'हरदश्व' म्हणजे 'हरिद्रिवेय' असें आहे. यावरून झरतुष्ट यांचे पूर्वज 'श्वेत कुलांतील' कृष्ण यजुर्वेदाचे अनुयायी होते असें दिसते.'

झरतुष्ट या शब्दाचा उगम हरित (झरत) हिरण्मय 'उष्ट' म्हणजे प्रकाश. एकंदरींत हिरण्मय प्रकाशरूपी असा याचा अर्थ होतो.

देव—पारसिकांच्या ग्रंथांत पापी नष्ट अशा अर्थी 'दवेयु' असा शब्द येतो. देव असा क्वचितच येतो. याकरितां देव म्हणजे दैत्य, दानव असा अर्थ पारसिकांच्या ग्रंथांत नसावा अशी आमची समजूत झाली आहे.

## (आ) जैन सांप्रदायांतील मंत्र.

जैन सांप्रदाय भगवान् ऋषभदेव यांचेपासून सुरू झाला. परंतु *त्यावेळीं वेदांबद्दल अप्रीति नव्हती, तर हिंसेबद्दल होती.* त्यांचे शिष्य अरिहंत (अर्हत) हे होते. त्यांनीं जैन धर्म स्थापन केला. यापूर्वीं असे एकंदर २४ धर्मप्रचारक होऊन गेले असें जैन ग्रंथांत वर्णन आहे. त्या सांप्रदायांत वेदांचें वरिष्ठत्व अमान्य झालें. पुराणग्रंथ त्यांस मान्य नाहींत. परंतु त्या सांप्रदायिकांनीं नवीन पुराणांची रचना केली. त्या नवीन पुराणांत श्रीराम, हनुमंत, श्रीकृष्ण हे श्रेष्ठ पुरुष जैन सांप्रदायी होते असें वर्णन आहे. गुरुपरंपरेला मान्यता आहे. पण अवतार-परंपरेला मान्यता नाहीं. योगमार्गानें मुक्ति साध्य होते अशी त्या सांप्रदायांत ग्वाही दिलेली आहे.

---

१. 'झरतुष्ट—त्याची पीठिका—पारशीकांच्या गाथा, त्यांतील व्यावहारिक व पारमार्थिक मंत्र–तंत्र व यंत्रें (ताबीज–ताइत) प्रचार व प्रघात यांचा बराच विचारपरिप्लुत परामर्श Weekly Illustrated—३१ ऑगस्ट १९६९ यांत दिलेला आहे. त्यावरून योगेश्वरानंदांच्या वरील विवेचनाला पुष्टीच मिळते. पण कांहीं बाबतींत विवाद्यता आहेच. (गो. प्र. भा)

त्या सांप्रदायांत श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ आहेत. इष्ट कामना-सिध्यर्थ देवी मंत्र व यंत्रे या सांप्रदायांत प्रचलित आहेत. हे मंत्र व यंत्रे तंत्रग्रंथांतून घेतलेली आहेत. पद्मावती व गौरी या देवतांची आराधना इष्ट फलप्राप्त्यर्थ करण्यांत येते. जैना यंत्र व ज्वरबंधन यंत्रे त्यांच्या सांप्रदायांत विशेषत्वानें दिसून येतात. जैन सांप्रदायांतील मंत्र संस्कृत, पाली व अर्धमागधी या भाषांत लिहिलेले आहेत. वेद, उपनिषदें व पुराणें या प्रधान वर्णाश्रम धर्मप्रणीत आचार सांगितलेले आहेत. पण वर्णाश्रम धर्माचार न मानणाऱ्यांपैकीं असुर (पारसी) जैन व बौद्ध हे असल्यानें यांपैकीं जैनधर्माच्या प्रवर्तकांनीं आर्यधर्मांतून आपला निराळा सुभा काढला व इष्टफल-साधनार्थ वेद, उपनिषदें व पुराणें यांच्यावर विश्वास नसल्यानें वैदिक किंवा पौराणिक मंत्र न घेता तंत्रग्रंथांतील मंत्र उपयोगांत आणिले. कारण आगम व तंत्र ह्या मार्गांत मंत्रदीक्षा देण्याचे बाबतींत वर्ण-जाति-स्त्रीपुरुष असा भेद मानण्यांत येत नाहीं.

श्रीसिद्ध सारस्वताचार्य श्रीबालचंद्र सूरी हे जैन सांप्रदायांत एक मोठे कवी होऊन गेले. तसेंच न्याय, अलंकार, व्याकरण या शास्त्रांवरही जैन सांप्रदायांत मोठमोठे ग्रंथकार होऊन गेले. त्यांच्या ग्रंथांना आर्यधर्मांतील ग्रंथकारांनीं मान्यता दिलेली आहे. श्रीबालचंद्र सुरींनीं 'वसंतविलास' नामक महाकाव्याची रचना केली आहे. त्या काव्याच्या मंगलाचरणाच्या श्लोकांत 'श्रीसरस्वती' देवीची उपासना करून मला कवित्वाची स्फूर्ति झाली असा निर्देश केला आहे. अर्थात् श्रीसरस्वती देवीची उपासना ह्या सांप्रदायांत प्रचलित आहे. याशिवाय या सांप्रदायांत पूर्वी होऊन गेलेल्या २४ तीर्थंकरांपैकीं प्रत्येक तीर्थंकराची ती शासनदेवता असते. तिच्या प्रसन्नतेकरितां तिचे मंत्रही प्रचारांत आलेले आहेत. श्वेतांबर मताप्रमाणें २४ देवता मानल्या आहेत व त्या देवतांचे विविध पूजाविधि व मंत्रही त्यांच्या ग्रंथांत वर्णन केलेले आहेत. श्रीसरस्वतीदेवीचे १६ व्यूह आहेत व प्रत्येक व्यूहाची एक अधिष्ठात्री देवता व तिचा विशिष्ट मंत्र व तिचें

विशिष्ट पूजाविधान म्हणजे तत्र वर्णिलेलें आहे. अशा १६ अधिष्ठात्री देवतांचीं १६ विधानें निश्चित केलीं आहेत. वरील विवेचनावरून जैन सांप्रदायात मंत्रविद्या प्रचारात आहे व यात तंत्रशास्त्रातील[1] मंत्र व तंत्रेंही आहेत ही गोष्ट शोधकास त्याचे ग्रंथ पाहून समजेल.[2]

## (इ) बौद्धसांप्रदायांतील मंत्र.

वेद, उपनिषदें व पुराणें यास न मानणारा व वर्णाश्रमधर्म न पाळणारा

---

१. जैन मंत्र तंत्र . इ. स. १ ल्या शतकापासून जैनधर्मीयांनीं *तंत्रसाधनेचा* प्रारंभ केला असे मानितात. ते शक्तिसिद्धांत मानितात. वैदिक लोक जाति-वर्ण इत्यादि पाहिल्याशिवाय मंत्रदीक्षा देत नाहींत. म्हणजे मानसिक धारणा अजमावून मगच मंत्र देतात. पण जैन लोकांनीं तांत्रिकाची दीक्षा घेतली खरी; तथापि ते तांत्रिक वर्ण, जाति, इत्यादि भेदभाव मानीत नाहीत. जैनधर्मात मानवदेवसुरी, मानतुंगसुरी, शांतीसुरी, धर्मघोष, जिनप्रभ, यशोविजय इत्यादि अनेक तांत्रिक होऊन गले. त्याचे सर्व मंत्र 'ह्' या अक्षरानें सुरू होत असल्यानें त्या तंत्रमंत्राला 'हादिमत' म्हणतात. *ही प्रथा वैदिक नाहीं* (राहुरी येथील होराराल आर. जी. सप्रे हे *हादिविद्या युत श्रीचक्र* म्हणून एक फोटोप्रिंट विकत देतात। ह्याचा विचार वैदिक साधकानीं अवश्य करावा) या पंथात सरस्वति, अंबिका, पद्मावती सिद्धायिका, इंद्राणी, अंकुशा, चक्रेश्वरी इत्यादि तांत्रिक देवता आहेत. जास्त माहितीसाठी भारतीय संस्कृति-कोश. भाग ४ या पहा. (गो. प्र. भा.)

२. *परमात्मा अनंत गुणात्मक असून त्याचें चिंतन करण्याचे अनेक मंत्र आहेत.* तो परमात्मा मंगलरूप लोकोत्तम व शरण्यभूत असा आहे त्याला 'पंच-परमेष्ठी' असे ते म्हणतात. या पंचपरमेष्ठींना मुख्य मंत्र पंच 'ण' युक्त आहे तो असा 'णमो अरिहंताणम्। णमो सिद्धाणम्। णमो आइरि-याणम्। णमो उवज्झायाणम्। णमो लोए सव्वसाहूणम्।' पंच णकारात्मक महामंत्राच 'अरिहंतासिद्ध', 'असि-आ-उ-सा', 'अरिहन्त', 'सिद्ध' व 'ॐ' असे सहा, पांच, चार, दोन व एक अक्षरी मंत्र बनविले आहेत (गो. प्र. भा)

दुसरा सांप्रदाय म्हणजे बौद्ध साम्प्रदाय होय. या साम्प्रदायात हीनयान व महायान असे दोन पंथ आहेत. हीन-यानात पुन्हा अठरा उपपंथ आहेत. ह्या साम्प्रदायापैकीं हीन-यान हा पंथ दक्षिणापथ, सीलोन, यवद्वीप व बालीद्वीप या भागात प्रचलित झाला व महायान हा पंथ चीन, जपान, उत्तराखंड, वंगदेश, सयाम या देशात प्रसार पावला. महायान शाखेंत माध्यमिक व वज्रयान अगर मंत्रयान अशा दोन उपशाखा निघाल्या. मंत्रयान या शाखेचे नऊ भेद आहेत. पद्मसंभव नावाच्या ब्राह्मणानें तिबेटात जाऊन तेथें मंत्रयान या शाखेचा उपक्रम केला. मंत्रयानात मंडळरचना, बीज, न्यास, मंत्रजप, मुद्राप्रदर्शन, उपचार, अभिषेक व ध्यानादि विधि तंत्रशास्त्राप्रमाणेच प्रचारात आहेत. याची जास्त माहिती मंत्र व उपासना या प्रकरणात दिलेली आहे. मंत्र-यानातील मंत्र संस्कृत व पालीभाषेत आहेत. 'वज्र-वाराही' व 'तारा' अशा मुख्य देवता मानल्या आहेत. बौद्ध धर्मांत व वैदिक धर्मांत 'ॐकार' याला 'तार' असें म्हणतात. तेव्हा 'तार' ही पुमान् देवता व 'तारा' ही स्त्रीरूप देवता असें बौद्ध साम्प्रदायातील धर्मग्रंथात निर्दिष्ट केलें आहे. जशा महायानातील


बौद्ध धर्मातील एक महत्वाचें अष्ट धार-णात्मक प्रतीक

वज्रयान अगर मंत्रयान या शाखेंत वज्रवाराही व तारा अशा देवता आहेत, त्याप्रमाणें हीनयानात 'मणिमेखला' देवीची उपासना आहे. वज्रयानात अगर मंत्रयानात तारार्चन-चंद्रिका, तारा-पंचांग, तारा-सहस्रनाम, तारा-अष्टोत्तर शतनाम, तारा-त्रिशति ह्याच्या पाठाचे व पूजेचे क्रम सांगितलेले आहेत व हे सर्व पूजाक्रम व पूजाप्रकार तंत्रग्रंथात वर्णन केल्याप्रमाणेच आहेत.

जैन साम्प्रदाय व बौद्ध साम्प्रदाय याच्या साम्प्रदायातील वर्णन देण्याचा हेतु हाच आहे कीं, मंत्रविद्या ह्या दोन्ही साम्प्रदायात तंत्रमार्गांतूनच गेली आहे.

रुद्रयामल व ब्रह्मयामल यात असें सांगितलें आहे कीं, वसिष्ठमुनि

मानससरोवराजवळ नीलसरस्वतीची उपासना करण्यास गेले होते व तेथून सयामधील कामाख्या देवीची उपासना करण्यास गेले होते. ही गोष्ट साक्यमुनि ज्यास 'बुद्धदेवव' बुद्धधर्मस्थापक' म्हणतात, त्याच्या वेळची नव्हे. परंतु साक्यमुनींच्या पूर्वीही (जैनाच्या २४ तीर्थंकराप्रमाणें) २४ बुद्ध होऊन गेले त्याच्यावेळची असेल. नीलसरस्वतीची उपासना तिबेटात व चीनमध्यें अजूनही चालू आहे व मणिपद्मेची उपासनाही चालू आहे. नीलसरस्वतीचा मंत्र पुढें उत्तरार्धांत आहे व मणिपद्मेचा मंत्र 'हुं मणिपद्मे हुं'' [2] हा चुकीचा असावा. खरा मंत्र "ॐ मणिपद्मे ॐ" असा असावा. असो. याप्रमाणें इतर पथामध्येंही [1] मंत्रविद्या चालू आहे हेंच सांगण्याकरिता एवढा पाल्हाळ केला आहे.

आतापर्यंत वेद, अवेस्ता-गाथा, यांच्या धर्मग्रंथाबद्दल विचार केला. या दोन धर्मग्रंथात मंत्रविद्या आहे, मंत्रशास्त्र नाहीं, हें दाखविलें आहे अशा दोन धर्मग्रंथाचा विचार झाल्यानंतर महमदीयाच्या कुराणग्रंथातही मंत्रविद्या आहे हे पण येथें नमूद करीत आहे. जैनधर्म व बौद्धधर्म या धर्मांच्या ग्रंथात व त्या धर्मीयांच्या आचारात मंत्रविद्या आहे हे पण सिद्ध केलें आहे, परंतु वेद हे सुरांचे म्हणजे देवांचे ग्रंथ व अवेस्ता हे असुरांचे ग्रंथ आहेत. सुर म्हणजे देव व असुर यांचीं युद्धें झालीं यांचें वर्णन वेदांत

---

१. विनयतोष भट्टाचार्य यांच्या मतें गौतमबुद्ध स्वतः तांत्रिक तत्त्वाचा पुरस्कर्ता होता. '*मंजुश्री कल्प*' हा त्यांचा या विषयावरील पहिला ग्रंथ होता. शाक्यमुनि व मंजुश्री यांच्या संवादामधून या ग्रंथाची निर्मिती झाली. बुद्धोक्त अशीं नवीन तंत्रें संस्कृतांत आहेत. (देवीकोश-भाग २ पृ. ४१२—गो. प्र. भा.)

२. 'ॐ मणिपद्मे हुम्' सिक्कीम व भूतान येथील बौद्धलामा लोक असाच मंत्र म्हणून जप करतात. तिबेटमधील श्रेष्ठ लामाही असाच मंत्र जपतात. "You for ever" "Saffron Robe" "Third eye" by T L Rampa) ह्या ६०० वर्षांच्या लामाच्या या पुस्तकात असाच दिला आहे. (गो प्र. भा.)

असें आहे कीं, युद्धें संपल्यानंतर देवानीं पृथ्वीच्या निरनिराळ्या भागात म्हणजे आर्यावर्त, महाचीन, त्रिविष्टप (तिबेट) जंबुद्वीप वगैरे भागात वैदिक धर्माचा प्रचार होता तेथें वस्ती केली. असुरानीं असिरिया, इराण या भागाचें आक्रमण केलें. दनुजानी डान्यूब नदीच्या काठच्या प्रदेशाचें आक्रमण केले. पाताल म्हणजे अमेरिका वगैरे देशातही असुर गेले. पांडवानी अश्वमेधाच्या वेळीं पातालस्थ असुराना जिंकले, परंतु त्याच्याशीं सख्य केलें. व राजसूय यज्ञाचे वेळीं मयासुराकडून मयसभा बांधवून घेतली. असो. भारत वर्षांत किंवा आर्यावर्तांत वेद, उपनिषदें यांचे एकनिष्ठ भक्त व सेवक असे आर्य हे वर्णाश्रमधर्माचाराप्रमाणें वागत होते. असुर, दानव, दस्यू यास वर्णाश्रमधर्मआचार मान्य नव्हते. परंतु शिव, देवी, गणपति या देवतांच्या उपासना मात्र त्यांच्यात चालू होत्या. आज इतर सर्व जगात सनातनी हिंदु पद्धतीचा वर्णाश्रमधर्म मुळीं अस्तित्वात नसला तरी तो आर्यावर्तांत मात्र निकृष्ट स्थितींत तरी पाळला जात आहे. वर्णाश्रमधर्माचरण व त्याचे नियम कडक आहेत. त्यामुळें ह्या आर्यावर्तांत चार्वाक, सौत्रांतिक, जैन, बौद्ध असे सांप्रदाय निघाले. यापैकीं जैन व बौद्ध सांप्रदायातील मंत्राबद्दल असलेली माहिती मागील स्तंभात देण्यात आली आहे.

चीनमध्यें महायान या बौद्धपंथाचा प्रचार झाल्यानंतर त्यातूनच 'कन्फ्यूशस' व 'ताऊ' वा 'ताओ' हे दोन उपपंथ निघाले. त्यापैकीं 'कन्फ्यूशस' या पंथप्रवर्तकानें व्यक्तीचा व वैश्विक चिच्छक्तीचा विशेष संबंध असून तीच वैश्विक चिच्छक्ति सर्व प्राणिमात्रांची नियामक शक्ति आहे असें प्रतिपादन करून त्या शक्तीचें प्रतीक म्हणून सोबत दर्शविलेलें प्रतीक बनवून व मानून हे उपासनांत रूढ केलें (Great Religions of the World—Life International Book Co.—गो. प्र. भा.)



वैश्विक शक्तीचें चिनी प्रतीक

## (ई) इस्लामी सांप्रदायांतील मंत्र व उपासना (गो. प्र. भावे)

इस्लामी एकेश्वरी तत्त्व प्रतीक



'अल्लाहो अकबर'

जगातील सर्व धर्मांमध्ये अगदी अलीकडचा असा इस्लामी धर्म (व त्यांतील सांप्रदाय) हा आहे. त्यांत पोटभेद म्हणजे उपसांप्रदाय आहेत. त्यापैकी 'सूफी' सांप्रदाय हा त्यातल्यात्यात जास्त अध्यात्मप्रवण आहे. त्याचे आचार व विचार ह्याचा पाया मानवी मानसशास्त्र व थोडीबहुत अतिमानस दृष्टि हा आहे.

इस्लाम धर्मी लोक जरी मूर्तिपूजक नाहींत, तथापि त्याचा दर्गा, इदगा वा मशीद ह्यामध्ये एक लहानशी जागा वा स्थान हे एक प्रकारचें प्रतीकरूप परमेश्वराचे स्थान वा जागा मानिली जाते. 'मक्का' ह्या त्या मूळच्या धर्मस्थानी 'काबा'[1] हा काळा पवित्र

---

१. हा एक काळ्या उत्कृष्ट पाषाणाचा स्तंभ आहे. प्राचीनकाळी अरबस्तान ह्या भागात शिवलिंगपूजा फार होती. 'काबा' हें एक शिवलिंगच होतें. दक्षिण भारतातील लोकांच्या तिकडे वसाहती होत्या. त्याबरोबर शिवलिंग पूजाही तिकडे गेली 'अरबस्तान' यापैकीं 'अरब' हा शब्द द्राविडी भाषीय आहे. अरबी लिपीचें वळणही द्राविडी वळणाचें आहे. (Shastri-Dravidian Culture Vol I & II)
तसेच 'काबा' ह्या स्तंभावर त्याच्या एका बाजूच्या भिंतीवर सुवर्णाक्षरांनीं वेदमंत्र अरबी वा द्राविडी लिपीत लिहिलेले आहेत. त्यांना तसेच 'काबा' या स्तंभाला शंकरप्रिय अशीं पांढरी वा गुलाबी फुलेंच वहातात. 'काबा'चे फोटो अनेक इंग्रजी मासिकांतून प्रसिद्ध झालेले आहे. ही मूर्तिपूजा नव्हे का? गो. प्र. भा.)
*गुलाशरीफ* इस्लामी सांप्रदायापैकीं कांहीं पंथात 'गुलाशरीफ' नावाचा हिंदु धर्मीय 'सत्यनारायणा'सारखा एक विधि आहे. त्या विधींत पूजाप्रतीक म्हणून कनररत्ना हरितरत्नमंडित अशी वस्तुरचना केलेली असून तिची यथाविधि पूजा केलेली असते व सत्यनारायणाप्रमाणें गोष्टी वाचिल्या जातात. ही प्रतीकोपासना नव्हे का? (गो. प्र. भा.)

स्तंभरूप भाग सर्व श्रेष्ठ असें प्रतीकच आहे. सर्वत्र एकच परमेश्वर आहे हा एकेश्वर वादच इस्लामीयांचें ध्येय व धर्मतत्त्व आहे. त्यांच्यांत परधर्म-सहिष्णुता हें तत्त्व नाहीं. धार्मिक बाबतींत व्यक्तीला मानसिक स्वातंत्र्य नाहीं. इतर धर्मीयांप्रमाणें इस्लामचें तसें प्रतीकही आहेच. त्याचें अक्षर-रूपचिन्ह वर दिलें आहे.

सूफीपंथाचा 'हु अल्लाह हु' हा अत्यंत श्रेष्ठ व प्रिय मंत्र आहे. त्यांच्या उपासनासाधनेचे मुख्य चार आधारस्तंभ आहेत. ते असे. *शरीअत, तरीकत, मारीफ़त व हक़ीक़त* त्याचें थोडक्यात स्वरूप असें : *१ शरीअत* यांत अन्तःकरणशुद्धता व शुद्ध विचार यावर जोर असतो–नमाज–जकात (दान) सौम (उपवास-रोजा) व हज हे मुख्य आचार भाग आहेत. त्यांची मंत्रजप पद्धति स्मरण-उच्चारण-मोठ्यानें-मनांत वा श्वासावर ध्यान ह्यांना धरून आहे. २. *तरीकत*–यांत गुर्वाज्ञा पालन, इंद्रियनिग्रह व मौन ह्यावर जोर असतो. ३. *मारीफ़त*–यांत अनुभवावर जोर दिला जातो. तौबा (अनुताप) जहद (वैराग्य) सब्र (संतोष) शुक्र (कृतज्ञता) रिआज (इंद्रियदमन) तवक्कुल (परमेश्वरावरच पूर्ण भरंवसा) रजा (देव व व्यक्ति यांचें इच्छैक्य) या सात पायऱ्यांना अभ्यास करावाच लागतो. ४. *हक़ीक़त*–यांत ईश्वराशीं ऐक्यत्व हें तत्त्व अनुभवयाचें असते. (सूफ़ीयों की 'उपासना रहस्य' श्रीकृष्णदत्त भट्ट).

*इस्लामी मंत्रविधि व विधान :* इस्लामी धर्मीयांत शिया व सुनी हे दोन मुख्य पंथ आहेत. शिया पंथी बहुसंख्य असून सुनी पंथी अल्पसंख्यांक आहेत. शिया पंथीयामध्यें उपपंथ आहेतच. मुहम्मद हा ईश्वराचा पैगंबर आहे, कुराण हा त्याचा मुख्य धर्मग्रंथ असून खुदा म्हणजे ईश्वर ज्याला ते 'अल्लाह' (याचा अर्थ 'सर्व श्रेष्ठ') म्हणतात, तो एकच असून त्याशिवाय इतर दुसरा कोणताही 'देव' नाहीं. (ख्रिस्ती-ईसाई पण 'येशू' हा एकच देव मानितात.) या गोष्टीबद्दल सर्व इस्लामीयांची एक-वाक्यता आहे.

तसेंच प्रत्येक इस्लामी सहा सिद्धांत व चार कर्मकांडीय आज्ञा प्रमाण म्हणून मानितो. ते ६ *ईमान* म्हणजे सिद्धांत असे आहेत :–१ खुदा एकच आहे (२) मुहम्मद हा त्याचा एकच पैगम्बर, (३) त्याचे फरिश्ते–पंथ प्रचारक आहेत (४) कुराण हाच एक मुख्य आहे. धर्मग्रंथ (५) खुदा सर्वशक्तिमान आहे व (६) मृत्यूनंतर न्याय मिळण्याचा एक दिवस आहे. त्यांच्या 'दीन' म्हणजे कर्मकाण्डीय आज्ञा चार आहेत. त्या अशाः—(१) नमाज–म्हणजे उपासना, (२) रोजा–ठराविक काळांतील उपवास, (३) जकात व (४) हज-मक्केची यात्रा. प्रार्थनेला 'रकोह' म्हणतात. हिंदूंची जशी 'गायत्री' तशी त्यांचा 'कलमा' म्हणजे गायत्री आहे. कलमाचीं पांच अंगे आहेत. नमाजातील 'अजाँ' म्हणजे मंत्र सात आहेत. ते सात मंत्र (अजाँ) हे आहेत. (१) 'अल्लाहु अक्बर, अल्लाहु अक्बर' (अल्ला सर्व श्रेष्ठ आहे.) (२) 'अशदु अल्‌ला इलाह, इल्लाह' असें २ दां म्हणणें (अल्लाशिवाय दुसरा कोणीही तसा लायक नाहीं असा, माझा विश्वास आहे. (३) 'अशहदु अन्न मुहम्मदुर रसूलल्लाह' असें २ वेळां म्हणणें. (मुहम्मद हा अल्लाचा रसूल–पैगम्बर आहे.) (४) 'हय्य अल्ला रसोलात'–असें २ वेळां (नमाजाला याच.) (५) 'हय्य अलल् फलाह' दोन वेळां म्हणणें (खऱ्या कर्मासाठीं एकत्र या.) (६) 'अल्लाहु अक्बर'–२ दां म्हणणें (७) 'ला इलाह इल्लाह' (अल्लाशिवाय इतर कोणीही लायक—मअब्बूद–नाहीं). पांच व सहा या मंत्रांमध्यें 'अस्सोलातु खैरुम् मिनन्नौम' (निद्रेपेक्षां नमाज चांगला) असेंही म्हणतात.

*विधिविधान :* सर्व मंत्र ठराविक पद्धतीनें व आवाजानेंच म्हटले पाहिजेत तर ते फलप्रद होतात. (हिंदु मंत्राचें असेंच आहे.) ते ठराविक जागीं व ठराविक वेळीं म्हणावे, तसेंच त्याची पद्धति म्हणजे नमाज पडण्याची रीत-प्रकार ठरावीकच आहे,— आठ प्रकारची ऊठ बस. देहशुद्धि, स्थानशुद्धि, आसन व मनशुद्धि करूनच उपासना केली पाहिजे. अशी त्यांची प्रथा आहे. मशीदी व बुद्धदेवालयें यांत प्रथमतः देहशुद्धीची

सोय असते. व्यवहारोपयोगी हेतुसिद्धीसाठीं ताईत, दोरे, गंडे इत्यादि पद्धति मागाहून त्या धर्मांत आल्या. इतर धर्मीयांच्या 'यंत्रां'प्रमाणें ईशशक्तीचीं प्रतीकें इस्लामीयांत नाहींत. कारण ती एक प्रकारची मूर्तिपूजा होते. म्हणून इस्लाम हा मूर्तिपूजक धर्म नाहीं असें ते समजतात हें जरी खरें आहे तरी मक्का येथील 'काबा' हा काळवत्री दगड सुवर्णाक्षरलिखित स्तंभ किंवा लिंग असून तें सर्व इस्लामीयांचें एकच प्रतीक तरी आहेच. इस्लामी निशाणावरील चांद व तारा किंवा 'अल्लाहु अक्बर' हा लिखित मुद्रा हीं प्रतीकेंच आहेत, असें नव्हे का?

सारांश सर्व मानवांच्या धर्मांत मंत्र, तंत्र व त्यांचीं प्रतीकें हीं आहेतच हें स्पष्ट आहे.

## (उ) याहुदी व नवख्रिस्ती (गो. प्र. भावे)

स्थूलमानानें बोलावयाचें म्हणजे याहुदी व नवख्रिस्ती हे सर्व एकेश्वरवादी उपासक व पूजक आहेत. फरक इतकाच कीं, याहुदी हे संत मुसाच्या विचारप्रणालीला शिरोधार्य मानून चालणारे व नवख्रिस्ती हे इतर संतांच्या विचारांनां मान देऊन येशूच्या विचारांचें व आज्ञांचें पालन करणारे आहेत. याहुदी लोकांत इतर ख्रिस्तानुयायांपेक्षां पंथभेद वा सांप्रदाय फार कमी. नवख्रिस्तीयांमध्यें पुराणमतवादी, नवमतवादी, ल्युथरवादी, पूर्वीचे ख्रिस्तिवादी, इ. इ. सांप्रदाय आहेत. ते सर्व ख्रिस्ती जगद्गुरु जो मुख्य पोप (इटालीमधील 'व्हॅटिकन' या ठिकाणचा) याला मान देणारे व त्याच्या आज्ञा या मतें मानणारे आहेत. 'बायबल' हा यांचा वेदग्रंथ आहे.

ख्रिस्ति धर्मीयांचे



सामान्य प्रतीकचिन्ह 'क्रॉसचें'

या सर्व ख्रिस्तानुयायांमध्यें मंत्र व जप हा क्रिया कटेकोरपणानें पाळणारेही लोक आहेत. 'क्रॉस' हें चिन्ह सर्व ख्रिस्तपंथी पवित्र

मानितात, त्यांतील सनातनवादी लोक तें धारणही करितात 'प्रॉटेस्टंट' वा त्यांतील उपपंथ म्हणजे ठिकठिकाणचे धर्मपीठानुयायी (जसे बॅपटिस्ट, प्रेस्बिटेरियन, एपिस्कोपेलियन इत्यादि) 'क्रॉस' या येशू ख्रिस्ताच्या प्रतीकालाही पवित्र समाजात; तें 'चिन्ह' संकटनाशक व संरक्षक आहे असें समजून धारण करितात, प्रसंगविशेषीं त्या आकाराची हातांनीं मुद्राही करितात. एवढेंच नव्हे तर ख्रिस्ती माणूस मृत झाल्यावरही, त्याला पुरतात तेथेंही तें चिन्ह, तसा 'क्रॉस' उभा पुरून ठेवितात. निधर्मी समजल्या जाणाऱ्या देशांतही तसा क्रॉस मृताच्या जागेंत पुरण्याची प्रथा आहे. ख्रिस्ताची पवित्र माता 'मेरी' हिची प्रार्थना वा उपासना करितांना तें प्रतीक जवळ बाळगितात–सारांश, 'क्रॉस' हें *ख्रिस्तानुयायांच्या एकेश्वरीपंथाच्या देवतेचें प्रतीक आहे* असें ठरतें.

याहुदी लोकांतही अनेक प्रकारचे व अनेक कारणांसाठीं—मुख्यतः व्यावहारिक अडचणींवरील उपाय म्हणून—अनेक मंत्र असून त्यांचीं प्रतीकें म्हणजे यंत्रें आहेत. सोबत दिलेलें हें एक त्यापैकीं महत्त्वाचें प्रतीक आहे. दुसरें प्रतीक आम्हां हिंदुधर्मीयांच्या त्रिशूला-प्रमाणें पण चतुःशूलात्मक असून तेंही संरक्षक प्रतीक मानिलें जातें. इस्रायल ही याहुदी लोकांची मातृभूमि असून 'जेरूसलेम'—येरूसलेम हें त्यांचेंही एक सर्वश्रेष्ठ यात्रास्थान व पवित्र ठिकाण आहे. हें ठिकाण इस्लामीयांचेंही एक महत्त्वाचें पवित्र ठिकाण आहे. 'War of Roses' हीं अनेक वर्षे चाललेलीं मध्ययुगकालीन युरोपियनांचीं धर्मयुद्धें याच 'जेरूसलेम'च्या मालकीसाठीं होतीं. आजही (१९७०) इस्रायल विरुद्ध लढ्यांत या ठिकाणावरील हक्क हें एक कारण आहेच.


याहुदी यहोवाह (Jehova) पंथीयाचें प्रतीक

याहुदी धर्म येशू ख्रिस्तापूर्वीपासून चालत आलेला धर्मसंप्रदाय आहे. यहोवाह (Jehova) हा त्यांचा मूळचा देव. त्यानें धार्मिक आज्ञा म्हणून

दहा धर्माचार म्हणजे आज्ञा मजपाशीं करार करून दिल्या आहेत. त्याचेंच तुम्ही आचरण करावें असे सागून त्याचा प्रचार करणारा सत 'मूसा' हा पुढें आला व तोच याहुद्याचा देव मानिला गेला व मानिला जातो. त्याच्या दहा आज्ञाना (Ten Commandments) 'जुना करार' म्हणतात. याहुदी या आज्ञा शिरोधार्य धर्म म्हणून मानितात. येशूच्या बायबलाचे उपदेशक आज्ञाना 'नवकरार' New Testament म्हणतात. याहुदी धर्मात प्राणिपूजा (Totemism) व पितृपूजाही होती देव यहोवाह किंवा 'याहू' या नावावरून या पथीयाना याहुदी (यहुदी) असें म्हणतात. त्याचें सर्व वाङ्मय 'हिब्रू' या भाषेत आहे.

साराश, पश्चिम आशिया या भौगोलिक विभागात (ज्याला सर्व पाश्चिमात्य खिस्तानुयायी 'मध्यपूर्व'– 'Middle East' असें विशिष्ट राजकीय दृष्टीचें नाव देतात त्या भूभागांत) मूसा, येशू व मोहम्मद पैगबर हे तीन मोठे धर्मसस्थापक व प्रवर्तक होऊन गेले, ते सर्व परमेश्वराचे एकेकच प्रेषित म्हणून घोषवून त्यानी महापरमात्म्याच्या अनेक विभूति-वादाविरुद्ध वड पुकारून केवळ प्रेषितप्रेरित एकेश्वरी पथ निर्माण करून त्या प्रत्येकानें प्रथमत आशियाखडाच्या पश्चिम भागात आपापल्या प्रेषितप्रेरित एकेश्वरी पथाचा प्रसार केला इस्लामी प्रेषितप्रेरित एकेश्वरी पथानें, त्याचें उगमस्थान जें मक्का, त्याच्या पूर्वेकडील भूभागा तही प्रचाराचा धूमधडाका चालविला. त्याचे खालीं दिलेले परिणाम घडले –

(१) पश्चिमेकडील तीनही एकेश्वरी धर्मपथीयामध्यें अनेक शतकें-पर्यंत रक्तपातपरिणामी धर्मस्थानासबधें झगडे झाले व अजूनही होत आहेत.

(२) ते एकेश्वरीवादी असूनही प्रत्येकाचें ईश्वरोपासनेला व निष्ठेला सहाय्यभूत असें परमेश्वराचें प्रतीक मात्र एकच न राहातां भिन्नभिन्नच राहिलें आहे.

(३) त्यांचे पूर्वीचे *उपासनामंत्र* व त्यांचीं *तंत्रें हींपण* एकच *न होतां भिन्नभिन्न राहिलीं आहेत.*

(४) इस्लामी धर्मप्रचाराची पद्धति इतर पश्चिमी एकेश्वरी पंथप्रचाराप्रमाणें शांतताप्रधान नसून दंडेलीप्रधान आक्रामक स्वरूपाची होती व अजूनही ती प्रवृत्ति मावळलेली आहे असें दिसत नाहीं.

(५) मक्केच्या पूर्वेकडील आशियाच्या भागांतील भारतवर्ष ह्या भागांत पश्चिमेकडील तीनही पंथापूर्वींपासून *'सनातन वैदिक धर्म'* नांवाचा महापरमेश्वराच्या अनेक विभूति मानून त्या सर्वांत एकच परमात्मा मानणारा *अद्वैतवादी धर्म*—एकांत अनतत्व व अनतांत एकत्व पाहाणारा, मानणारा व आचरणारा धर्म—चालू होता. त्याचे अंतिम ध्येय 'कृण्वंतु विश्वमार्यम्' असें होतें व आहे, तरी त्याचे व्यवहार 'आक्रामक' स्वरूपाचे मुळींच नव्हते व नाहीत. एवढेंच नव्हे तर धार्मिक बाबतीत प्रत्येक व्यक्तीला आचार, विचार व उच्चार ह्यांत पूर्ण स्वातंत्र्य होतें व आहे, याचा अर्थ धर्म-बाबतींत आम्ही भारतीय संपूर्ण लोकशाही वृत्तीचे (Democratic) होतो व आहों असें सिद्ध होतें. इतर एकेश्वरी धर्मांप्रमाणें अरेरावी वृत्तीचे Autocratic नाहीं.

यामुळें इस्लामी धार्मिक आक्रामक वृत्तीशीं झगडतांना—प्रारंभीं त्यांच्या हिंसात्मक प्रचाराशीं झगडतांना—दु:खें भोगावीं लागलीं तरी अखेरीस त्यानें इस्लामी प्रवृत्ति जिरवून पचवून टाकिली व पुनः वर भारतीयत्व शिल्लक ठेविलेंच! भारतीय सनातन वैदिकधर्म *जागतिक धर्म* होण्याला

---

१. गेल्या पन्नास वर्षांत इराणात "बाह-ओ-अल्ला" हा व्यापक—स्वरूपाचा एकेश्वरी पंथ उत्पन्न होऊन त्याचा प्रसार त्या भागांत थोडाफार झाला. तसा भारतांतही अल्प प्रमाणात झाला आहे. त्याचा मूळ प्रेषित प्रचारक 'बाह-ओ-उद्दिन—हा आहे. ते सत्पथीय लोक आक्रमक व हिंसात्मक नाहींत. ह्या पथाला "बहाइाण" पंथ म्हणतात! (गो. प्र. भा.)

योग्य असा आहे. पण 'कृण्वन्तु विश्वमार्यम्' हें धोरण आक्रमक स्वरूपाचें नसल्यानें तें प्रसारक-प्रचारक होत नाहीं! त्यांतही दुःखाची गोष्ट ही कीं, आमची धार्मिकवृत्ति आत्मसंरक्षकही राहिली नाहीं! यामुळें आमचें संख्याबल कमी होत चाललें!!

□ □

# पूर्वार्ध-उपसंहार

प्रस्तुत कालीं 'राजा कालस्य कारणं' यामुळें अगर जीवनार्थ कलह उग्रतम झाल्यामुळें त्रैवर्णिकांपैकीं क्षत्रिय व वैश्य (मारवाडी वैश्य खेरीज करून) या वर्णांतील पुरुषांच्या ठायीं संस्कारलोपच झाला आहे. ब्राह्मणवर्गांत निदान अजूनही लाजेकाजेस्तव विश्वास नसतांनाही व्रतबंध, विवाह व अंत्येष्टि हे संस्कार वैदिक विधीनें होत आहेत. व्रतबंध झाल्यानंतर यज्ञोपवीत गळ्यांत असावें लागतें व वर्षातून 'श्रावणी' म्हणजे यज्ञोपवीत संस्कार तरी करावा लागतो. तोही संस्कार नकोसा झालेला आहे. त्या श्रावणींत 'उत्सृष्टा वै वेदाः' असें वाक्य येतें व नंतर सहा महिन्यांनीं अनध्याय संपल्यावर पुन्हां वेदपठण सुरू करावें असें विधान आहे. परंतु व्रतबंधाचे दिवशीं गायत्रीमंत्राचा उपदेश झाल्याबरोबर दुसऱ्या दिवसापासून गायत्री मंत्र, संध्या व उपनीत वटु यांची ताटातूट होते! गायत्रीमंत्र तर बरोबर म्हणतां येत नसतोच. परंतु गोत्र, प्रवर, शाखा व वेद यांचीही ओळख राहत नाहीं. अशा प्रकारची ब्राह्मणवर्गीय प्रजा आज दिसून येत आहे.

अशा वेळीं संध्या व गायत्रीजप करण्याची इच्छा असणारे थोडेच मानव सांपडतील. अशा भाविक लोकांत आचारशास्त्राची माहिती नसल्यानें समुद्रयान, अग्निरथयान अथवा आशुयानरथ (मोटर), वायुयान (विमान) यांच्या साह्यानें प्रवास करण्याचे प्रसंग वारंवार येत असतात, व संध्यादि कर्मांकरितां जलाभाव असल्यानें गायत्रीजप किंवा संध्यावंदन ही क्रिया

तितक्या प्रवासाच्या काळात लोप पावतात. अशा वेळीं संध्याकाल प्राप्त झाला तर सध्यावदन कसें करावें व गायत्रीजप कसा करावा ही माहिती भाविकास व्हावयास पाहिजे. काळ अनुकूल असून शारीरिक व मानसिक स्वास्थ्य असूनही आळसानें किंवा पाश्चिमात्य शिक्षणानें हिरण्यकशिपूचे अवतार म्हणजे ईश्वरास्तिक्याच्यावदल साशक असलेल्याकरिता हा प्रयत्न नाहींच नाहीं.

असो. पाराशर स्मृतीमध्यें (कलौ पाराशर स्मृत) 'जलाभावे दक्षिण कर्णं स्पृश्येत्' असें वाक्य आहे. म्हणजे प्रवासात सध्यावदनाकरिता जलाभाव असल्यास दक्षिण कर्णाला स्पर्श करून तेथून जल आलें अशी भावना करून खालील श्लोक म्हणावे--

नमः शिवायै गंगायै शिवाय च नमोनमः ।
नमस्त्रिपथगामिन्यै विश्वमूर्त्यै नमोनमः ॥
इडा भगवती गंगा पिंगला यमुना नदी ।
तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती ॥
ज्ञानहृदये ध्यानजले रागद्वेष मलापहे ।
यः स्नाति मानसे तीर्थे सः याति परमां गतिम् ॥

वरील श्लोक अर्थ समजून म्हटले म्हणजे स्नान झाले असें होतें. यानंतर सर्व सध्या, अर्घ्यप्रदान, जप, सूर्योपस्थान हीं सर्व कर्मे मानसिक करावीं. त्यामुळें स्पर्शादिक जलाभावादिक सर्व दोष नष्ट पावतात, व अशा प्रकारें कर्म करणाऱ्याचें सर्व कर्म सुव्यवस्थित झाल्यासारखें वाटतें.

उपासनं स्नानसंध्या पूजापारायणादिकं ।
तेषु मुख्यतमस्त्वेव जप (गायत्रीजप) एवं न संशयः ॥
देहे प्राणो यथा मुख्यः तस्योपास्त्या यथं स्मृताः ।
साधकः सर्वदा तेन जपं कुर्यात् समाहितः ॥
अत आपत्सु जपतः एवं सर्वं कृतं भवेत् ।
आपत्स्विथ रोगेषु पथि कार्यान्तरेषु च ॥

यथाशक्ति जपं कुर्यात् तेन दोषो न विद्यते ।
कर्मलोपस्य दोषो न स्यादापत्तिमुखेषु ते ॥—श्रीभास्करराय

शेवटी जगन्नियंत्री आदिशक्ति वेदमाता गायत्री देवी इजला प्रार्थना कीं मागील चार ओळी वाचून वाचकांच्या मनांत धर्मश्रद्धा व आचारतत्परता उत्पन्न व्हावी. भारतवर्षीयांची धार्मिक व राजकीय उन्नति व्हावी. व ती उन्नति होण्याकरितां आर्यपुत्र व आर्यकन्या यांच्या ठायीं पूर्वजांच्या सद्गुणांचें अनुकरण करण्याची प्रेरणा व्हावी, परंपरया आर्यसंस्कृति दृढमूल व्हावी व अंतीं ते तव पदरजीं मिलिंदायमान होऊन मोक्ष सुखानुभवी व्हावे हें वरदान द्यावें.

'सहनाववतु सह नो भुनक्तु सहवीर्यं करवावहै.'

समाप्त

▫ ▫

## अनुक्रम

# १ अनुभूत व अनुभाव्य वेदमंत्र

सदरहू प्रकरणात मुख्यत ऋग्वेद व अथर्वणवेद यातील अनुभाव्य मत्र व त्याचा उपयोग हे दर्शविले आहेत मत्रशास्त्रपूर्वार्धांतही या दोन्ही वेदातील काही अनुभूत मत्र, त्याचे विधि व विनियोग हे दिलेले असल्याने ते येथे घेतलेले नाहीत यजुर्वेदातील काही मत्र पूर्वार्धांत घेतलेले आहेत मत्रशास्त्राच्या पूर्वीच्या एका आवृत्तींत यजुर्वेद व सामवेद यातील काही अनुभाव्य मत्र दिलेले होते, पण त्यातील स्वराची शुद्धाशुद्धता (अर्थात छापील प्रतींत) ठीक न वाटल्यामुळे, तसेच त्याच्या विनियोगाचा नीटसा उलगडा न झाल्यामुळे खुद्द प्रवक्ता श्री योगेश्वरानद यानी ते मत्र वगळले तरी हरकत नाही असे सागितले होते सबब ते या प्रकरणात दिले नाहीत

पूर्वार्धात मत्र व उपासना या प्रकरणात मत्र सिद्ध होऊन या करून त्याचा अनुभव येण्यासाठी 'पुरश्चरणविधान' म्हणून माहिती दिलेली आहे ती वेदोक्त मत्रासाठीच नसून इतर आगमोक्त वा तत्रशास्त्रातील मत्रानाही थोड्याफार भेदाने लागू आहे देवदेवताच्या मत्रानाही ते विधिविधान जरूर आहे देवीपुराण, देवी भागवत, अग्निपुराण इत्यादि ग्रथात अनेक प्रकारचे मत्र व त्यांची साधना सागितलेली आहे तीच क्रिया वा पद्धति 'सप्तशती व श्रीसूक्त' इत्यादि ग्रथातील मंत्राना-(ते सिद्ध होण्यासाठीहि) अवश्य व उपयोगी आहे तथापि सप्तशती व श्रीसूक्त (श्री विषयीचे सूक्त) यातील मत्राच्या उपयोगासाठी हेतुभिन्नत्वाप्रमाणे

निरनिराळें विधिविधान सांगितलेलें आहे. तें पुढें त्या त्या प्रकरणात दिलेले आहे.

(गो. प्र. भा.)

## १ ऋग्वेदीय – अनुभाव्य मंत्र

पूर्वार्धामध्ये वेदमत्र व त्याचे विनियोग ही माहिती दिली. त्याचप्रमाणे आणखी काहीं अनुभाव्य मत्र व त्याचा उपयोग ह्या गोष्टी येथें दिल्या आहेत

**१ परान्नदोषनाश व अन्नवृद्धि**

**पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् ।**
**यस्य त्रितो व्योजसा वृत्रं विपर्वमर्दयत् ॥**

२ – ६ सुक्तें – ऋषि – अगस्त्य
२ – ६ सूक्ते
अन्नस्तुति – १ अनुष्टुप् – २ – ४ – ८ – १०

**छंद — गायत्री**

हीं सूक्तें ११ ऋचाचीं आहेत. त्यामुळे परान्नदोष नाहींसा तर होतोच पण उलट अन्नवृद्धि पण होते.

**२ रोग व मृत्युपरिहार व वाक्सिद्ध**

४ – ३ – १ सूक्त
**प्रयुंजती-प्रतिरथ – विश्वेदेव – त्रिष्टुभ्**
**हें सूक्त सात ऋचांचें आहे –**

करवीर पुष्पानी एक हजार गायत्रीमत्रानी होम केला तर रोगाचा परिहार होतो व प्रत्यक्ष मृत्यु परत फिरतो.

३ ऋणनाश

१–२–१३ कस्येति मंत्र

शुनःश्येप प्रजापति–त्रिष्टुभ्

हा मंत्र ५ ऋचांचा आहे. तीन हजार होम–*ऋणनाश*

४ देवतावश

१–१–३ वायवायादि सूक्त

मधुच्छंद–वायु–गायत्री

हें नऊ ऋचांचें सूक्त आहे. दररोज एक वेळ म्हटल्यास देवता वश होतात.

५ आयुष्यवृद्धि

५–६–२५ त्रिर्देव मंत्र–वसिष्ट–विष्णु–त्रिष्टुभ्

त्रिर्देवः पृथिवीमेष एतां वि चक्रमे शतर्चसं महित्वा ।
प्र विष्णुरस्तु तवसस्तवीयान्त्वेषं ह्यस्य स्थविरस्य नाम ॥

विष्णुसन्निध म्हटल्यास आयुष्य वृद्धि होते; नुसतें म्हटल्यास डोकें दुखणें थांबतें.

६ सुखी जीवन

४–४–२ वरुणो सूक्त

वरुणं वो रिशादसमृचा मित्रं हवामहे ।
परि व्रजेव बाह्वोर्जगन्वांसा स्वर्णरम् ॥

आठ ऋचा आहेत. पहिला मंत्र.

आवळीचे मुळाशीं बसून दहा हजार वेळां जपावें. सर्व प्रकारच्या तापाचा उपशम होऊन सर्व रोग परिहार होऊन मनुष्य जगांत सुखी नांदतो.

७ पापमुक्ति

२-७-१६ आतपितर्अपेत्सूक्त – गृत्समद – रुद्रत्रिष्टुभ्

**आ ते पितर्मरुतां सुम्नमेतु मा नः सूर्यस्य संदृशो युयोथाः।**
**अभि नो वीरो अर्वति क्षमेत प्र जायेमहि रुद्र प्रजाभिः॥**

पाच ऋचा आहेत. पहिला मत्र शिवालयात एक लक्ष वेळा जपावा. महानिपाचा परिहार होऊन सर्व पापापासून मुक्त होतो.

८ मातृभावोत्पत्ति

८-८-२४ प्रसूनवा – सूक्तम् – सूनुऋभु – अग्नि – गायत्रि अनुष्टुप्

**प्र सूनव ऋभूणां बृहन्नवन्त वृजना।**
**क्षामा ये विश्वधायसोऽश्नन्धेनुं न मातरम्॥**

चार ऋचा, पहिला मत्र. हा मत्र शिवालयात तीस हजार जपला असता सर्व स्त्रियाचे ठायीं मातृभाव राहील, अन्यबुद्धि उद्भवणार नाहीं.

९ कुस्वप्न सुस्वप्न

२-७-१० यो मे राजन् मत्र — गृत्समद-वरुण त्रिष्टुभ्

**यो मे राजन् युज्यो वा सखा वा स्वप्ने भयं भीरवे मह्यमाह।**
**स्तेनो वा यो दिप्सति नो वृको वा त्वं तस्माद्वरुण पाह्यस्मान्॥**

हा मत्र पाच ऋचाचा आहे त्यातील शेवटची ऋचा.

ह्या मत्राचा एक हजार आठ जप केला असता वाईट स्वप्न पडलें तर तें सुस्वप्न होतें.

१० भगंदर रोग परिहार

६-२-९ ईळिष्वाहि – मत्र – निश्वनमस् – अग्नि – उष्णिक्.

विष्णुमदिरात तीस हजार जप करावा, भगदर रोग बरा होतो, पाण्यात उभें राहून जपावें.

११ निर्वैरत्ता

८-८-३७ उत्तिष्ठ – मत्र – शिबि – प्रतर्दन – इंद्र – त्रिष्टुभ्

ऑगस्ट १९६९. यान दिव्यज्ञानाचे व गणिताचे अनेक पुरावे दिलेले आहेत. त्याची सत्यासत्यता आम्ही केव्हा अजमावणार ?

(ए) **ग्रहगोलकाचे परस्पराकर्षण** : हे पण माहीत होते. कारण सूर्यचंद्रादि तारकापुंज मेषादि बारा राशींमधून परस्पराकर्षण कक्षेतूनच फिरतात. इतकेंच नाही तर त्यांच्या आकर्षणाचे परिणाम पृथ्वीवरील सर्व वस्तुजातावर होतात, हे 'गामाविश्य च भूतानि धारयाम्यह-मोजसा। पुष्णामि चौषधी सर्वा सोमो भूत्वा रसात्मक (१५।१३) या श्लोकावरून समजते.

(ऐ) **पृथ्वीचा गोलाकार व भ्रमण** : आर्यभट्ट नावाचा ज्योतिषी पाचव्या शतकात होऊन गेला. वयाच्या तेविसाव्या वर्षी पृथ्वी स्वत भोवती फिरत फिरत सूर्याभोंवतीही फिरते हा शोध त्याने लाविला. तो म्हणतो ... 'भूपजरस्थिरो भूरेवावृत्यावृत्य प्रतिदिवसको — उदयास्तमया सपादयति नक्षत्र ग्रहाणाम्'

ऐतरेय ब्राह्मणात सूर्योदयाबद्दल असे म्हटल आहे — 'स वा एष न कदाचनास्तमेति नो देति' म्हणजे सूर्याला उदय वा अस्त ह्या क्रिया नसून पृथ्वी गोल असून ती अवकाशात आधाराविना आहे ऋग्वेदातही पृथ्वी सपाट नसून गोल आहे म्हणूनच सूर्यकिरण तिजवर एकाच वेळी सर्वत्र पडत नाहीत, असे स्पष्ट सांगितलेले आहे.

(ओ) **गुरुत्वाकर्षणाचा शोध**[1] : वरील एका स्तंभात सूर्यमंडल-मधील ग्रहाग्रहात परस्पराकर्षण असून त्यामुळेच ते ठराविक काळात व

---

१. समुद्रगुप्ताच्या काळात पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाची व नवग्रहांची परस्परा-कर्षणशक्ति सर्वसामान्य लोकांनाही माहीत होती. तसेच मय संस्कृतीच्या इतिहासात पृथ्वीचे एक वर्ष ३६५.७४२० दिवसाचें आहे व आज पाश्चिमात्य गणिताप्रमाणे हे वर्ष ३६५.२४२२ दिवसाच समजतात. मय संस्कृति १० हजार वर्षापूर्वीची समजतात (Ariel-Febr १९७० ई इस्रायल Tel Aviv येथून निघणार त्रैमासिक आहे.)

ठराविक पद्धतीनेच सूर्याभोवतीं फिरतात असे सांगितलें पण पुनः भास्कराचार्यांनी बाराव्या शतकांत तेंच स्पष्ट शब्दांत सांगितलें. 'आकृष्ट शक्तिश्च मही तयायत् स्वस्थे गुरू स्वाभिमुख स्वशक्त्या, आकृष्यते तत्पततीव भाति समे समन्तात् क्व पतत्विय खे.' यानतर पांचशे वर्षांनी म्हणजे सतराव्या शतकांत न्यूटननें गुरुत्वाकर्षणाचा शोध (?) लाविला. कोणाचा शोध व कोणाचा उदो उदो आम्ही करितो ?

(औ) **कणादाचे कण विज्ञान** : कणाद नावाचे एक दर्शनकार मुनि (ऋषि) होते. ते कण–वादाचे अध्वर्यु. त्यांचे शोध अनन्यसाधारण होते. म्हणून त्यांच्या ज्ञात दृष्टीच्या विचारसरणीला 'वैशेषिक दर्शन' पद्धति म्हणतात. जगांत दिसणाऱ्या अनंत पदार्थांचे वर्गीकरण करून ६ भावरूप पदार्थ १ अभावरूप पदार्थ असे सातच पदार्थ ठरविले. ते असे – १. द्रव्य, २. गुण ३. कर्म सामान्य समवाय व विशेष हे सहा व अभाव हा सातवा. या सात पदार्थांपैकीं 'द्रव्य' याचीं नऊ द्रव्यें आहेत. तीं अशीं –पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ही पचमहाभूतें, व काल, दिशा, मन आणि आत्मा अशीं मिळून नऊ. यापैकीं 'आकाश' हे द्रव्य सर्वव्यापी म्हणजे 'विभु' आहे या विभु द्रव्याशीं संबंध असणारीं काल व दिशा हीं दोनही सर्वव्यापी तत्वे म्हणजे द्रव्यें आहेत. गति निर्माण झालेली हा दोन द्रव्यें एकाच शक्तीचीं दोन रूपें आहेत. म्हणून 'आकाश' हेंच सर्व पदार्थमात्राचें आश्रयस्थान आहे. 'दिक्काला-धनवच्छिन्न' हें आत्म्याचें नाव किंवा स्वरूप, पण तें दिक्कालाशीं संबधित असूनही, आकाशाच्या पलीकडे म्हणजे त्यापेक्षा श्रेष्ठ असें आहे. याचा स्पष्ट अर्थ आत्मतत्त्व म्हणजे चैतन्यशक्ति हाच जगाचा, विश्वाचा, वा अतिविश्वादिकाचा आधार आहे **एवढ्या मोठ्या ऋतंभरा प्रज्ञेची झेप कणाद मुनींच्या आण्विक तत्त्वज्ञानाची होती.** ही गोष्ट आधुनिक अल्पबुद्ध, अल्पचेतस, विज्ञानवाद्यांना समजणेंही कठीण. सारांश, आधुनिक विज्ञानवादी काजव्याचीं भारतीय

विज्ञानऋषींच्या विज्ञान सूर्याशीं तुलना किती हास्यास्पद आहे याचा विचार करा.

आधुनिक पाश्चिमात्य विज्ञानवाद्याचा अणु Atom म्हणजे कणादमुनीचा 'कण' नव्हे. त्याचा कण म्हणजे परमाणु म्हणजे ज्याचे पुढें विभाजनच होऊ शकत नाहीं तो 'परम-अणु' होय. आधुनिक ॲटमचें विभाजन होते. पण कणादाच्या परमाणूचे तसे होत नाहा अशी ही शेवटची स्थिति! केवढ्या सूक्ष्मतम तत्त्वाचा शोध हा! प्रत्येक पदार्थ अणूचा मिळून बनलेला असतो. पण सर्व पदार्थांतील अणू एकाच प्रकारचे नसतात. यामुळे पदार्थ, वस्तु किंवा मनुष्य हीं वस्तुजात म्हणून एकच असलीं, तथापि त्या प्रत्येकातील अणुजात ही निरनिराळी असते. त्या त्या प्रत्येकाचे पृथक्त्व निरनिराळे असते. यामुळें ते निरनिराळे *ओळखिता* येनात. हाच तो विशेषपणा. म्हणूनच कणादानी शोधून काढिलेला या तत्वपद्धतीतीला 'वैशेषिक मीमासापद्धति' म्हणतात—हा परमाणू अविनाशी असतो. परमाणूचा सयोग होतो तसा वियोगही होतो. पण परमाणू नष्ट न होता तो अव्यक्तात लीन होतो. परमाणूच्या घटना—विघटनाचे चक्र हे सयोग-वियोगचक्र नित्य सुरूच असते, म्हणून परमाणू हे नित्य व अविनाशी असतात हा क्रातिकारक अद्वितीय शोध वैशेषिक कणादमुनींनीं सुमारें पचवीसशें वर्षांपूर्वी लाविला. नैय्यायिकाचेही सोळा पदार्थ हीं मूल तत्त्वें नसून तीं वस्तुज्ञानाची सोळा साधने मात्र आहेत, असें वैशेषिक कणाद मानितात.

## २ भारतीय अस्त्रविद्या व आधुनिक अणुविज्ञान

**भारतीय अस्त्रविद्या :** अभ्युदयनि श्रेयसप्रवणता हे वैदिक धर्माचे मुख्य लक्षण आहे. यामुळें भारतीय ऋषि व मुनि वेदपठण व यजन याजन अथवा परमेश्वराच्या साधननच जीवन व्यतीत करीत असत हे खरें नसून ऋषि नेटका प्रपच करीत. ऐवढेंच नसून अथर्ववेदात

सांगितल्याप्रमाणे यजमान, यजमानपत्नि, यज्ञीय कुंडाच्या तीनही बाजूस बसणाऱ्या ऋत्विजायाचें रक्षण करणें आणि यज्ञविध्वंसक वा उपद्रव देणाऱ्या दैत्य-दानवादिकांचें पूर्ण पारिपत्य करणे याची जबाबदारी त्याजवर व त्याचप्रमाणे मुनींवर समाजाचे घटक म्हणूनही असे यासाठीं ते मंत्र, तंत्र, यंत्र, ओषधि आणि मणि तयार करण्याचें कार्य ह्यांत गुंतलेले असत. यावरून राजगुरु हा अथर्ववेदीय ब्राह्मणच असावा असा दंडक का होता, त्यातील रहस्य सहज ध्यानात येईल. सारांश, तत्कालीन ऋषिमुनि हे आधुनिक शास्त्रसंशोधकाप्रमाणें निरनिराळे प्रयोग करून त्यासंबधीचे शास्त्रग्रंथ विधिविधानासह लिहून ठेवीत. तसेंच लायक शिष्यांना ते ज्ञान शिकवीतही एवढेंच नव्हे, तर ती परंपरा चालू राहील अशी योजनाही करीत. विश्वामित्र, वसिष्ठ, अगस्ति,'

---

१. अस्त्रविद्या—

भारतीय ऋषींचें संशोधन व त्याचे ग्रंथ ह्याची खालीं दिलेली माहिती वाचून त्यांच्या कामगिरीची कल्पना येईल.

(१) शक्तितंत्र (अगस्त्य महर्षि)—मूळ प्रकृतीपासून ३२ प्रकारच्या शक्ति उत्पन्न करिता येतात. जसे—विद्युच्छक्ति, आकर्षणशक्ति, उष्ण पाण्यापासून उत्पन्न होणारी अग्निकणशक्ति, वायुकण भेदनापासून उत्पन्न होणारी शक्ति, इत्यादि.

(२) अंशुबोधिनी (महर्षि भारद्वाज)—ग्रह व त्यांचे प्रकाश आणि आकर्षण मोजण्याचीं यंत्रें, सूर्यकिरणात असणाऱ्या निरनिराळ्या शक्तींचें मापन, सूर्यकिरणातील शक्तिद्वारा परस्परात दूर अंतरावरून भाषण करणें, (हा टेलिव्हिजनसारखा प्रकार नव्हे ना? त्याच्या पुढील प्रगतीचा प्रकार तर नसेल ना?) व दूरच्या जगात सूर्यकिरणशक्तीनें जाण्याची यंत्रसामग्री तयार करणें, इत्यादि. तसेच याच ग्रंथात शेकडों वर्षे टिकणारा वज्रलेप करणें, परलोकस्थ जीवाच्या प्रतिकृति करून ठेवणें, इतर ग्रहावरील वायुलहरी व प्रकाशकिरण कसे शोधून काढावे इत्यादि माहिती आहे

(३) सौदामिनीकला (मातंग महर्षि)—यात नादलहरी व प्रकाशलहरी यांच

नारद, (कळीचे नारद नव्हेत,) भारद्वाज इत्यादि ऋषि तसेंच परशुराम हे सर्व मंत्र तंत्र व यंत्र शास्त्रात प्रवीण होते. त्यांना अस्त्रविद्या अवगत होती. ऐतिहासिक कालातील नवनाथ हे पण अस्त्रविद्याप्रवीण होते.

ही अस्त्रविद्या मंत्राधिष्ठित होती याचा अर्थ ती विद्या मंत्रजनित, शब्दजनित स्पंदनांनी उत्पन्न केलेली तारक व मारक वस्तुजात किंवा पदार्थ होते. म्हणजे ही वस्तुजात स्थूल भौतिक म्हणजेच पंचभौतिक पदार्थगत होती असेंच नाहा, ती व्यक्तिगत होती म्हणजे स्वावलंबी होती. **उलट शस्त्र हें परावलंबी असतें. अस्त्र स्वावलंबी असते.**

या सर्व अस्त्रविद्येच्या मंत्राचा, त्यातील शब्दसमुच्चयाचा अर्थानुलक्षी विचार केला म्हणजे तेज, त्याचीं विविध प्रकारची व दार्ढ्याची कंपनें-स्पंदनें व लहरी, तसेंच वायु व त्याचीं कंपनें हीं त्याचीं दोन मुख्य

---

संशोधन व त्यापासून अनुभविलेले दृश्य व अदृश्य देखावे ह्यांचे वर्णन आहे.

(४) वैश्वानर तंत्र (नारद ऋषि)—यांत जगातील १२८ प्रकारचे अग्नि व त्यांची कार्यें ही माहिती आहे.

(५) वायुतंत्र (शाकटायन)—या ग्रंथात वातावरणाचे ८४ हजार प्रकार, त्यांची विरलता व घनता, सूर्यमालिकेतील प्रत्येक ग्रहावरील वातावरणाचे वर्णन, त्यांचे परस्पर जीवसृष्टीवर होणारे परिणाम व त्यांचे निराकरण करण्याचीं विधिविधानें, त्या त्या ग्रहावर जाण्याचीं साधनं, व तेथ गेल्यावर होणाऱ्या परिणामाचं निवारण व त्याची प्रक्रिया ह्याचीं साधनें, इत्यादि वर्णनें आहेत. याशिवाय दिव्यसृष्टि (दधादन ऋषि), धूम्रप्रकरण (नारदऋषि), लोहतंत्र (शाकटायन), यंत्रसर्वस्व (भारद्वाज), धातुवाद (बौधायन), शिल्पशास्त्र (मय), मेघोत्पत्ति (आंगिरस), अर्थशास्त्र (व्यासमहर्षि), परकायाप्रवेश (वालखिल्य) इत्यादि अनेक ग्रंथ अनेक ऋषींनीं लिहिले, —स्वर्गदर्शन १९६९ या ग्रंथावरून), प्राचीन हिंदी शिल्पशास्त्र भाग १० (कै. रावसाहेब कृ. वि वझे १९२८) ह्या अमोल ग्रंथात अशा अनेक ग्रंथांची व साहित्याची माहिती दिलेली आहे ..(गो. प्र. भावे).

आधारभूत विरलतर तत्त्वें असून, त्याचा आकाश या विरलतम-सर्वव्यापी आणि म्हणून विभु-तत्त्वाशीं संयोग झालेला आहे, असें दिसतें. तेज, वायु व आकाश हीं तत्त्वें जरी पंचमहाभूतापैकींच आहेत, तरी तीं तीक्ष्णतम तीक्ष्णता व सूक्ष्मतम मारकता व तारकता उत्पन्न करणारीं, त्वरित प्रभावी व सर्वव्यापी अशा तत्त्वापासून तद्गुणविशिष्ट शक्ति उत्पन्न करणारीं उपादान साधनें आहेत असें स्पष्ट होतें. अशीं अस्त्रें शंभरापेक्षा जास्त होतीं अशीं वर्णनें आहेत. मंत्रशास्त्र ग्रंथात ज्या अस्त्राचे मंत्र दिलेले आहेत, त्यावरून वरील विधानाची सत्यता ध्यानात येईल. तीं अस्त्रें ज्या वारणासाठीं वा निराकरणासाठी व ज्याच्याविरुद्ध उपयोगिलीं जात, तीं फक्त त्या विरुद्ध पक्षीयावरच परिणाम करीत, इतरांना त्यांचे सुपरिणाम वा दुष्परिणाम भोगावे लागत नसत. हा त्या अस्त्राचा व त्या अस्त्रविद्येचा दुसरा महत्त्वाचा विशेष आहे. तिसरा विशेष म्हणजे तीं अस्त्रें अक्षय्य, स्वयसिद्ध व नित्य सिद्ध अशीं होतीं. चवथा विशेष म्हणजे काही अस्त्रें वैश्विक शक्त्याधाराधिष्ठित होतीं. जसें ब्रह्मास्त्र, ब्रह्मदंडास्त्र, पाशुपतास्त्र इत्यादि पांचवा पण गौण विशेष म्हणजे तीं कधीं कधीं बाणासारख्या शस्त्राशीं संयोजून उपयोगिलीं जात.'

१. ऑस्ट्रेलियातील प्राचीन पण आधुनिक रहाणीच्या दृष्टीने मागासलेले असे समजल्या जाणाऱ्या लोकांत अजूनही 'बूमरँग' नावाचे अस्त्रवजा शस्त्र शत्रूवर प्रहार करून प्रक्षेपकाकडे परत येत असे तेथील वसाहतवाले श्वेतवर्णीय युरोपियन लोक सांगतात. भारतीय अस्त्रांच्या विविध प्रकारामध्ये यंत्रमुक्त, मंत्रमुक्त, मुक्तामुक्त इत्यादि प्रकार तेव्हा प्रचारांत होते.' यावरून यंत्रमुक्त प्रकारामध्यें भौतिक आण्विक शक्ति संयोगजन्य अस्त्रें होतीं असें दिसतें. पण त्यासाठीं सुद्धा प्रचोदक, व शक्त्योत्पादक मंत्रही होते. ज्याला यंत्रमुक्त असें वर म्हटलें आहे, ती विद्या ऐतिहासिक कालात भारतात उपयोगिली गेली होती असे साधार प्रतिपादणें शक्य आहे. त्याचे पुरावे पुढें दिल्याप्रमाणे आहेत. (१) इ. स. ११९२ मध्यें हैदरअलीच्या सैन्यानें १० फूट उंचीच्या बांबूवरून मैल दूर असलेल्या ब्रिटिश सेनेवर श्रीरंगपट्टण येथें ६ ५ पौंडी रॉकेट्स

**भारतीय अस्त्रें व आण्विक शस्त्रें** . आजच्या अर्थशास्त्रीय व्यवहारदृष्ट्या अस्त्राचा विचार केला तर भारतीय अस्त्रें सर्वात कमी खर्चाचीं व त्याच्या उत्पादनाशीं व सिद्धतेशीं फक्त तीं सिद्ध करणाऱ्या एकाच व्यक्तीचा संबंध येतो. याच्या उलट आधुनिक अण्वास्त्राचे स्वरूप आहे वास्तविक विचार करिता आधुनिक अणुजनित मारक शक्तीला 'अस्त्र' हा शब्द लावणे अयोग्य आहे. त्याना अणुशस्त्र असे म्हणणे जास्त सयुक्तिक वाटते. कारण तीं अनंतपटीनें खर्चाचीं व सहस्रावधि यंत्राच्या आणि

---

सोडून त्याचा पराभव केला. (पुनः इ. स. १७६९ साली भारतीय सैन्यानें पुन' त्याच भागात उपयोगून शत्रूचा त्याच भागात परभव केला.)

(२) चिनी लोकाना 'अग्निबाण' (Arrows of Flying Fire) सोडण्याची क्रिया माहीत होती. इ. स. १२३२ मध्यें मोंगल लोकानी 'काईफंग' हल्लींचें (pien-king) ह्या शहरावर हल्ला केला तेंव्हा त्या मोंगल सैन्यावर सोडिले होते. बंदुकीची दारू त्यात वापरली होती. चिन्यानीं ही दारू इ. स. १२०० सालींच शोधून तयार केल्याचें ऐतिहासिक सत्य आहे.

(३) इ. स. १९०२ सालीं मुंबई येथे चौपाटीवर लो. टिळक व इतर मंडळींच्या देखत भारतीय यंत्राच्या मदतीने श्री. तळवलकर (?) ह्यानीं आकाशात बऱ्याच उंचीवर विमान उडवून दाखविले होते! पण लगेच त्याच माणसाचा खून झाल्याचाही प्रवाद ऐकिवात आहे. त्यानतर कोठें 'राइटबंधू' इंग्लंड-यांचा विमानप्रयोग इंग्लडात झाला! (१) व (२) ही माहिती पृ. ४८६ वरील ग्रंथात आहे

(४) अलीकडे 'थुबा' (केरळ) येथून हवामान शोधक प्रयोगाचीं रॉकेट्स—पण तीं पाश्चिमात्य पद्धतीचीं—तयार झाल्याचें प्रसिद्धच आहे.

(५) 'नवनाथ' हे अस्त्रविद्येंत प्रवीण होते याचे ऐतिहासिक पुरावे 'गोरखनाथ और उनका युग'—हजारीप्रसाद द्विवेदी—याच्या ग्रंथात पहावे. मन्त्रशास्त्र *ग्रंथाच्या पूर्वार्धातही भारतात अस्त्रविद्या ऐतिहासिक कालात जिवंत असल्या* चीही माहिती दिली आहे.

प. सातवळेकर यानी 'पुरुषार्थ' मासिकात विमानसदृश वायुवाहनें व त्याचे आकार, गति व त्याचे साहित्य ह्याच सचित्र वर्णन दिलेलें आहे.

माणसाच्या संयुक्त पराक्रमानें उत्पन्न होणारीं असतात. एवढेंच नाय पण हीं अयुधें आणिक शस्त्रें—फक्त मारकच असतात. तसेंच तीं एकट्या म्हणजे एकादि व्यक्तीजवळ ठेवण्याजोगीं वा बाळगण्याजोगीं असतातच असें नाहीं. आणि ते या तीं असलीं म्हणजे त्या धारकाचें रक्षण होईलच असें नाहीं. याच्या उलट भारतीय अस्त्र ही वस्तु बाळगण्यासाठीं वा साठवण्यासाठीं म्हणजे संग्रहासाठीं स्वतंत्र जागा अशी लागतच नाहीं. कारण भारतीय अस्त्र हें मंत्रजनितच—म्हणजे शब्द – आवाज – स्पंदन – जनित असल्यानें त्याला स्वतंत्र जागेची जरुरीच लागत नाहीं, तसेंच तें जसें मारक वा नाशक आहे, तसें तें उत्पन्नकर्त्याचें रक्षकही आहे. अस्—असणें, ज्याच्या केवळ अस्तित्वामुळेंच रक्षण होतें, तें अस्त्र व ज्या शक्तीमुळें रक्षण होतें तें शस्त्र असा शस्त्र व अस्त्र यांतील फरक आहे. शस्त्र हें साधन परतंत्र असतें तर अस्त्र हें स्वतंत्र असतें हेंच खरें.

ध्वनीच्या स्पंदनामुळें पदार्थाला आकार प्राप्त होतो, हें आधुनिक विज्ञानानें अलीकडे सिद्ध केलें आहे. पण तें भारतीय ऋषींनीं फार पूर्वींच सिद्ध केलेलें होतें. त्याअर्थीं विशिष्ट स्पंदनांनीं विशिष्ट पदार्थ तयार होतो हें सिद्ध झालेलें आहे, त्याअर्थीं भारतीय वैदिक मंत्रांतील शब्दोच्चारापासून विशिष्ट स्पंदन उत्पन्न होऊन तो तो विशिष्ट पदार्थ उत्पन्न होत असे, तसा आताही होऊं शकेल, हें उघडच आहे म्हणजे आजही तीं व तशीं अस्त्रें उत्पन्न करणें अशक्य नाहीं ही शक्ति वैदिक मंत्रांतच असल्यानें ते व त्यापासून वरिता येणारीं अस्त्र हीं पण स्वयंभू आहेत. आधुनिक काळांत कोणतीही वस्तु तयार करण्याचें ठराविक तंत्र असतें, तसें वैदिक मंत्रांचेंही आहे. ते मंत्र ठराविक पद्धतीनेंच उच्चारणें हें त्या तंत्राचें एक मुख्य अंग आहे गायनशास्त्रांतील तान, आलाप, अस्ताई हीं जशीं तंत्रें आहेत व तीं तशीं गाइलीं तरच जरूर तो परिणाम त्या गायनद्वारें होतो हें सत्य, तद्वतच मंत्रोच्चाराचें तद्द्रूपरिणामी तंत्र आहे. यावरून असें ठरतें कीं, त्या मंत्रांतील सामर्थ्य अर्थापेक्षा मुख्यतः

प्रभावी परंतु परमोदात्त शांतिप्रधान छायेत विलीन होण्यास लागले. **उग्रबलतेजोवर्चसी मारकत्व व प्रशांत प्रभावी चिरतारकत्व ह्या दोन्ही शक्ति भारतीय अस्त्रांत होत्या.** अजून आहेतच आहेत. एवढेच नव्हे तर चिरंतनच आहेत. सध्या बाण आहे, ती साधकप्रमाण जीवात्म्याची. याच विश्वामित्राने प्रभु रामलक्ष्मणाना बलातिबला नावाची दुर्धर्ष तेज, अत्रुटित गति, क्षुत्पिपासाविजय इत्यादि सामर्थ्य प्राप्त करून देणारी विद्या म्हणजे मंत्र सांगून त्याचा यथाविधि यथाशास्त्र जप करावयास लाविला. तेव्हा तसें सामर्थ्य रामलक्ष्मणाना मिळालेही. महाभारतकालातही भीष्मद्रोणादिकापाशी अशी अस्त्रविद्या होती व तिचा उपयोग भारतीय युद्धातील कौरव व पांडव सेनानी ह्यांनी केलाही अलीकडील इतिहासकालात नवनाथापैकी गोरक्षादि नाथानी अस्त्रविद्येचा प्रभाव दाखविला. अल्लाउद्दीन खिलजीनंतरच्या पठाणवंशीय इस्लामियांना नालंदापीठातील साधूनी काही मंत्रमुक्त अस्त्रप्रयोग करून मगध स्वारीचा बेत व चाचणीप्रयोग रद्द करण्यास लाविला. असे ही इतिहास सांगतो.'[१]

ही अस्त्रविद्या सावित्री विद्या (सवितृ-सविता-सूर्य) या नावाने ओळखिली जाते. ऋग्वेद मंडल ५-८२-१ यामध्ये सावित्री विद्या मंत्र आहेत. गुप्त सांप्रदाय यातील सावित्री विद्येचा ऋषि विश्वामित्र असून, तो सावित्रीमंत्र 'ॐ भू सावित्रीं प्रविशामि धियो यो नः प्रचोदयात् ॐ' असा संपुटित आहे. सारांश, प्रारंभी सांगितल्याप्रमाणे अस्त्रविद्येचे मूलाधार तेज केवळ सौरतेज नसून वैश्विक, तेज-प्रकाश व त्यातील अविभाज्य ऋणाग्नीय अणु हे आणि त्याच्या जोडीला वैश्विक वायुमंडलातील कंपनात अनुस्यूत असणारे अणु आणि त्यांना संयोजन व नियोजन

---

१. इतिहासप्रकाश-योगी नरहरि नाथ-चौखांबा संस्कृत ग्रंथ संस्थान-वाराणसी व नाथसंप्रदाय-डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी-चौखांबा ग्रंथ.

पद्धतीनं प्रचोदित करणारी व्याहृतींमधील चित्शक्ति हेच आधार आहेत असे सिद्ध होतें.[1]

**आमची आजची गरज**– मागे उल्लेखिलेली यत्रमुक्त जातीचीं भारतीय अस्त्रें ह्याचीं जीं वर्णनें अशुनोधिनी, वायुतत्र अगस्ति संहिता, इत्यादि संहितादि ग्रथात आहेत, त्या माहितीप्रमाणे आधुनिक अण्वस्त्रें (?) अणुशस्त्रें यापेक्षाही तीं यत्रमुक्त अस्त्रे जास्त सामर्थ्यवान असून तीं मत्रशक्तीची जोड घेऊन केलेलीं आणि म्हणून बव्हशी स्वतत्र होतीं असे दिसतें. हिमालय व विंध्य ह्यामध्ये असलेला गोडा समुद्र हा अगस्तिऋषींनीं विमानानें ओलांडिला असे वर्णन आहे. अगस्त्यऋषींचा काळ खिस्तपूर्व सहा हजार वर्षांचा होता (प्राचीन व हिंदी शिल्पशास्त्र कृ. वि. वझे इ. स. १९२८) म्हणजे सुमारें आठ हजार वर्षांपूर्वीची गोष्ट. त्याकाळीं अस्त्रविद्या भर तारुण्यात होती.

पाश्चिमात्य शास्त्रज्ञाची आजची तयारी त्या मानाने अत्यल्प असून ती त्यानाच भस्मासुर मोहिनीची आठवण करून देईल–पृथ्वीवर बसून ते अवकाशात सोडिलेलीं अस्त्रें वा क्षेपणे पृथ्वीवरूनच ताब्यात ठेवितात ही तयारी तुलनात्मक अल्प प्रगतीला फार मोठी वाटते हें खरें, पण हीं

१. नवग्रहोपासनेंतील 'सूर्य' याच्या ध्यानातील पुढील श्लो. ६. श्लोकार्ध 'विश्वाकाशावकाश' ज्वलदतिरुचिर धर्मूशाशाकुचक्राभीतीनाम्' ह्यावरून विश्वावकाशातील सौर तेजाची कल्पना दिलेली आहे. अर्थात् आमची सध्यां ग्रथित अशी 'सूर्य व त्या भोंवती फिरणारे नवग्रहादिमालिका' एवढ्यापुरता विचार नसून विश्वावकाशातील अशा अनेक सूर्यमालिका व त्याचे तेज व सामर्थ्य याचा अतर्भाव आहे. वरें ज्ञान ज्ञात असल्याशिवाय तसा उल्लेख ही कवि कल्पना का ? हा बाबतीत 'जगताचा सघर्ष' 'Worlds in Collision' Immanuel Velikovky १९५१–V Gollarz–London ह्या रशियन ग्रथकाराचा ग्रंथ आर्य, बौद्ध, ग्रीक, इजिप्त, हिब्रु इत्यादि ग्रन्थामधून विश्वोत्पत्ति व जगदुत्पत्ति ह्यासंबधीं पुराव्यासह उल्लेख नादिवीचा ग्रथ सर्वविज्ञानशाखांना वाचनीय असा संदर्भ ग्रथ आहे.

त्याचीं अणुशस्त्रें एकदा हातातून सुटल्यानंतर त्यावर सोडणाऱ्याचें जराहि नियंत्रण असत नाहीं. उलट तींच सोडणाऱ्याना हात दाखवू शकतात. तशी स्थिति भारतीय अस्त्राची मुळींच नाहीं. तीं, तो सोडणाराच्या पूर्ण ताब्यात असतात. आमची अस्त्रविद्या मानवाचा देव बनविणारी आहे, **तर आधुनिक विज्ञानाची अणुविद्या मानवाचा दानव बनविणारी आहे.'** याची जाणीव पाश्चिमात्या पैकीं दूरदृष्टीच्या मानवी वृत्तीला होऊं लागली, म्हणून ती मानवी वृत्ति धारक जीव त्या वृत्तीचा पण सन्यसाची अवतारी पुरूष केंव्हा येणार याची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. पौर्वात्यापैकीं आम्ही भारतीय 'जुन्या ठेवण्याला' पारखे झाल्यानें हतवीर्य, हतपराक्रम व हतज्ञान झालों आहों. आम्हामधील ब्राह्मणत्व म्हणजे ब्रह्म जाणण्याची अभ्युदय नि.श्रेयस्करी प्रज्ञा–नष्ट झाल्याने 'जीते तुम थे ऋषी थे जब', मभी मुर्दे बन गये हो अब' हें जाणून स्वामी रामतीर्थांनी "ब्राह्मणो, आप सीख लो विद्या' असे आम्हा भारतीयाना आर्जवून सांगितलें आहे. पण अजूनही आम्ही 'मृत वीं जिवत' अशा स्थितींत आहों. भारतीय धर्म-शास्त्राप्रमाणे त्रैवर्णिकाना व्रतबंध दीक्षेत प्रथम दंड व मगच गायत्री दीक्षा

१. हेच शब्द डेन्मार्कमधील हॅन्स शरफिग, (Hans Scherfig) हा New times १ जानेवारी १९७० ह्या वर्तमानपत्रात 'नवीन वर्षाची चिंतनिका' (New Year's Reflections) ह्या लेखात लिहितो. मानवत्वा व मानव्यतेचा नाश करणाऱ्या युगी आणणाऱ्या अनेक रसायनाचे कारखाने, कर्णबधिरता व भीति उत्पन्न करणारे वायुयुक्त आवाज, सर्व सृष्ट पदार्थ व पिकें नष्ट करणारीं 'जंतुघ्न औषधे' या नावान उत्पन्न करून त्याचा प्रसार करणाऱ्या द्रव्याचे अनेक कारखाने पाश्चिमात्य देशात किंवी झपाट्यान वाढत आहेत हें सांगताना 'चंद्रविजय मोहिमेच्या' यंत्रोत्पादनापासून चंद्रावरून माणूस परत आणीपर्यंतच्या सर्व घटनाचा चालक व सूत्रधार "वर्नहर व्हॉन् ब्रान (Werner Von Braun) हा हिटलरच्या 'रॉकेट Rocket' या भयंकर यंत्राचा मुख्य होता व तोच अमेरिकेत सध्या मानवतानाशक वरील कारखायाचा सूत्रधार आहे.' आणखी भयंकर माहिती 'New Times' पहा.

देण्याचा दडक व आदेश आहे. तो दडही पळसाचाच असतो, ह्यातही मोठे वैज्ञानिक रहस्य आहे यामुळे तो ब्राह्मण अस्त्रवर्चस्वी व ब्रह्मवर्चस्वी असाच बने व बनावा ह्या हेतूनेंच ती दीक्षा दिली जाई. रावण स्वतः ब्रह्मवशोद्‌भूत होता, त्याच्या राज्यात ब्राह्मण नव्हते असे नाहीं, पण ते आसुरी, अमानवी, तामसी विद्येचे होते इंद्रजित ह्या रावणपुत्राने 'दिव्य रथ' सिद्ध करून तो मिळविण्याचा प्रयत्न मंत्राच्या साधनेच्या मदतीनें केलाच, पण मानवी वृत्तीच्या अस्त्रप्रवीण, म्हणण्यापेक्षा अस्त्रातील सामर्थ्यसंपन्न, वायुसुतानेच इंद्रजिताची ती तमप्रधान सिद्धि धुळीला मिळविली! आधीं बडगा–दड–मग सातनन हीच आजही जरूर. यासाठीं पाश्चिमात्यांच्या विद्या व सर्वतोपरी परावलंबी विज्ञानाच्या मागें न लागता स्वाधीन स्वतंत्र आणि कमी खर्चाच्या सावित्रीविद्येच्या अस्त्रविद्येच्याच मागे आम्ही का लागू नये? आम्ही अण्वस्त्रें बनविणार नाहीं, ही 'दडेन सर्वे वश' ह्या दृष्टीनें मूर्खपणाची व कमकुवत असलेल्या नपूसक निधर्मीवृत्तीची द्योतक आहे मानव्य टिकविणाऱ्या अस्त्रविद्येचा मागोवा घेत तरूण भारतीय वीरांनीच पुढें यावें, असे वाटत नाहीं का? ती दीक्षा देणारे गुरूही आहेत, पण त्यांचा ठावठिकाणा अन्यत्र आहे. भारतीय अस्त्रविद्याच अखेरीस मानव्य मानवता–टिकवील व प्रस्थापित करील हेच निश्चित

## ३ भारतीय कर्मकांड–विज्ञान–अल्पदर्शन

(१) **देवदेवता मंत्रोपचार विधिविचार**–कोणत्याही देवाची वा देवतेची उपासना करिताना मग ती उपासना सकाम, निष्काम, नित्य वा नैमित्तिक असो–प्रत्येकात देवदेवतेची (मूर्ती–तसबीर वा प्रतीक–यंत्र) पूजा ही करावीच लागते. अशा पूजेचे प्रकार, पद्धती व साहित्य ह्याचेही अनेक प्रकार आहेत. त्यात चतुःषष्टि (६४) अष्टादश, षोडश, दश व पंच असे उपचार आहेत. महायज्ञयागादिकामध्यें म्हणजे नैमित्तिक

पूजनामध्ये चतुःषष्ठि प्रकारचे पूजोपचार करितात. विशिष्ट नैमित्तिक किंवा अनुष्ठानिक पूजेमध्यें सामान्यतः षोडशोपचार पूजा करण्याची पद्धत आहे. पण नित्य पूजेमध्ये मात्र पंचोपचारी पूजा केली जाते. ते **पंचोपचार** म्हणजे गंध, पुष्प, धूप, दीप, व नैवेद्य हे उपचार केले जातात. **दशोपचारी पूजेमध्यें**—पाद्य, अर्घ्य आचमनीय, मधुपर्क, गंध, पुष्प, धूप, दीप, व नैवेद्य असे दहा उपचार असतात. आणि **षोडशोपचारी** पूजेमध्ये पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नानीय, वस्त्र, आभूषण, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, आचमनीय, ताम्बूल, स्तवनपाठ, तर्पण व नमस्कार असे सोळा उपचार असतात.

आपल्या दूरदर्शी ऋषिमुनींनीं आदेशिलेल्या प्रत्येक कर्मांत प्रथम व्यवहार व त्याबरोबर विज्ञान म्हणजे पंचभौतिकाचें ज्ञान व नंतर पलीकडील अतींद्रियानाच आकलन होणारें अनुभूत व म्हणून अनुभाव्य असे ज्ञान ह्या दोहोंचा उत्तम समन्वय केलेला आहे हें विसरू नये. सूक्ष्म विचार करून त्याबद्दल आदर व अभिमान वाटावा वा वाटावा अशी वस्तुस्थिति आहे. *केवळ भौतिकी विज्ञानाच्या अल्प आधारावर असे का? ते आमच्या बुद्धीला पटत नाहीं असे विचारण्याचें धाडस केलें जाते; पण त्यावेळीं तसे विचारण्याचा वास्तविक अधिकार आपल्याला आहे तरी का? असा विचार त्या जीवातील मनाला शिवतदेखील नाहीं.* असे का होतें? याचे उत्तर त्या जीवाला चित्तचतुष्टयाची (मन-बुद्धि-चित्त-अहंकार) याची ओळखही नसल्याने त्या जीवाचे ते प्रश्न म्हणजे विचार नसून विकारच असतात! यामुळे 'असें का' म्हणण्याचे धाडस होतें! याबद्दल घृणा वाटते. या सर्व मन स्थितीचा व वस्तुजाताचा आधुनिक दृष्टीच्या अल्पजीवाच्या विज्ञानाचा विचार करणे हे येथें अप्रस्तुत असल्याने प्रथम त्या त्या आचाराची रास्त माहिती असणे योग्य. कारण *ती माहितीदेखील आधुनिक अल्प जीवाला नसते, म्हणून ती प्रथम* द्यावयाची एवढेंच या ठिकाणीं करावयाचें आहे. प्रथम व्यावहारिक

माहिती व मगच विज्ञान. एवढी क्रिया झाल्यानतरच आचारक्रांति सध्यां तरी समजनीय वा शक्य आहे.

(२) **कांहीं पूजोपचाराचा खुलासा :** अष्टादशोपचारामध्ये 'आसन समर्पयामि' असे आहे. देवतेच्या स्वागतासाठीं आसन म्हणून निदान पाच फुल, स्वागतासाठीं पुन. सहा फुले वाहीं. पाद्य म्हणजे चार पळ्या पाणी अधिक दुर्वा वा दर्भाचीं टोकें, कमळ, तादुल, विष्णुक्रात नामक वनस्पति इत्यादि. **अर्घ्य** म्हणजे चार पळ्या पाणी, त्यात गध, फळ, फूल, अक्षता (न तुटलेला तादूळ) यव, श्वेत तीळ, दर्भाचीं टोकें वा तुलसीपत्र, **आचमनीय** म्हणजे सहा पळ्या पाणी, त्यात जायफळ, कक्कोळ व लवग याचे थोड चूर्ण असावें, मधुपर्कांत कास्यपात्रात तूप, मध, दहीं – **आचमन** यात एक पळी शुद्ध पाणी, **स्नानासाठीं** पन्नास पळ्या पाणी. **वस्त्र** म्हणजे चारा अगुळापेक्षा थोड जास्त सूत वा दोरा, उपवस्त्र यज्ञोपवीताचा जोडा (दोन वा तीन वा पाच जानवी), **आभरणें** सोनें, मोतीं, इत्यादि वस्तु. **गंध** म्हणजे चदन, अगरू, कापूर इत्यादि सुवासिक पदार्थांचे मिश्रण वा अष्टगध (प्रत्येक देवतेचे अष्टगध निरनिराळ्या पदार्थांचे असते) **पुष्प** – निदान बरींच देखणीं, सुवासिक रगीत फुले, प्रत्येक देवदेवताचें अष्टगध निरनिराळ्या सुवासिक वस्तूचें मिळून केलेले असते. तसेच प्रत्येक देव देवतेला प्रिय असे फूल म्हणून अर्पण करण्यास – वहाण्यास योग्य असें. शारदानिलक आचारेंदुसारख्या अनेक ग्रथात सागितले असून त्या प्रत्येक वस्तूच्या देवताप्रियतेमागे आयुर्वेदीय व भौतिकीविज्ञान भरलेले आहे, हे ध्यानात घ्यावें शिवपुराणातील सृष्टिखडात एक सपूर्ण अध्यायच या विषयावर आहे. **धूप** मुख्यत गुग्गुळचा असावा – **नैवेद्या**मध्ये माणसाला भोजन योग्य वस्तु – यात चोष्य, लेह्य, चर्व्य, व पेय असे पदार्थ असावेत. **दीप** – कापूरमिश्रित कापसाची तुपान भिजवलेली वात एक नमून दोन निदान चार अगुलें लाब असावी, – या दीपाबरोबर सुवासिक शिलापिष्टिका असावी तीसह दीप सात वेळा मूर्तिसमोर मान वा डोळे ह्याच्या खालील

भागासमोर ओंवाळणे – यालाच 'धूपार्ती' म्हणतात. व देवाला ओवा ळिल्यानंतर तीजवरून हातनोंटे फिरवून त्या आर्तीचे कण आपले कपाळ. डोळे, तोंड ह्या भागावरून फिरवून चोळावयाचे असतात. नमस्कार, प्रदक्षिणा विसर्जन. **अक्षता** – यात अनेक न तुटलेले तांदुळ वा ज्वारी, गहू, दाणे, असावे. एवढें साहित्य असावें. हे पूजोपचार होत; पण त्यात '*यथामिलितोपचारद्रव्यैः;*' अशी सर्व परिस्थितींना लागू पडणारी सोय करून ठेविलेली आहे. हे विशेष. हा खरा चतुर व्यवहारूपणा, वरील वर्णनात प्रत्येक पदार्थाबद्दल जे जे आकडे सांगितलेले आहेत, त्या प्रत्येकामध्ये विशेष अर्थ म्हणजे विज्ञान आहे त्याच्या स्पष्टीकरणाचे हें स्थळ नव्हे.

**(२) मानसपूजादि उपचार** : मानसिक ऊर्फ उपांशु, जप हा जसा श्रेष्ठ आहे, तशी मानसपूजाही आहे. हा विधि सामान्य साधकीय धारणेच्या कक्षेत न बसणारा विधि आहे. ही मानसपूजा अतींद्रिय शक्ति केंद्राना जागृत करून पंच भौतिक सर्वस्वाचा (त्या त्या महाभूताच्या प्रतीकात्मक बीजाना आवाहन करून) न्यास म्हणजे परमेश्वरार्पणात्मक कृतीनें करण्याची क्रिया आहे. आद्य शंकराचार्यांची 'नाहं देहो नेंद्रियाण्य' ही न्यासतत्त्वात्मक मानसपूजा प्रसिद्ध आहे 'लं' पृथिव्यात्मकं गंधम्

---

१ मानसपूजा–'लं पृथिव्यात्मकं गंध कल्पयामि (अर्पयामि)। हं आकाशात्मकं पुष्पं अर्प०।–यं–वायव्यात्मकं धूपं कल्प०। रं–तेजोतत्वात्मिकं दीपं कल्प०। वं–अमृत तत्वात्मकं नैवेद्य अर्प०। यरलवह सर्व तत्वात्मकं तांबूलं अर्प० वा पुष्पाञ्जलिं कल्प०॥ ह्या पूजेतही पंचमहाभूत मध्ये असणाऱ्या देव देवतेची सगुणरूपाची मानस पंचोपचार मानसपूजा या नावानें वर्णिलेली आहे. आमच्या प्राचीन भारतीय ऋषिमुनींच्या 'ज्ञाना'ची व त्यामागील चिरंतन टिकणाऱ्या बिनचूक अमोघ व म्हणून अद्वितीय दूरदृष्टीच्या कल्पनेची थेट प्रचीत तरी घेऊन पहा! दरारोज मन्त्राचें पुरश्चरण करिताना मानसपूजेतील प्रत्येक बीजापूर्वी ॐकार लावणें जरूर आहे (जसें ॐ लं पृथिव्यात्मकं)

कल्पयामि—अर्पयामि' ही पचवीजात्मक पचोपचार मानसपूजा सागितली जाते. ती प्रसगोपात्त आपत्कालीही करावी असाही शास्त्राधार आहे. याचा अल्प खुलासा 'मत्रशास्त्र' या पुस्तकात आलेला आहे.

**भारतीय पूजोपचार व विज्ञान** : पृथ्वीवरील प्रत्येक धर्मात 'पूजा' हा विधि आहेच. पूजा म्हणजे सत्कार करण्याची कृति. सत्कार या शब्दातही 'सत्' म्हणजे चागले एवढाच उत्तानार्थ नसून नित्य चिरतन व अविनाशी असा अर्थ अभिप्रेत आहे. या सत्कारकार्यात प्रथम व्यवहार म्हणजे पचभौतिकी शक्तीच्या स्थानापेक्षी (पृथ्वीवरील त्या त्या भूभागाचे स्थान व परिस्थिति) परिस्थितीचा विचार व मगच त्या भौतिकीपलीकडील वैश्विक परिस्थितीचा विचार करूनच पूजोपचाराचे शास्त्र बनविलेले आहे. पश्चिम आशियातील इस्लाम, ख्रिस्ती व यहुदी धर्मातील पूजोपचारामध्ये पाण्याचा वापर कमी, फुलेही थोडी व फळामध्ये मुख्यत' द्राक्षे आहेत; धूपदीप सर्वधर्मीयात आहेतच. पण आपल्या सनातनधर्माप्रमाणे धूप वा उदबत्ती ह्याच्या घटकद्रव्याचे स्थल, काल व हेतु भिन्नत्वाप्रमाणे अनेक प्रकार सागितलेले आहेत. समिधा व हवनद्रव्ये ही जशी हेतु भिन्नत्वाप्रमाणे भिन्न आहेत, तशीच योजना पूजोपचारामागे आहे. एवढेच नव्हे तर तिचा 'जीवशिवैक्य' या वैश्विक शक्तिशी सबध आहे. हे ध्यानात ठेवूनच आमच्या धर्माचाराचा व सस्कृतीच्या अगोपागाचा उघड्या डोळ्यानी विचार करा म्हणजे खऱ्या विज्ञानरवीचा उदय पूर्वेकडेच होतो पश्चिमेस अस्तच म्हणजे ज्ञानाधकारच दिसणार हेच सत्य आहे असे पटेल.

**मुद्रा, न्यास व विज्ञान** : 'पिंडी ते ब्रह्मांडी' हे भारतीय तत्त्वज्ञानाच्या विचारधारेचे व भारतीय धारणेचे महत्त्वाचे सूत्रवाक्य आहे. *यामुळे त्याच्या प्रत्येक कर्मामध्ये व विधिविधानामध्ये व्यष्टिसमष्टि दृष्टीने* किंवा व्यक्ति हा वैश्विक समष्टीचा एक महत्त्वाचा एक घटक आहे ह्या धोरणाचे व दृष्टीचे विज्ञान भरलेले आढळते.

**देवदेवतांचें आवाहन :** त्याची पूजा सामग्री तसेंच व्यक्तीच्या जीवातील चित्शक्ति आणि विश्वचेतन्यातील शिवशक्ति यामध्ये एकात्मकतेचा संपर्क उपन्न करण्यासाठीं करावयाच्या, अंगें व इंद्रियें यांवर करावयाच्या, कृतिरूप हालचाली, यास मुद्रा व न्यास म्हणतात. ह्यामध्यें विशिष्ट पद्धतीचें व विशिष्ट प्रकारचें विज्ञान, भरलेलें आहे. तें कसें व कोणतें ह्याचे अल्प दिग्दर्शन केलें म्हणजे पुरे असें वाटतें.

**मुद्रा**— मानेच्या विशिष्ट हालचालीनें होकार अथवा नकार, पसति वा नापसति दाखविली जाते. अंगुष्ठ व तर्जनी ह्याचीं टोकें एकत्र टेकून हाताच्या पंजाची विशिष्ट हालचाल करून उत्कृष्टत्व' उत्तमपणा वा पसती व्यक्त केली जाते. अशा अनेक प्रकारच्या अवयाच्या वा अंगाच्या हालचाली ह्या विशिष्ट हेतुदर्शक अशा मुद्राच आहेत. मुद्रा ही कृति जगातील सर्व देशात, त्यातील सर्व मनुष्य मात्रात पूर्वापार प्रचलित आहे. म्हणजे मुद्रा ही कृति सर्वदेशिक व सर्वलोकसामान्य आहे. नृत्य-गायन इत्यादि कलात त्या आहेतच. जपानात तर 'नो'नावाची अंगें व इंद्रियें ह्याच्या हालचालीनें मनोभाव व अतिरिक्त विचार व्यक्त करण्याची तासानुतास चालणारी नाट्यकृति आहे. नेत्रपल्लवी व करपल्लवी कृति वा भाषा ह्या मुद्राच आहेत. एवढेंच काय पण मुद्रा ही कृति सर्व प्राणिमात्रातही आहेच. सिंह, वाघ, इत्यादि प्राण्याकडे न डगमगता स्थिर दृष्टि ठेवून पाहणें ही एक हेतु साध्यकारी मुद्राच आहे डोळे वटारणें, स्मित हास्यकरणें इत्यादि इंद्रियें व अवयव याच्या हालचाली ह्या मनोविकार व्यक्त करण्याच्या मुद्राच आहेत. अशी वस्तुस्थिति असताना ठराविक मंत्राचारामध्यें अथवा पूजोपासनेमध्यें जर ठराविक मुद्रा म्हणजे हालचाली करण्याची नितांत आवश्यकता आहे असा आग्रह धरिला तर त्या कृतीला कर्मकांडीय थोताड असें का म्हटलें जावें याचें सखेद आश्चर्य वाटतें.

मुद्रा व न्यास ह्या दोन क्रिया मनुष्य सह-ज व प्राणि सह-ज असून आवश्यकही असतात, म्हणून त्या घडतात व केल्या जातात. मग

धर्मविधींत त्या क्रिया आवश्यक म्हणून जर सांगितल्या, तर त्यांत गैर असें काय आहे? अन्यधर्मीय लोकही अशा प्रकारच्या क्रिया करितातही. जसें स्नानानंतर वा शरीरशुद्धीनंतर पारशीलोक 'कस्ती' (जानवें) झटकतात व मंत्र म्हणतात तो न्यास असतो. नमाज पडतांना **मुसलमान** लोक जी उठबसादि शरीरक्रिया करितात त्या मुद्रादि प्रकार आहेत.

तसेंच खिस्तानुयायामध्येंही प्रार्थनेंत गुढघे टेकणे, स्वस्तिकाकार स्वरूपाचे दोन हात करणें व भीतीच्या वेळींही तसे हात करणें ह्या क्रिया, न्यास व मुद्राच आहेत.

मंत्रशास्त्रांत अनेक वेळच्या अनेक मुद्रा संस्कृत श्लोकरूपानें दिलेल्या आहेत. त्यांपैकीं गायत्री जपाच्या आदिअंतीं करावयाच्या मुख्यमुद्राच्या, त्याचप्रमाणे नित्याच्या पूजाविधींत जरूर असणाऱ्या मुद्रा ह्यांच्या आकृति दिल्या आहेत. कृति करणाऱ्या तज्ज्ञाकडून त्या मुद्रा एकदां तरी समजावून घेऊन करणे हे चांगलें.

(५) **मुद्रामागील निरीक्षण दृष्टि व विज्ञान** : पूजादि विधींतील भारतीय मुद्राच्या कृतीचा विचार करितां पुढें दिलेल्या दोन गोष्टी ध्यानांत येतात त्या अशा – (१) भारतीय ऋषिमुनींनीं केलेलें सूक्ष्म पण सहज पटून ध्यानांत राहील, असें सृष्टिनिरीक्षण व बोध आणि त्या कृतीमागें मानवी शरीराची रचना (Anatomy) यांतील स्थूल व सूक्ष्म ग्रंथी व नसनाड्या, त्या प्रत्येकाला चेतनावस्थेंत ठेवणारी चिच्छक्ति आणि तिचा वैश्विक चिच्छक्तीशीं असणारा संबंध ह्या गोष्टींचें संपूर्णज्ञान (नवविज्ञाना-प्रमाणे केवळ यंत्रजनित व यंत्रस्पर्शित ज्ञान नव्हे. त्या पलीकडील अतींद्रियशक्तिमार्फत मिळविलेलें ज्ञान) आहे, हे कसें? त्याचें अल्पदिग्दर्शन पुढें दिलें आहे

| मुद्रा | निरीक्षण व रचना | कृति व विज्ञान |
| --- | --- | --- |
| (१) मृगी मुद्रा— | मृग म्हणजे हरीण. त्याचे लांबट चिंचोळें तोंड व उभी दोन शिंगें. देवाला नैवेद्य दाखवितांना ही मुद्रा करितात, अगदीं लहान मुलाला अन्न भरवितांना अशाच कृतीनें अजाणता आई अन्न थोडें थोडें बोटांनीं भरविते (iii) यज्ञात हवनाहुती घेण्याचे मापही याच मुद्रेवर बसविलें आहे | कृति—अंगुली व तर्जनी ही दोन बोटें सरळ उभी करून इतर तीन बोटांची टोकें त्या दोन बोटांमध्ये एकत्र जोडल्यानें मृगी मुद्रा होते. विज्ञान—त्या रचनेमुळें बोटें व तत्संबंधी शरीरावयव व इंद्रियें त्याशीं जडित असलेल्या प्रणालीवरील दाब या ताण आणि तद्द्वारें मेंदुभागाशीं साधिलेला व होणारा चेतन्य जागृतीकारक संपर्क ही गोष्ट साध्य होते. |
| (२) शकट मुद्रा— | शकट म्हणजे लाकडी गाडी. यात २ चाकें व मध्यें आस हे दर्शील | (२) यात कोणत्या इंद्रियावर ताण पडत नाहीं ? |
| (३) योनी मुद्रा— | या मुद्रेतील बोटाच्या रचनेचा आकार स्थूलमानानें योनीसारखा होतो. | विज्ञान—या मुद्रेमुळें नाभिस्थित भयोशीं संबध येतो. |

| मुद्रा | निरीक्षण व रचना | कृति व विज्ञान |
| --- | --- | --- |
| (४) सुरभि मुद्रा— | पाचही बोटांची विशेषरचना चित्रात पहा. | **विज्ञान**—या मुद्रेचा पचन शक्ति नीट ठेवण्याशीं संबंध आहे. शरीरातील पृथ्वी व जलतत्त्व किंवा वायु व आकाशतत्त्व यांचे मीलन साध्य होते. या मुद्रेच्या मदतीनें पित्तविकार शमतात. मूत्रविकार नष्ट होतात म्हणून पटचक्र भेदनक्रियेला ही मुद्रा सहाय्यक होते. परंतु अव्यवस्थित क्रियेनें मृत्यूचा धोकाही संभवनीय होतो. |
| (५) वेणु मुद्रा — | कृष्ण 'वेणु' नावाची स्वरनलिका (अलगुजें, बासरी) वाजवीत असताना तो एक पाय वक्र व दुसरा पाय सरळ ठेवितो ह्या निरीक्षणाच्या आधारावरील मुद्रा. | **कृति**—'अगनकअधरीं धरि पावा' ह्या प्रकारची पाय, हात, बोटें व शरीर ह्यांच्या रचनेनें सुषुम्ना नाडी स्थिरावयाची तयारी होते. व तद्द्वारें कुंडलिनी जागृतीची पूर्व तयारी होते तें **योग विज्ञान** यात आहे. |

पंकज (कमळ) शंख, लिंग, अंकुश, धनुष्य, बाण, परशु इत्यादि प्रत्येक मुद्रेमध्ये वस्तु व कार्य ह्यांचे सूक्ष्म निरीक्षण करून ती वृत्ति प्राप्त करून घेण्यासाठीं जरूर त्या शरीरावयवाच्या रचना करावयाच्या असतात. योगामध्ये शेंकडों मुद्रा असून व त्या साध्य होण्यासाठीं क्वचित् प्रसंगीं अल्प पण केशवत् तीक्ष्ण शस्त्रक्रियाहि करण्याचा आदेश आहे. (जसे— मस्तकातून स्रवणारें अमृत प्राशन करितां यावें म्हणून जिभेखालची नस कापून करावयाची **खेचरी मुद्रा**–व ही सिद्धकरण्यासाठीं **'शक्ति-शालिनी** मुद्रेची आवश्यकता आहेच व ती करावयाची असते. ह्या सर्व मुद्रांचा तसेच **चौऱ्यार्शी आसनांचा मूळजनक भगवान शंकर हाच आहे.** 'मुद दवाति देवाना द्रावयति असुरानपि' **देवाना** (म्हणजे शरीरस्थ शक्तिकेंद्रांना) **आनंद देणारी व असुरांना** (जडलेल्या रोगांना वा अनिष्टवृत्तींना) **पळवून लावणारी जी अवयाची हालचाल, तिचे नांव मुद्रा.**

**(६) न्यास**–'नि'+अस्=न्यास. याचा अर्थ ठेवणे स्थापना करणे असा आहे. मग कोणाला, कोठें व का बसवावयाचा? स्थापना कोणाची व का करावयाची? न्यासाचे प्रकार अनेक आहेत. ते विचारात घेतले म्हणजे वरील प्रश्नाचीं उत्तरें मिळतात. करन्यास, हृदयादिन्यास, प्रणवन्यास, व्याहृतिन्यास, अ-क्षर न्यास, अंगन्यास, मातृकान्यास, व्यापकन्यास इत्यादि अनेक नावाचे व प्रकारचे न्यास धर्मकार्यांत सर्वत्र सांगितलेले आहेत.

**(८) न्यासा मागील भारतीय दृष्टि'**—असंख्य स्वयंसक्त व स्वयंप्रचोदित अणु असलेल्या एका रेतबिंदूपासून वाढून तयार झालेल्या शरीराचा खरा मालक जो आहे, **त्याचेंच हें शरीर आहे,** 'माझें

---

१. अप्रसिद्ध राहू इच्छिणाऱ्या बंगाली महात्म्यानें लिहिलेल्या व हिंदीत रूपांतरित झालेल्या 'पूजातत्त्व', 'यज्ञतत्त्व' या ग्रंथातील विचारधारेंतून सुचलेले विचार वर दिले आहेत. (गो. प्र. भा.)

आहे असे मानणारा व म्हणणारा 'अहं' त्याचे नव्हे ('देह हे राउळ। आत्मा हा पंढरी।' ही तुकारामोक्ति) ह्याची जाणीव लहानपणापासून असावी, व्हावी व निरहंकार वृत्ति, हें शरीर म्हणजे मी नव्हे वा हें 'माझें' नव्हे ही निरासक्त वृत्ति व्हावी, हा न्यास करण्यातील भारतीय दृष्टिकोनाचा एक पैलू आहे. दुसरा महत्त्वाचा अंतर्गाभ्याचा पैलू आहे त्यामध्ये पुढील गोष्टी येतात.

या देहरूपी राऊळाच्या मालकानें आपल्या घरात किती व कोठे शक्तिकेंद्रे (Power Houses) ठेविलीं आहेत (सप्तचक्रें), तसेंच त्या त्या शक्तिकेंद्राशीं नित्य संपर्क ठेवून, न बिघडणारीं, स्वयंचलित व स्वयशक्त्युत्पादनक्षम अशीं यंत्रस्थानें (Glands– ग्रंथिसमुच्चय जसें– अग्निग्रंथी, ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी, रुद्रग्रंथी इत्यादि) त्या त्या ठिकाणचे गणपति, ब्रह्मदेव, विष्णु, शिव इत्यादि अधिकारी आणि त्या सर्वांची नियंत्रक सहस्रदलीय कमलात स्थानापन्न झालेली आदिशक्ति ह्या सर्वांची ओळख करून त्या त्या स्थानी नतमस्तक होऊन आशीर्वाद मागण्यासाठीं फक्त स्पर्श करण्याची क्रिया हस्तांगुलिकाकरवीं करून निर्हेतुक त्यागपूर्ण सेवा अर्पण करणे हा न्यासाचा दुसरा पैलू होय. हा पैलू फार महत्त्वाचा आहे. त्याचा खोल विचारण्याचे हे स्थळ नव्हे, तरी एवढे खरें कीं आपल्या शरिराची ठेवण, घडण व बनावट ह्याचा पूर्ण माहिती आपल्या पूर्वजाना होती. एवढेंच नव्हे तर ह्या देहाला नीट सुस्थितींत कसें ठेवावें व या देहाचा कोणकोणत्या कार्याकरिता कसा उपयोग करावा हेंही माहीत होतें. यामुळें या देहातील जीवाला 'थोरल्या देवानें'—त्या चिच्छक्तीनें उपयोगात आणावयाची देह ही वस्तु त्या जीवाची नाहीं. म्हणून निजवरील खोटें ममत्व स्वामीत्व सोडून द्यावें, त्या ममत्वाचा 'सन्यास' घेण्यास विसरू नये, हा न्यासाचा दूरदर्शी हेतु आहे. त्या ग्रंथी, त्याची शक्ति, त्याशीं निगडित अशा हजारो केशवाहिन्या, मेंदूतील क्रियाशील स्थानें व त्याचे सामर्थ्य ही माहिती, हे ज्ञान हा योगशास्त्राचा विषय

आहे. तथापि त्याचा निरनिराळ्या प्रकारच्या न्यासक्रियांशीं घनिष्ठ संबंध आहे. एवढे तरी ध्यानात असावें.

'गायत्री मंत्र' हा तेजोबलवर्चसी असा सर्व श्रेष्ठ मंत्र आहे, हा का व कसा ह्याचा सर्वांगीण विचार पुढे योग येईल तेव्हा केला जाईल. पण त्या मंत्रातील २४ अक्षरें, त्याच्या देवता, त्यातील तत्त्वे व त्याच्या तन्मात्रा, त्यासाठीं करावयाच्या २४ मुद्रा आणि देहातील २४ न्यासस्थानें ह्यात महत्त्वपूर्ण असें नरविज्ञानापलीकडील 'ज्ञान' म्हणजे ब्रह्मज्ञान—ब्रह्माडज्ञान भरलेलें आहे. एवढाच निर्देश करणे येथें पुरे आहे.'

**(७) जपसाहित्य विज्ञान** : कोणताही जप करिताना त्यासाठीं म्हणजे जपसंख्येची मोजणी करण्यासाठीं 'माळ' उपयोगात आणितात. इतर सर्व धर्मीयातही 'माळ'च उपयोगितात. अशी माळ, तिचे घटक पदार्थ, तिची लावी, तिचा उपयोग करण्याची पद्धति, इत्यादि बाबतींचें आमच्या ऋषिमुनींनी एक शास्त्रच बनविलेलें आहे. तितका सर्वांगीण विचार या बाबतींत अन्यधर्मीयांच्या प्रवर्तकांनी केलेला नाही.

**माला साहित्य–प्रकार व परिणाम** : माळेतील मणि (त्या त्या पदार्थाचे मणि) सामान्यत शास्त्रशुद्ध पद्धतीप्रमाणे २७,५४ किंवा १०८ असावे, अन्य संख्या[2] अशास्त्रीय. हे अंक ठरविण्यात अंक शास्त्रातील (science numerology) ९ ह्या अंकाची महती, परिणाम ह्याबद्दल विज्ञान भरलेलें आहे. वरील संख्येत ९ हीच बेरीज येते.

---

१ गुरु चरित्राच्या ३६ साव्या कर्मकांडीय अध्यायात वरील माहितीचा उल्लेख आहे. याशिवाय अन्य अनेक ठिकाणीं आहे.

२. तथापि मोक्षार्थ जपासाठीं २५, ५० ह्या १०० मण्यांची, धनार्थ ३०, ६०, १०० मण्यांची व पुष्टिकामार्थ २७, ५४–१०८ मण्यांची असावी असा शास्त्राधार आहे.

| माला साहित्याचे नाव | उपयोग | जप परिणाम[2] व देहावर परिणाम |
|---|---|---|
| १ पोवळे | देवी गणपति वा मंगळ ह्यांना प्रिय. | सहस्रपट–पित्तशामक |
| २ मोती | सद्य फलदायी–संपत्ति समृद्धि कारक–मोक्षलाभार्थ | लक्षपट–पित्तशामक वाजीकर |
| ३ स्फटिक | भोगप्रद, विद्यासिद्धिसाठीं | १० हजारपट– गंडमाला दाहक |
| ४ चांदी | | चांदी–दशलक्षपट.सुवर्ण–शामक–कोटि पट |
| ५ सुवर्ण (अष्टापद) | कामना पूर्तीसाठीं | विषनाशक–क्षयग्रंथी दाहक |
| ६ हीरक पाचू इत्यादि | सिद्धी प्राप्तीसाठी–तांत्रिक कामांत उपयोगी | रत्नमणि १० हजार पट. ह्द्रोग शामक. पाचक |
| ७ शंख | लक्ष्मी प्राप्त्यर्थ, धर्मसिद्ध्यर्थ | वात नाशन, यकृत् पुष्टिदायक |
| ८ कमळ बीज (पद्माक्ष) | सर्व कार्योपयोगी–कृष्णप्रिय | दशलक्षपट. वीर्यवर्धक |
| ९ रुद्राक्ष | सर्वसिद्धिप्रद–शंकरप्रिय | अनंत पट. रक्तदाबहारक |
| १० तुलसी काष्ठ वा चंदन | विष्णुप्रिय–सर्वकर्मोपयोगी स्त्रिया व शूद्र ह्यांना चालणारी | तुलसी काष्ठ–त्वरित इच्छित चंदन–शतपट–शामक–क्षुधावर्धक |
| ११ कुशग्रंथी | पापविनाशक | शतकोटी पट–रक्तग्रंथीवर्धक |
| १२ पुत्रजतीचे मणि | पुत्रपशुधान्यसमृद्धिकारक | दशपट. वाजीकर |
| १३ हत्तीचे दांत | सर्व प्रकारच्या आकर्षण प्रयोगासाठीं | अस्थि शक्तिवर्धक. |

१. रुद्राक्ष १ ते १४ मुखांपर्यंतचे असतात. त्यांचे महत्त्व मुखपरत्वें भिन्न आहे.

२. मालासाहित्याचे शरीर व आरोग्य ह्यांच्या दृष्टीनें अनेक उपयोग आयुर्वेदांत सांगितलेले आहेत.

वरील साहित्याची माला कोणत्या पद्धतीनें बनवावी, आंतील सूत्र कोणत्या धातूचें असावें, दोन मण्यामध्यें ग्रंथी कां असावी, त्यांतील मेरुमणि व त्याचें महत्त्व, माला कोणत्या बोटावर धारण करून कोणत्या बोटांनीं मणि फिरवावे, माला शरीराच्या कोणत्या भागाशीं धरावी इत्यादि इत्यादि अनेक गोष्टींचा बारकाईनें विचार केलेला आहे व त्यांचा शरीरस्थ शक्तिकेंद्राशीं कसा संबंध येतो ह्या सर्व गोष्टी विशद करणारी माहिती शारदातिलक, मंत्रमहार्णव, रुद्राक्षोपनिद् इत्यादि ग्रंथांत व अन्य पुराणांत दिलेली आहे.

एवढेंच नव्हे तर माला तयार झाल्यानंतर तिजवर करावयाचे संस्कार कोणत्या द्रव्यानें करावे, त्यानंतर, तिची इष्टफलदायित्वासाठीं करावयाची प्रार्थना, जपानतरची प्रार्थना इत्यादि अनेक गोष्टी सागितलेल्या आहेत. या सर्व खटाटोपाचीं कारणेंही त्या त्या मंत्रांत ग्रथित केलेलीं आहेत.

**प्रारंभीं माला प्रार्थना**—ॐ ह्रीं माले महामाले सर्वशक्तिस्वरूपिणी। चतुर्वर्गस्त्वयि न्यस्तस्तस्मान्मे सिद्धिदाभव॥ १॥ नंतर 'अविघ्नं कुरु माले त्वं गृह्णामि दक्षिणे करे। जपकाले (किंवा च) सिद्ध्यर्थे प्रसीद मम सिद्धये॥ २॥ आणि जपाच्या शेवटीं—'त्वं माले सर्व देवानां प्रीतिदा शुभदा भव। शिवं कुरु त्वं मे भद्रे यशोवीर्यंच देहि मे ॥ ३॥ ही मालेची थोरवी कां? **जपमंत्रस्पंदनानें मण्यांच्याद्वारें वाहणारीं कंपनें नाभिस्थित सर्व नाड्यांच्याद्वारें शरीरांतील त्या त्या शक्तिकेंद्रांतून प्रसृत करून सर्व शरीर मंत्रोद्भूत सामर्थ्यानें बलशाली, व तेजोमय करून कार्यसिद्ध करावयाचें हा हेतु. खुद्द समर्थ रामदास स्वामींनीं पण वरील स्वरूपाचें विधान सांगितलेलें आहे'**

**विनसाहित्याची माला**—हिला अ-क्ष माला म्हणतात. कोणत्याच वस्तुचें साहित्य हिला लागत नाहीं. अक्षरें म्हणजे बीजें हेंच हिचें साहित्य.

१. सज्जनगड मासिकाच्या मार्च १९६७ व नंतरच्या अंकात पहावें.

अ पासून क्ष पर्यंतचीं पन्नास अक्षरे-बीज-मातृका-ह्याच्या सहाय्यानेच इष्ट मंत्र जपावयाचा जसे – 'अं हरि ॐ नमः शिवाय' श्रीराम राम राम "अ" असे अक्षर इष्ट संख्या लवकर सपविण्याच्या दृष्टीनें चार वेळ म्हणून मग पुनः 'आं हरि ॐ नमः शिवाय—आं'. पूर्ववत् चारदा म्हणत क्रमानें इ, 'इं ऊं' क्ष पर्यंत त्या त्या बीजानं मंत्र संपुटित करावयाचा. अशा अ–क्ष मालेंत 'ळ' हा मेरुमणि समजावयाचा असतो. याच पद्धतीनं कोणत्या बीजापर्यंत येऊन जप थांबविला एवढें ध्यानात ठेविलं म्हणजे झालेल्या मंत्राची मोजणी सहज सुलभ होते पण तांत्रिक मंत्र किंवा देवदेवतांचे विशिष्ट मंत्र ह्या पद्धतीनें जपिता येत नाहीत. कारण त्या प्रत्येकाचीं बीजें असतातच. सदरहू पद्धति सामान्यतः सिद्धनाम मंत्राच्या पुरश्चरणाला जास्त सोईची असते भारतीय कर्मकांड फार मोठें आहे त व त्यामागील 'विज्ञान' येथे देणे हा हेतु नसून त्या कर्मकांडामागं भरलेलें विशेषज्ञान—विज्ञानज्ञान नव्हे, ह्याची अल्प कल्पना, थोडीशी चुणूक आमच्या नवभारताला देणे, दाखविणे हा हेतु आहे. अगदीं बारीकसारीक कृती विशिष्ट पद्धतीनं करावयाची असा दण्डक आहे व त्याचे कारणही आहे जसे देवाला नैवेद्य दाखवितांना पात्राखालीं चौकोनी मंडल करावयाचे, पिंडदानादि श्राद्धकर्मीय नैवेद्यांत पिंडाखालीं त्रिकोणी मंडल करावयाचे, काही कर्मांत वर्तुळाकार मंडल करावयाचे, भस्म लावितांना भस्माचे तीन तीन पट्टे ओढावयाचे, वहन कार्यात कुदाभोवता देव देवता स्थापितांना दर्भानीच व तेही उभे खाली वर अशा रेघा ओढावयाच्या व त्याही ठराविक दिशेकडूनच प्रारंभ करूनच काढावयाच्या इत्यादि प्रत्येकाच्या कर्मामागें कांही हेतु असून तदूसिद्धयर्थ अशी कृति का करावयाची ह्याच 'विज्ञान' आहे हा कृतीचा

---

१ अशा प्रकारचा मंत्र जप सांगणारे सांगलीचे एक गृहस्थ व गुरुदेव रानडे यंच्या आश्रमाच्या निंबाळ सांप्रदायातील उपासक मला माहीत होते (गो प्र भा)

खटाटोप प्राचीन मन्त्रद्रष्ट्या व मन्त्रकर्त्या ऋषींनी उगाच मूर्खपणाने करून ठेविला का? एवढाही विचार आमच्या नवभारताने करू नये का? आमचे मंत्र व त्याबरोबर त्याची कृति (जसे वेणु धमन्या प्रज्वाल्य, अथ अपउपस्पृश्य) ही पण त्या मंत्राबरोबर जोडून पाठ करण्याची प्रथा ठेविली म्हणूनच हजारो वर्षांनंतर अजून ते कर्मकांड, ती कृति टिकून तरी राहिली! 'हा केवढा दूरदर्शीपणा.' मंत्र हे टेपरेकार्ड करणे व त्या बरोबर कृतिमत्रही रेकॉर्ड करणें हें काम केलं तरीही मंत्रोच्चार करणाऱ्याच्या आवाजामधील व आवाजामागील जिवंतपणा त्या यंत्रातील आवाजात येईल का? येतो का? गाणे प्रत्यक्ष ऐकण्यात व रेडिओ प्लेट ऐकण्यात हा फरक नाही का लक्षात येत? इत्यादि गोष्टींवर केव्हा विचार करणार? सर्व मंत्रोद्गाते गुरुजी दिवंगत झाल्यावर का?

## ४ भारतीय 'ज्ञाना'चें गौरीशंकर

वरील सर्व विवेचनावरून असे ध्यानात येईल कीं, आम्हा भारतीयांचे प्राचीन 'विज्ञान' हे अनंत विश्वासंबंधाचें सांगोपांग असे 'ज्ञान' होतें. त्या सर्व ज्ञानाचा भर अखिल विश्वाची धारक व चालक अशी जी 'चिच्छक्ति' ती आणि व्यक्तीमधील 'जीव' रूपानें वावरणारी चिच्छक्ति ही एकच असल्याने तो संबंध प्रत्येक मानवानें जोडणे, एवढेंच नसून त्याचा अनुभव घेणें हे प्राचीन भारतीयांचें खरें व्यापक 'ज्ञान' होतें.

श्रीकृष्णानि भगवद्गीतेत अध्याय सातमध्ये अर्जुनाला पुढे दिल्याप्रमाणे सांगितलें.

'ज्ञान तेऽहं सविज्ञानमिदं वक्षाम्यशेषत: ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

हा 'ज्ञानविज्ञानयोग' होय. याचे स्पष्टीकरण ज्ञानेश्वराना

ज्ञानेश्वरीत फारच समर्पकपणे केलेले आहे. ते असे · तुज ज्ञान[1] सांगेन तेसें । विज्ञानेसीं[2] ॥ २ ॥

एथ विज्ञान काय करावें । ऐसें घेसी जरी मनोभावें । तरी पैं आधीं जाणावें । तेंचि लागे ॥ ३ ॥ मग ज्ञानाचिये वेळे । झाकती जाणिवेचे[3] डोळे । जैसी तीरीं नाव न ढळे । टेकली सांती[4] ॥ ४ ॥ तैसी जाणीव जेथ न रिघे[5] । विचार मागुता पाउलीं निघे । तर्क आयणा[6] नेघे । आंगीं जयाच्या[7] ॥ ५ ॥ अर्जुना या नाव **ज्ञान** । येर **प्रपंच हें विज्ञान** । तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥ ६ ॥ आता अज्ञान अवघें हारपे । विज्ञान करपे । आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥ ७ ॥

येथे 'येर प्रपच तें **विज्ञान**' याचा अर्थ पुढे भगवतानाच स्पष्ट केला आहे तो असा 'भूमिरापोऽनलो वायु ख मनो बुद्धिरेव च । अहकार इतीय मे भिन्ना **प्रकृतिरष्टधा**' ॥ ४ ॥ ही अष्टधा प्रकृति म्हणजे भूमि, उदक, तेज, वायु, आकाश, व मन, बुद्धि आणि अहकार ही माझी आठ प्रकारची प्रकृति होय. हा 'प्रपचाचा' पसारा आहे. **प्र-पंच म्हणजे पंचमहाभूतांचा [पृथ्वी–आकाश] मोठ्या प्रकर्षाने (प्र) विश्वात जो खेळ म्हणजे व्यवहार सुरू असतो, तो होय.** हा 'प्रपच' ह्या शब्दाचा अभिप्रेतार्थ आहे

पश्चिमेकडील आधुनिक नवविज्ञान अजून घोटाळनच आहे, त्याना या पचमहाभूताच्या पसाऱ्याचे थोडेसे आकलन झाले असून बरेच वा पूर्ण आकलन व्हावयाचेच आहे असे असून 'नवीन शोध, मानवाचा पचमहाभूतावरील अजय विजय' इत्यादि बालिश वल्गना ते नवविज्ञानवादी करीत आहेत. आणि आम्ही भारतीय म्हणजे त्या प्रपच विज्ञानाचे वारसदार, आश्चर्यचकित होऊन त्या *नवविज्ञानाच्या अत्यल्प प्रगतीच्या*

---

१ ब्रह्मज्ञान. २ व्यावहारिक ज्ञान. ३ बुद्धीचे. ४ असता. ५ शिरत नाही. ६ हुरूप. ७ ज्या ब्रह्माच्या.

मागे लागलो आहों ही फार खेदाची गोष्ट नव्हे का? विचाराच्या रितीं खालच्या पायरीवर आपण आलेले आहों ह्याची सिंहावलोकनी जाणीव आम्हाला व्हावयास नको का?

ह्या 'प्रपचा'च्या 'मन, बुद्धि व अहकार' या तीन जगाचा आणखी विचार नवविज्ञानाला करावयाचाच आहे. तो कसा? या तीन जगाचा व्याप, शक्ति व पचमहाभूताशा त्याचा कोणता कसा सबध आहे हे जाणावयाच आहे इद्रियगम्य ज्ञानाशिवाय, त्याच्या पलीकडे अतींद्रिय ज्ञान' म्हणून काहा 'वस्तु' आहे ह्याचा त्या नवविज्ञानाला किंपतसा परिचय झाला व अनुभव आला आहे ह्याचा आम्ही वारसदार भारतीयाना नको का विचार करावयाला?

भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला पुढें सागतात, हे अर्जुना अपरा इयमितिस्त्वन्या प्रकृति विद्धि मे पराम्। जीवभूता महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५॥

ही अष्टधा प्रकृति म्हणजे माझा—माझ्या "चिच्छक्तीचा" गौण भाग आहे. हिच्याहून निराळी अशी माझी 'परा' म्हणजे सर्वश्रेष्ठ अशी 'जीवभूता' नावाची प्रकृति आहे याचा खुलासा ज्ञानेश्वर असा करितात. "या आठाची जे साम्यावस्था[1] । ते माझी परम[2] प्रकृति पाम । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥ १९॥ जे जडातें जीववी । चेतनेनें[3] तें चेतवी । मनाकरवीं मानवी । शोकमोहो ॥ २०॥ 'जीवभूता' प्रकृति ती ही निच हें स्वरूप, तिचें हे कार्य पुन भगवान् सागतात

"एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अह कृत्स्नस्य जगत प्रभव प्रलयस्तथा" ॥ ६॥ (भ गी. अध्याय)

अखिल विश्व त्याच स्वरूप व कार्य याचें वर्णन भगवतानी अर्जुनाला

अर्थ टीपा : १ एकीकरण. २ चेतन-चेतना. ३ सनातन, काहिदेवे.

सांगितलं. त्याचा किती उत्कृष्ट खुलासा ज्ञानेश्वरांनी कुमारवयातील ज्ञानेश्वरांनी—केला, त्याचा आम्ही विचार नको का करावयाला? ते ज्ञान **'परा' प्रकृतीचें ज्ञान हे प्राचीन भारताचें खरे विज्ञान आहे व** होते. पण त्याला ते 'विज्ञान' 'वि–ज्ञान' 'वि' या उपसर्गाच्या कनिष्ठ अर्थाप्रमाणे कमी दर्जाचे ज्ञान असे ठरवून 'येर प्रपंच हे विज्ञान' असे प्राचीन भारतीय समजतात व मानितात असे समजतात. पण त्या 'परा'ला 'ब्रह्म' म्हणणेच योग्य व 'विज्ञान' असे म्हणणे खास चुकीचे व खोट नव्हे का? याचा आता तरी विचार करा'

इतक्या उच्च वा श्रेष्ठतम प्रतीचे आमचे प्राचीन ज्ञान असताना (आजच्या भाषेत त्याला 'विज्ञान' हे हीनत्वदर्शक नाव देणे चूक आहे.) आम्ही अशा मन स्थितींत का आहो वा का असावें याचे स्पष्ट उत्तर दूर नाहा. ते उत्तर असे आहे.

---

१. स्वामी रामतीर्थांचे पट्टशिष्य नारायणस्वामी ह्यांना रामतीर्थांच्या तोंडून ज्या भगवद्गीतेचा अर्थ ऐकून (स्वतः तितकेच शिक्षित असूनही) लगेच संन्यास घेऊन रामतीर्थांबरोबर अखेरपर्यंत असताना त्यांनीं 'भगवदाशयार्थ दीपिका' नावाचा २१०० पानाचा ग्रंथ हिंदींत लिहिला. त्यात भाग २ पृ. ७२२ ह्यावर ज्ञानेश्वराप्रमाणेंच भारतीय ज्ञानाचा खुलासा केला आहे.

प. सातवळेकर यांना तर आपल्या 'पुरुषार्थबोधिनी' गीताग्रंथात ज्ञान-विज्ञानासंबंधाचें केलेलं विवरण राष्ट्र व समाज बलवर्धक कसे आहे ते अवश्य पहावें (आवृत्ति २ री) सोहिरोबा नाथ 'आंबिये' या सत्पुरुषाने (मालवण गोमांतकाकडील) गीतेवर अठरा अध्यायात ज्ञानेश्वराच्या पद्धतीचा हजारपानी टीकाग्रंथ (सध्या अनुपलब्ध) लिहून अभंग 'ओवी ज्ञानेश्वरी' 'भगवद्गीतार्थ बोधिनी' लिहून त्यातही 'विज्ञान व ज्ञान' ह्याची उत्कृष्ट उकल केली आहे.

टीप : 'ऐसा नियता सर्वांमाजी। अलिप्तत्वें राहून सहजीं। प्रेरणा करी होणार जी जी। ब्रह्मादि कीटकांत ॥ १४०० ॥ पहाणाराचें ज्ञान त्यागावें। पोकळीचें जडपण विसर्जावें। उर्वरित तें ज्ञान स्वभावें। तें परब्रह्म दोन्हीकडे ॥ १४०१ ॥ (लघुवाक्यवृत्ति इ. स. १९६६)

गेल्या शतकात 'मॅकॉले' या धूर्त व कावेबाज मुसद्यानें आम्हा भारतीयांना 'सु-धारण्या'चा जो कूट प्रयत्न केला, त्याला कै. चिपळुणकर 'वाघिणीचें दुध पाजण्याचा प्रयत्न' असें म्हणतात, त्या शिक्षणानें आमच्या प्राचीन भारतीय 'ज्ञानी' रक्तांतून सूक्ष्मतम प्रमाणांत ज्वलज्जहाल विष कालविण्याचा यशस्वी प्रयोग केला. त्याचा हा परिणाम आहे. त्या प्रयत्नामुळे आमच्या 'ज्ञान' वाङ्मयाचा पूर्ण विसर पाडण्याची विलक्षण मोहिनीची सोय केली !

जगातील सर्वश्रेष्ठ, सर्वपूर्ण व अत्युच्च कोटीचें अ-क्षय अ-मृत असे वाङ्मय ज्या 'संस्कृत'[1] (सर्वश्रेष्ठ अशा संस्कारांनी शुद्ध होऊन तेजस्वी व तेजोत्पादक अशा) भाषेला ती 'मृत भाषा' आहे असे ठरविण्याची हीन बुद्धि उत्पन्न करण्याची योजना आखली. भारतातील सर्व भाषा संस्कृतोद्भवच आहेत हे माहीत असूनही तीमुळे आजही आम्ही संस्कृत ही राष्ट्रभाषा करूं इच्छित नाही, एवढेच नव्हे तर शिक्षण-क्रमातही तिला त्रिभाषात्मक योजनेत 'आवश्यक' शिक्षणीय भाषेचे स्थानही देऊं इच्छित नाही !!

वेद याचा अर्थ ज्ञान. तें कोणतें ? कसें ? व केवढें ? याचे उत्तर 'जें ज्ञान मिळविल्याने किंवा झाल्यानें 'जाणावयाचें व ज्ञातव्य असें काहींच शिल्लक उरत नाही तें, तसें व तेवढें. हे संस्कृत भाषेद्वारें ज्ञान जगावरील दुसऱ्या कोणत्याच भाषेंत नाहीं. तसेंच जगावरील कोणत्याही भाषेंत

---

१. संस्कृत ही भारताची भाषा करण्यात 'लिपी' शिवाय आणखीही अडचणी आहेत हें जरी खरें आहे, तरी दूर होण्याला विशेष वेळ लागणार नाहीं. आज भारतामध्यें संस्कृत भाषेतून चालणारा साप्ताहिक, पाक्षिक व मासिक यांची संख्या मोठी आहे. प्रत्येक भारतीय त्रिभाषात्मक शिक्षणक्रमांत 'संस्कृत' ही आवश्यक भाषा म्हणून ठरविली गेली तर आम्ही फार लवकर 'सुसंस्कृत' झाल्याशिवाय रहाणार नाहीं. (गो. रा. भा.)

संस्कृत भाषेइतके वर्णोच्चार नाहीत. याचा अर्थ असा की, संस्कृतभाषाभिज्ञ माणूस जगातील इतर कोणत्याही माणसापेक्षा जास्त, प्रकारचे आवाज-उच्चार-वर्णोच्चार-शब्दोच्चार ध्वन्योच्चार करू शकतो, एवढेच नसून ते तो यथातथ्येन लिपिगत करू शकतो! वेदमंत्रोच्चारातील उदात्त अनुदात्त स्वरोच्चाराची पद्धति (अर्थवाही उच्चारपद्धति) तर जगात अद्वितीय आहे. भारतीय ऋषींच्या खऱ्या विज्ञानाचे–विशेष ज्ञानाचें 'गौरीशंकर' ते हें. मंत्र 'टेपरेकॉर्ड' करून ते आवाज जिवंत ठेवितां येणार नाहीत. मग त्यांतील आचारविधि कसे टिकविणार? आचारविधींचे शब्द यंत्रगत होऊ शकतील पण विधींची हालचाल म्हणजे कृति कशी यंत्रगत करणार? हें वर सांगितलें आहेच. म्हणून 'गुरुसंस्था' हवीच. पाश्चिमात्यही भौतिकी ज्ञानासाठीं म्हणून तरी ती टिकवीत नाहीं का?

**विश्वज्ञान विज्ञानाचे सूक्ष्मस्वरूप :** संस्कृत भाषेत बावन वर्ण आहेत आणि त्यातच विश्व व त्यातील चिच्छक्ति ह्यासकट सर्व ज्ञान विज्ञान सूक्ष्मरूपानें बीजरूपानें, साठविलेलें आहे. ते कसे ते पहा. स्कंदपुराणाच्या कुमारिका खंडातील तिसऱ्या अध्यायातील गोष्ट ती अशी:–

मिथिला नगरीत कौथुम नावाचा अति गाढा पंडित होता. पण त्याचा मुलगा मात्र पक्का मठ्ठ असा वडिलांना व इतरांनाही वाटे. त्यावेळच्या पद्धतीप्रमाणे विद्याभ्यासात तो मुलगा मुळीच लक्ष घाली ना! यामुळे त्याच्या वडिलांना अति वाईट वाटून दुःख होई. त्याला शिकविण्याचे प्रयत्न करिताना एकदा त्याचे वडील त्याला म्हणाले 'बाळ, मी सांगतों ते तू शिकत का नाहीस?' त्यावर मुलगा उत्तरला "बाबा, जें शिकावयाचें ते केव्हाच शिकलो, यामुळे आणखी काहा शिकावयाचे उरलेंच नाहा. बाबा, हे कसे ते सांगतो. ते ऐका. "बाबा, मला आरंभी बावन वर्ण म्हणजे 'मातृका' शिकविल्यात. त्यात सर्वच ज्ञान आहे. त्याच्या बाहेर कोणते ज्ञान आहे ते सांगा.

